# साखरगोटी

लेखक

रामतनय

किंमत ५ रुपये

प्रकाशक व व्यवस्थापक
**रा० ज० देशमुख**
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २

संचालक
**भ० व्यं० देशमुख**
बी.ए., एल्‌एल्.बी.



(२) मुखपृष्ठावरील चित्र दीनानाथ दलाल यांचें आहे.

(३) मुखपृष्ठावरील चित्राचा ब्लॉक बॉम्बे प्रोसेस स्टोडिओंत केला आहे.

क्रमांक ६३
३० मे १९४४

मुद्रक
**वि. गं. केतकर**
व्यवस्थापक
लोकसंग्रह छापखाना,
६२४ सदाशिव, पुणें २

# अर्पण पत्रिका

माझे परमपूज्य वडील

ती. राजारामबापू

आणि

मातुश्री आनंदीबाई

यांच्या चरणीं

सादर

समर्पण

रामतनय

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनं

## वि. स. खांडेकर

| | | |
|---|---|---|
| १ | फुलें आणि दगड | १॥। |
| २ | घरट्याबाहेर | १॥। |
| ३ | स्त्री आणि पुरुष | २ |
| ४ | कलिका | २। |
| ५ | सायंकाल (आ. २ री.) | २॥ |
| ६ | अविनाश | १॥। |
| ७ | मंदाकिनी | १॥। |
| ८ | सहा भाषणें | २ |
| ९ | फुलें आणि काटे | २। |
| १० | पहिलें प्रेम (आ. २ री.) | ३ |
| ११ | जळलेला मोहर | ३ |
| १२ | क्रौंचवध | ४ |
| १३ | पांढरे ढग | ४। |

## ग. त्र्यं. माडखोलकर

| | | |
|---|---|---|
| १ | अवशेष | २ |
| २ | नागकन्या | २ |
| ३ | माझी नभोवाणी | २ |
| ४ | नवे संसार (जप्त) | ४ |
| ५ | चंदनवाडी | ६॥ |
| ६ | व्यक्तिरेखा | २। |

## ना. धों. ताम्हनकर

| | | |
|---|---|---|
| १ | तात्या भा. १ ला. | २॥ |
| २ | तात्या भा. २ . | ३ |
| ६ | निवाडे भा. १ ला. | २॥ |
| ४ | चकमकी | १॥ |
| ५ | बच्चा नवरा | १॥ |
| ६ | अनेक आशीर्वाद | ३॥ |
| ७ | दाजी भा. १ ला. | ३॥ |

## चिं. वि. जोशी

| | | |
|---|---|---|
| १ | आणखी चिमणराव (आ. २ री) | |
| २ | नवें भारूड | २ |
| ३ | स्टेशनमास्तर | २ |

## साने गुरुजी

| | | |
|---|---|---|
| १ | पुनर्जन्म (आ. २ री.) | ३ |
| २ | आस्तिक | २॥ |
| ३ | सोन्या मारुति? (आ. २ री.) | २ |

## दत्तू बांदेकर

| | | |
|---|---|---|
| १ | सख्याहरी | १॥। |
| २ | नवी आघाडी | १॥ |
| ३ | तूं आणि मी | २। |

## प्र. के. अत्रे

| | | |
|---|---|---|
| १ | साखरपुडा | १॥ |
| २ | ललित वाङ्मय | ३॥ |

## द. र. कवठेकर

| | | |
|---|---|---|
| १ | अपुरा डाव | ३ |
| २ | रेशमाच्या गांठी | ३ |

## वा. म. जोशी

| | | |
|---|---|---|
| १ | स्मृति-लहरी | २ |
| २ | विचार लहरी | २। |

## पु. य. देशपांडे

| | | |
|---|---|---|
| १ | नवें जग? | २॥ |

# देशमुख आणि कंपनीचीं प्रकाशनं

## भाई बेके

१ रॉयचरित्र १॥

## प. ले. वि. स. खांडेकर

१ काव्यज्योति १

## आनंदीबाई जयवंत

१ पारंब्या २

## लक्ष्मण० सरदेसाई

१ ढासळलेले बुरूज २

## प्रो. वि. ह. कुलकर्णी

१ व्यक्तिचित्रें २॥

## ना. ह. आपटे

१ फसगत १॥

## शकुंतला परांजपे

१ भिल्लिणीचीं बोरें ३

## कृष्णाबाई मोटे

१ मीनाक्षीचें जीवन २।

## र. गो. सरदेसाई

१ चलतीं नाणीं २

## रा. श्री. जोग

१ सौंदर्यशोध आणि आनंद ८

## ना. म. पटवर्धन

१ हितपत्रें १

## वि. वि. बोकील

१ बेबीची बहीण ३

## सत्यग्राही

१ ग्रह आणि तारे ४॥

## अनंत काणेकर

१ धुक्यांतून लाल ताऱ्याकडे ३
२ पिकलीं पानें (दु. आ.) १॥

## काकासाहेब कालेलकर

१ ब्रह्मदेशाचा प्रवास १॥

## य. दि. पेण्ढरकर

१ प्रापंचिक पत्रें ३
२ घायाळ

## वि. म. भुस्कुटे

१ स्टॅलिन ३॥

## कमलाबाई टिळक

१ आकाशगंगा २॥

## रामतनय

१ साखर गोटी ५

# लेखकाचें निवेदन

ग्रामीण जीवनावरील " **साखर गोटी** " ही कादंबरी ईशकृपेनें वाचकांना सादर करण्यांत सहाजिकच मला आनंद वाटत आहे.

ग्रामीण जीवनावरील माझ्या पहिल्या दोन्ही कादंबऱ्यांचें कौतुक महाराष्ट्रांतील जनतेनें आपलेपणानें केलें. म्हणूनच मला ही तिसरी कादंबरी लिहिण्यास हुरूप आला. अर्थात् ही कादंबरी प्रसिद्ध होण्याचें मुख्य श्रेय गुणग्राही वाचकांकडेच आहे.

कारण, माझ्या " **मोहित्यांची मंजुळा** " आणि " **खरा उद्धार** " ह्या दोन्ही कादंबऱ्यांची उत्कृष्ट व विस्तृत परीक्षणें महाराष्ट्रांतील विद्वानांनी आणि नियत-कालिकांनीं करून त्यांचा गुणगौरव केला. त्याच कादंबऱ्यांना ग्रामीण जीवनाचें सुविख्यात अभ्यासक श्री. ना. गो. चापेकर यांनीं चिकित्सापूर्वक आणि विद्वतापूर्ण असा विस्तृत प्रस्तावनारूप आशीर्वादही दिला.

पुण्याच्या डे. व्ह. ट्रा. सोसायटीनें ह्या दोन्ही कादंबऱ्यांना भरपूर बक्षिसें दिलीं. ग्रामीण जीवनावरील संग्राह्य आणि वाचनीय ग्रंथ म्हणून सरकार मान्यताही ह्या कादंबऱ्यांना मिळाली. मुंबई युनिव्हर्सिटीनें तर " खरा उद्धार " ही कादंबरी आपल्या इंटरमिजिएट आर्टस् व सायन्सच्या परीक्षेस ' अभ्यास पुस्तक ' म्हणून नेमली.

ह्यामुळें पहिल्या कादंबरीच्या सर्व प्रति थोड्या दिवसांत खपून गेल्या. तिचें पुनर्मुद्रण करण्याचा विचार करावा लागत आहे. दुसऱ्या कादंबरीच्या तर तीन आवृत्त्या निघाल्या आहेत.

पहिल्या दोन्ही कादंबऱ्यांतील लेखकाच्या निवेदनांत त्या कादंबऱ्या लिहिण्यांतील लेखकाचा विशिष्ट हेतु नमूद केला आहे. पण ह्या कादंबरीच्या बाबतींत तसें स्पष्टीकरण करणें स्थलाभावास्तव शक्य होत नाही. मात्र

येथें एवढेंच सांगतां येईल कीं, ह्या कादंबरींतील बहुतेक घटना अगदीं मध्यांच्या काळच्या आहेत.

माझ्या पहिल्या " **मोहित्यांची मंजुळा** " ह्या कादंबरीचें कथानक असेंच १९२० ते १९२५ पर्यंतच्या खेड्यापाड्यांतील मुख्यतः धर्म आणि जाती ह्या विषयींच्या अटीतटीच्या भर आंदोलनांतील आहे. '**खरा उद्धार**' ह्याही कादबरीचें कथानक १९३० ते ३३ मधील सत्याग्रहाच्या खळबळींतून निघालेल्या ग्रामीण जीवनविषयक विचारसरणींतील आहे.

महाराष्ट्रांतील ग्रामीण जीवनही बहुविध स्वरूपाचें आहे. देश, कोंकण वगैरे प्रादेशिक भिन्नतेच्या दृष्टीनें त्या त्या भागांतील समाज, त्यांच्या चालीरीति व समजुती, त्यांच्या भावना व विचार इत्यादि बाबतींत मौजेची नफावत दिसून येते. म्हणूनच कथानकांतील समाज आणि त्याचें प्रादेशिक स्थान कळलें, म्हणजे कोणत्याही ठिकाणच्या वाचकांना कथानकांतील मर्म समजणें सुलभ जातें.

ह्या कादंबरींतील पात्रें मुख्यतः देशावरच्या एका विशिष्ट भागांतील व मध्यमवर्गीय मराठा समाजांतील आहेत. आणि तीं सर्व काल्पनिक आहेत. देशावरील मध्यम वर्गांतील मराठा समाजाची भाषा बहुधा पांढरपेशा भाषेच्या वळणाची असते. ह्याकरितां तसली साधी भाषा ह्या कादंबरींत सामान्यतः योजलेली आहे.

एवढें निवेदन थोडक्यांत करून ही कादंबरी आमच्या प्रिय वाचकांच्या हातीं नम्रतापूर्वक देत आहें.

अक्षय्य तृतीया<br>शके १८६६

सर्वांचा नम्र<br>**रामतनय**

## घराण्याला काळिमा

१

शृंगी आंबराईंतून हिंडत होती. तिची नजर चौफेर होती. आंबराईची राखण करण्यास आली होती ती ! आंब्यांना पाड लागण्याचे ते दिवस होते.

ती शेंदरी आंब्याखालीं आली. राघूनें चोंचावलेले एक दोन आंबे खालीं पडले होते. ते तिनें उचलून आपल्या पाटींत घातले आणि गंमतीनें आपल्याभोंवतीं एक गिरकी पण मारली !

नंतर ती इकडे तिकडे पाहात दुसऱ्या आंब्याखालीं गेली. तेथें एक भला मोठा आंबा खालीं पडला होता. तिनें तो उचलला. तो आपल्या दातांनीं फोडला. तिनें तोंड वांकडें केलें आणि तो आंबा पण दूर फेंकून दिला ! आंबटढाण होता तो !

तो लोणच्याचा आंबा होता, हें तिला माहीत होतें; पण ती आज भानावरच नव्हती ! तिचें लक्ष दुसरीकडे कोठें तरी गेलें होतें !

ती भर दुपारची वेळ होती. चैत्रमासांतील उष्ण उष्ण वाऱ्याची झुळूक त्या आंबराईंत शिरे; पण तोंत प्रवेश केल्यावर तिला थंडगारपणा प्राप्त होई ! इतकी घनदाट आंबराई होती ती !

त्या आंबराईलगतच्या काळ्याभोर रानांतील एका भागांत नव्या लागणीचा वाढीस लागलेला ऊंस डोलत होता. त्याच्या कडेचे पापडीचें वेल कुंपणांतील नव्या शेवऱ्यांना नुकतेच मिठी मारूं लागलेले होते ! उंसा-शेजारच्या वावरांतील रताळ्यांचे दाट वेल मन मानेल तसे जमिनीवर पसरले होते. तिकडे तिची नजर गेली नाहीं.

तिच्या मळ्यांत लहानशी फुलबागही होती. तींतील किती तरी

गुलाबाच्या कळ्या उमलल्या होत्या. जाईजुईना कळ्यांचा बहर आलेला होता. तुळशीच्या उभट गोंडेदार मंजिरी डोलूं लागल्या होत्या !

—पण कोणांकडेही तिची दृष्टि गेली नाहीं !

तिची नजर तेथून कांहीशा दूर असलेल्या झोंपडीकडे लागलेली होती ! त्या झोंपडीच्या आसपास कोणाची हालचाल नजरेस येते कीं काय, हें ती निरखून पाहात होती ! पण तिची आशा सफल झाली नाही !

तिनें त्यानंतर आपली नजर विहिरीच्या बाजूस वळविली. पण तिकडेही तिला कोणीच दिसेना ! पुन्हा तिनें सभोंवार पाहिलें. आंबेझरीच्या कांठच्या आंबराईंत कोणी नाहीं, अशी तिनें खात्री करून घेतली; आणि विहिरी-लगतच्या केळीच्या बागेकडे ती धांवत निघाली !

रंगी आज सुंदर नवी हिरवी साडी नेसली होती. तिच्या डाव्या काखेंत लहानशी पाटी होती. तिनें काचा मारला होता व आपला पदर कमरेला खोंवला होता. ती धांवत असतां तिच्या गौरवर्ण सतेज मांसल पोटऱ्या व मांड्या उमद्या केळींनाही लाजवितील, अशा दिसत होत्या !

ती केळीच्या बागेंत इकडे तिकडे बरीच फिरली. त्या बागेच्या पली-कडील झोंपडीकडेही वळली. पण तिला पाहिजे असलेलें तिचें माणूस तिला दिसेना !

त्यामुळें ती आतां कावरी बावरी झाली ! उन्हाच्या तापानें तिच्या गालावरचा लालसरपणा अधिक वाढला ! तिच्या रुंद व नितळ कपाळावर घर्मबिंदु चमकूं लागले. तिच्या टपोऱ्या निळसर डोळ्यांतील तीक्ष्णता वाढूं लागली. तिच्या नाजूक आणि सरळ नाकांतून श्वासोच्छ्वास जोरानें होऊं लागला. तिच्या छातीच्या ठोक्यांचा जोर वाढूं लागला, त्यामुळें तिचें उन्नत वक्षस्थळ खालींवर होऊं लागलें.

ती आतां झोंपडीमागच्या उंच जागीं जाऊन उभी राहिली. तिनें पुन्हा इकडे तिकडे खूप पाहिलें. शेवटीं तिनें एक मंजुळशी शीळ घातली !

त्याही शिळेला उत्तर आलें नाही !

तिच्या कमानदार भुंवया जरा वर झाल्या. कपाळाच्या मध्यभागी चंद्रकोरीसारखी लहानशी अठी पडली ! इकडे तिकडे पाहात पुन्हा तिनें शीळ घातली. तिलाही उत्तर येईना, म्हणून तिनें " सावळ्या ओ ! सावळ्या

ओ! मावळच्या ओ!" अशी जोरानें हांक मारली. तिची ती मात्रा मात्र ताबडतोब लागू पडली!

तिच्या त्या शिळेस उलट उत्तर म्हणूनच कीं काय, दुसरी एक गोड शीळ तिला ऐकू येऊं लागली! तिची हांक ऐकूनच सावळ्या ती शीळ घालीत होता!

ह्या अपेक्षित उत्तरामुळें रंगीचा चेहरा खुलला. ती तोंडांतल्या तोंडात मृदु हंसली. या वेळीं तिच्या गालांवरील सुंदर खळी फारच मनोहर दिसू लागली!

रंगीच्या वयाला नुकतीच सतरा वर्षे पूर्ण झाली होतीं. मोकळ्या हवेंत स्वच्छंदानें तिचें आजपर्यंतचें आयुष्य गेलेलें होतें. त्यामुळें तिच्या शरिराची योग्य वाढ झाली होती. ती मध्यम उंचीची होती. तिचा बांधा सुबक होता. तिचें भरदार तारुण्य तरुणांना मोहवून टाकण्यासारखें होतें. तिच्या लावण्याची खुमारी तरुणांना वेड लावील अशीच होती! पण सावळ्याखेरीज इतरांना ती कस्पटासमान लेखीत असे!

तिच्या हांकेला शिळेच्या रूपानें उत्तर मिळालें खरें; पण तें नेमकें कोठून मिळालें, ह्याचा अंदाज तिला बरोबर करितां येईना. म्हणून तिनें पुन्हा शीळ घातली. आपली शीळ दुसरें कोणी ऐकत आहे कीं काय, हें तिनें पुन्हा चौकसपणे पाहिलें.

तिच्या शिळेला दोनदां उत्तर आलें. तिनें सावळ्या कोठें आहे, हें बरोबर जाणले. तिचा आनंद गगनांत मावेना!

ती आतां तिकडे धांवत जाणार——

——इतक्यांत तिच्या कानीं 'रंगे! रंगे!' अशा जोराच्या हांका आल्या.

रंगीच्या मनाचा थोडासा विरस झाला खरा, पण हांक मारणाऱ्या व्यक्तीचा तिला नितकासा राग आला नाहीं! ती व्यक्ति तिच्यावर प्रेम करणारी रखमा होती. ती सावळ्याची मामी होती. रंगीच्या अंतःकरणाचा ठाव तिच्याखेरीज कोणाला लागलेला नव्हता.

रखमा वयानें तीस बत्तीस वर्षांच्या सुमाराची होती. ती वर्णानें निमगोरी असली, तरी तिचा चेहरा आकर्षक व ठसठशीत होता. ती हाडा-पेरानें चांगली बळकट होती. ती धीट होती, पण जरा भोळी होती. मात्र

ती इतकी तापट होती कीं, तिला राग आला म्हणजे, तिच्यापुढें कोणाची मात्रा चालत नसे ! तिचे पतिराज सदोबा हे तिच्याच निवडीचे होते. त्यांची विठ्ठलभक्ति व शांत स्वभाव पाहून हा एक दुसरा तुकाराम जन्मास आला आहे, असें लोक विनोदानें म्हणत !

रखमा ही रंगीचे चुलते आबा मोरे ह्यांची दूरची नातलग होती. आबा मोरे यांच्या घरीं तिची ये जा बरीच होती !

रखमानें रंगीला धांवत येऊन गांठलें. तिला नटलेली पाहून रखमा म्हणाली,

"रंगे, कित्ती कित्ती छान दिसतेस ग तू ! ब्रह्मदेव देखील तुझ्या पाठीस लागेल ! "

रखमा हंसली. तेव्हां लडिवाळपणानें रंगी म्हणाली, "काय मामी तूं चेष्टा चालविली आहेस, माझी !—"

"रंगे, चेष्टा नाहीं करीत मी तुझी ! " रखमा गंभीरपणें बोलूं लागली. "नाहीं तर काय, तो पानगांवचा भुजंगराव देशमुख इतके आबांच्या घरीं खेटे घालताय ग कशाला ? अग, आत्ता आलाय, म्हणे तुला बघायला —"

"कोण मेली कटकट माझ्याभोंवती ! आबांना सांग, रंगी आंबराईच्या मळयांत नाहीं म्हणून ! ती गेली धरणाच्या शेतांत !— "

रंगी तुसडेपणानें बोलली.

"रंगे, मी सांगणारच आहें तसं आबांना ! पण मळा बघायला आबाबरोबर इकडे येईल तो ! म्हणून तुला इशारा दिलाय ! सावळ्या ग कुठें दिसत नाहीं, इथं....."

"कुठं गेलाय, तो मला सांपडतच नाहीं ! मघांपासून कित्ती कित्ती शोधलं मीं त्याला !... ..."

रखमानें सावळ्याच्या शोधांत जास्त पडूं नये, म्हणून रंगी असें बोलली.

"अग, असल इथंच मळयांत ! तूं इथं असल्यावर सावळ्या जायचा नाहीं, कुठ्ठ ! कुठ्ठ !— "

रंगी गालांतल्या गालांत हंसली. तिच्याकडे कौतुकानें पाहात तिच्या पाठीवर हात ठेवून रखमा म्हणाली,

"मी जातें घरीं आतां. रंगे, पण मी तुला सांगतें, अलीकडे आबावर

चांगली छाप पडली आहे भुजंगरावाची. मोठा अधिकार मिळाला आहे त्याला; सैन्यांत लोकांची भरती पुष्कळ केली म्हणून! अन् छानशी बंदूकही सरकारनं दिली आहे त्याला! अन् रंगे, मन्याला नोकरीवर ठेवलंय त्यानं! अन दहा कोसांतलं सारं खटलं चालवून शिक्षा करण्याचा अधिकार ग मिळालाय त्याला. म्हणून तर आबांना तो हवा हवासा वाटतो! आबाचं कसब माझ्याशिवाय कुणाला कळायचं नाहीं, रंगे! —"

इतकें सांगून रखमा निघून गेली आणि रंगी विचारमग्न स्थितींत सावळ्याचा शोध करण्याकरितां साखरगोटीकडे निघाली.

ह्या दोघींचा संवाद सावळ्याच्या कानीं पडला होता. तो साखरगोटी आंब्याच्या उंच शेंड्यावर होता. तेथून त्याला ह्या दोघी दिसत होत्या; पण त्यांना सावळ्या मात्र दिसत नव्हता.

रखमानें सांगितलेली हकीकत ऐकून तो थोडा काळजींत पडला. दुपारच्या वेळीं रंगीला घेऊन तो गुपचूपपणें बोरगांवला जाणार होता. म्हणून तर रंगी त्या वेळीं राखणीच्या निमित्तानें मळ्यांत आली होती. बोरगांवच्या मावशीच्या घरीं तो रंगीशीं लग्नही लावून घेणार होता, म्हणे!

पण तो आतां मनांत म्हणूं लागला, "असलं चोरटं करणं कशाला पाहिजे? खाशा, बजा वगैरे आपले मित्र सांगतात, 'नव्या पद्धतीनें आपण इथंच लग्न उरकून टाकूं!' म्हणून तर आज आपण बोरगांवला जाण्याचें रहित करून इथं दडून बसलों! ह्या साखरगोटीलाही पाड लागलाय! आज उतरूं बरीचशी! लग्नांत वांटूं हे आंबे! गोड तोंडं होतील सगळ्यांचीं."

तो असें मनांत म्हणत होता, हें खरें; पण रखमामामींनीं सांगितलेल्या बातमीनें तो कावरा बावरा झाल्याशिवाय राहिला नाहीं! कारण, भुजंगराव त्याच्या माहितीचा होता. पानगांवच्या जत्रेंतील कुस्त्यांच्या फडांत भुजंगरावानेंच त्याचा पाणउतारा केला होता! आतां देखील आपल्या अन्नांत विष कालविण्यासच हा आला आहे, असें वाटून सावळ्याला भुजंगरावांचा फार संताप आला!

इतक्यांत रंगी धांवतच साखरगोटीखालीं आली. त्याला अगदीं

उंच फांदीवर चढलेला पाहून तिच्या पोटांत धस्स् झालें ! ती कळवळून म्हणाली,

"सावळया ! सावळया ! उतर खालीं ! "

सावळया आंबे उतरीतच होता. मधूनच त्यानें तिच्याकडे नजर फेंकली ! तो तिला पाहून गालांतल्या गालांत हंसला !

"सावळया ! उतरतोस का नाहीं ? नाहीं तर मी येईन तिथं बघ ! " रंगी जोरानें म्हणाली आणि त्याच्याकडे टक लावून पाहूं लागली.

त्यानें उत्तर दिलें नाहीं. सांखरगोटीचा एक गोड पाड त्यानें दातानें चावला आणि तो रंगीकडे फेंकला. रंगीनें तो वरच्यावर झेलला. तिने लगेच तो तोंडाला लावला !

प्रेमाच्या गोडीची जाणीव त्या एकाच साखरगोटीने त्या प्रेमी युग्माला करून दिली !

त्यानें अशाच पाडाच्या चार पांच गोटया रंगीकडे फेंकल्या ! त्यांचा आस्वाद ती घेत होती ! पण सावळयाला त्या उंच शेंडयावरून उतरण्याचा तिचा आग्रह एकसारखा चालला होता. त्यांत खंड पडला नव्हता.

त्या फांदीवरचें सावळयाचें काम संपलें. तो त्या उंच फांदीवरून सरसर खाली उतरूं लागला.

उन्हाळयामुळें त्यानें आपले कपडे काढून ते साखरगोटीच्या बुंध्याशी ठेवले होते. तो फक्त लंगोट नेसलेला होता. तो एकवीस बावीस वर्षांचा गौरवर्ण तरुण होता. त्याची उंची अजमासें साडेपांच फुटांपेक्षां कमी नव्हती. त्याचे सर्व अवयव गोटीबंद असून त्याच्या शरीरावर तारुण्याचें तेज ओसंडत होतें. त्याचें मुखकमल रंगीपेक्षां सरस नसलें, तरी निरस तर खास नव्हतें. त्याच्या डोळयांत करारीपणाची विलक्षण झांक होती !

रखमानें त्याला कोणाची दृष्ट होऊं नये, म्हणून त्याच्या गळयांत काळा गोफ घातला होता. त्यामुळें त्याच्या भरदार कंठाची शोभा वाढली होती.

त्याच्या झरझर उतरण्यांतील चापल्य पाहून रंगी वेडी होऊन गेली.

तो खालीं आला. त्यानें अंगांत मलमलीची पैरण घातली. कमरेस धोतर गुंडाळलें आणि त्यानें रंगीचे दोन्ही हात पकडले. तीं दोघें एकमेकांकडे पाहूं लागलीं. ती हंसली ! तोही पण हंसूं लागला !

त्यानें तिचे दोन्ही हात दाबले. रंगी मागें मागें सरूं लागली. तो पुढें येऊं लागला! रंगीनें त्याचे हात मागें रेटीत म्हटलें,

"सावळ्या कुस्ती खेळतोस होय? भुजंग्याबरोबर कर लढत एकदांची! मी पण पाहीन म्हणते, कशी गंमत उडते, त्याची ती! --"

"हो! हो! त्याला चीतपट करीनच मी! पण, रंगे, आज तो तुझ्याकरितां इथं आलाय म्हणे! --"

"येऊं दे कीं रे! चल आपण जाऊं या बोरगांवला! --"

"तसं नको, रंगे! करूं काय करायचं तें इथंच! कोण काय करतंय बघूं तर! मी सांगेन सगळं तुला! आतां साखरगोटीचे आंबे भराभर काढूं या. तूं घे खालीं पाट्या--"

"मी पण चढते, गोटीवर सावळ्या! दोघेंजण भरभर उतरूं आंबे! --

सावळ्या आणि रंगी ह्यांनीं साखरगोटीचे आंबे पुष्कळ उतरले. त्यांचा ढीग त्यांनीं त्याच आंब्याच्या वृक्षाखालीं घालून ठेवला. तीं उभयतां मनसोक्त पाडाचे आंबे खातच होतीं!

त्या वेळीं तिसरा प्रहर टळून गेला होता. दोघेंही तहानभूक विसरलीं होतीं. त्यांच्या पोटांत साखरगोटीचें अमृत भरपूर गेलेलें होतें. मग त्यांना भुकेची कसची आठवण होणार?

इतक्यांत तेथें मन्या रामोश्याची बायको सखी आली.

सावळ्याचा उपकारी स्वभाव मान्या आंबेगांवाला माहीत होता. शिवाय सावळ्याचा मित्र मन्या ह्याची ती लग्नाची बायको होती. ती रूपानें चांगली होती, पण स्वभावानें जरा एकांगी होती. मन्याला दारू पिण्याचा नाद फार असे. त्यामुळें तिचें आणि त्याचें भांडण होऊन ती माहेरीं आंबेगांवास येऊन राहिली होती! कांहींशा हलाखींतच ती तेथें दिवस कंठीत होती! तिनें साखरगोटीचे सावळ्यानें उतरलेले आंबे पाहून ती त्यास म्हणाली,

"सावळ्या साखरगोटी उतरलीस होय! मग मला दे कीं रे चार आंबे."

लगेच सावळ्यानें तिला पाटीभर आंबे दिले. ती आनंदित होऊन गांवाकडे परतली.

ती आंबराई एका ओढ्याच्या कांठीं होती. त्या ओढ्याचें नांवही

आंबेझरी असें पडलें होतें. सावळ्या आणि रंगी चूळ भरण्यास आंबेझरीवर गेली. तिच्या कांठाशीं सावळ्याचे वडील हैबतराव यांनीं लहानसा घाट पण बांधला होता. तेथें दोघेंजण बसलीं.

त्या वेळीं रंगी म्हणाली,

" सावळ्या, आज साखरगोटी उतरलीस हें बरें नाहीं झालं. हिच्याच-करितां तुमचं अन् आबांचं भांडण आहे ना ?—"

" अग, माझा आंबा हा ! मी उतरणारच ! बारा वर्षांनीं आंबे लागतात साखरगोटीला. असला गोड आंबा पांच पन्नास गांवांत नाहीं ! मी हे आंबे साऱ्या गांवाला वांटणार ! काय करतील आबा ते पाहीन मी ! —"

" सावळ्या बारा वर्षांपूर्वीची गोष्ट तुझ्या कानावर आहे ना ? असेच आंबे लागले होते साखरगोटीला ! आणि अग बाई, इथंच तुझ्या बापाचा खून झाला ! रखमामामी सांगतात ना ती हकीकत ! "

रंगीच्या अंगावर कांटा उभा राहिला ! त्या वेळीं सावळ्यानें तिला ओढून जवळ घेतलें. तेव्हां तर ती जास्तच कावरी बावरी झाली आणि दूर सरून म्हणाली,

" सावळ्या, लग्न झाल्याशिवाय असं बरं दिसतं का ? "

त्या वेळीं सूर्य पश्चिम दिशेशीं लगट करण्याकरितां वेगानें चालला होता. त्याचे मावळते किरण वृक्षांच्या विस्ताराच्या फटींतून त्या उभयतांना डोकावून पाहात होते.

इतक्यांत गांवच्या बाजूनें बऱ्याच लोकांचा घोळका आंबराईकडे येत असल्याचें सावळ्याला दिसलें.

ती मंडळी थेट साखरगोटीकडे वळली !

आबा मोरे यांच्या बरोबर ज्ञानू पाटील, भिक्या वेसकर, भुजंगराव देशमुख आणि आणखी दोन चार लोक होते !

साखरगोटीखालच्या आंब्यांचा ढीग पाहून आबांच्या रागाचा पारा पराकाष्ठेस चढला !

" सावळ्या ! सावळ्या ! सावळ्या ! " आबांनीं जोरानें हांका मारण्यास सुरुवात केली.

सावळ्या निर्भयपणें पुढें आला.

पाटलांनीं त्याला विचारलें,

" सावळ्या तूं हे आंबे उतरलेस ?— "

" होय. माझे आंबे मींच उतरले— "

सावळ्या नेटानें बोलला. त्याच्या कपाळास आठ्या पडल्या. डोळे लाल झाले. पण तो शांतपणें तेथें उभा राहिला. काय प्रकार होत आहे, हें तो लक्षपूर्वक पाहूं लागला.

पाटलांनीं त्या आंब्यांचा पंचनामा केला ! वेसकर ते आंबे पोत्यांत भरूं लागला ! त्याला ते आंबे चावडींत नेण्याचा हुकूम पाटलांनीं केला !

सावळ्या त्याला अडथळा करूं लागला. तो ते आंबे कोणालाही पोत्यांत भरूंच देईना ?

पाटील सावळ्याची समजूत करूं लागले. तो त्यांचें ऐकेना ! त्या वेळीं मोठ्या ऐटीनें भुजंगरावांनीं मध्येंच तोंड घातलें ! सावळ्याला कायद्याच्या गोष्टी ते सांगूं लागले.

" तुमचा येथें संबंध नाहीं भुजंगराव ! आपलें तोंड आवरा— " सावळ्या गुरगुरला.

भुजंगरावांना तो अपमान झोंबला. ते स्वतःच ते आंबे पोत्यांत भरूं लागले !

सावळ्याचा राग अनावर झाला. तो भुजंगरावांच्या अंगावर चालून गेला ! त्या दोघांची झोंबाझोंबी सुरू झाली ! पाटील ती सोडवूं लागले ! पण त्यामुळें सावळ्याला जास्तच चेंव आला !

क्षणार्धांत त्यानें भुजंगरावांना खालीं आदळलें; आणि तो त्यांच्यावर स्वार झाला !

आंबेझरीच्या बाजूनें " सावळ्या ! सावळ्या ! " असें म्हणत रंगी धांवत पुढें आली !

पण आबांनीं तिचा कान पकडला आणि म्हटलें,

" कार्टे, हेंच धरणाचं शेत तुझं ? माझ्याशीं लपंडाव चालवितेस ? माझी अब्रू घालवितेस ? मोऱ्यांच्या घराण्याला काळिमा फांसतेस ?— "

हा प्रकार दिनराज अस्ताचलावरून पाहात होता. संतप्त झालेल्या माणसाप्रमाणें त्याचें मुखही लाल झालें होतें; पण रंगीवर आबांनीं

चालविलेला गहजब त्याला बघवेना म्हणूनच कीं काय, तो अस्ताचलाच्या पलीकडे झटकन् निघून गेला !

पण पश्चिम दिशादेवी कांहीं वेळ तेथेंच रेंगाळत असलेली दिसत होती. रंगीसारख्या खेळकर वृत्तीच्या तरुणीला त्रास झालेला पाहून तीही संतापली असावी, असें तिचा तांबडा लाल झालेला मुखचंद्रमा पाहून वाटत होतें !

## चोराचा गोंधळ

## २

साखरगोटी आंब्याच्या खालीं झालेल्या तंट्याची बातमी रात्रीं आंबेगांवांत वाऱ्यासारखी पसरली. ज्याच्या त्याच्या तोंडीं तोच चर्चेचा विषय झाला. भुजंगरावांच्या सरकार दरबारच्या वजनाची माहिती लोकांना होती. सावळ्याविषयीं त्यांना सहानुभूति पण वाटत होतीच. त्यामुळें त्यानें भुजंगरावांना दुखविलें, हें बरें केलें नाहीं; भुजंगराव आतां दंश धरील आणि सावळ्याचा सूड घेईल अशी त्यांना धास्ती वाटूं लागली !

पण सावळ्याला त्या गोष्टीची दिक्कत वाटत नव्हती ! आपल्या न्याय्य हक्कांवरील भुजंगरावांचें अतिक्रमण त्याला सहन झालें नाहीं. सावळ्याच्या तरुण मित्रांनाही सावळ्यानें केलें, तें योग्यच केलें असें वाटलें.

आतां आंबेगांवासारख्या लहान सहान गांवांतील तरुण मंडळी इतकी भोळसट राहिली नव्हती ! निरनिराळ्या लोकनियुक्त निवडणुकीच्या सभा त्यांनीं पाहिल्या होत्या. जत्रेंतील जमावापुढें झालेलीं अनेक राजकीय भाषणें त्यांनीं ऐकलीं होतीं. खेड्यांतील लोकांना समजेल, अशा भाषेंत त्यांचे हक्क त्यांना समजावून देणारे त्यांच्यांतीलच आतां नवे नवे वक्ते पुढें येत होते. त्यामुळें खेडगांवच्या तरुणपिढींत बराच निर्भयपणा येऊं लागला होता. कांहीं ठिकाणीं तर ती निर्भयता बेपर्वाईच्या स्वरूपांत सरकारी अधिकाऱ्यांच्या अनुभवास येत होती ! त्यामुळें अशा कांहीं लोकांना भुजंगरावासारख्यांची भीति मुळींच वाटत नव्हती !

भुजंगरावांना ह्या परिस्थितीची जाणीव होतीच. काँग्रेसच्या राजवटीच्या वेळीं ते इकडील तरुणांचे पुढारी झाले होते ! महायुद्धाला

सुरुवात झाल्यानंतर त्यांनीं आपली पगडी फिरवली आणि ते सैन्यभरतीच्या उद्योगास लागले; म्हणून त्यांचा मानमरातबही वाढला.

त्या रात्रीं आबांच्या वाड्यांत आबा आणि भुजंगराव यांचीं खलबतें रात्रभर चालली होतीं. एकादा दिवस थांबून मग काय तें करावें, असा त्यांच्या खलबतांतून निष्कर्ष निघाला होता.

सैन्य भरतीस अडथळा आणण्याचा गुन्हा सावळ्याच्या माथीं मारतां येतो का, हें भुजंगराव पाहात होते. सावळ्यानें सरकारी कामास अडथळा आणला असा आरोप त्याच्यावर करतां आला असता, पण त्यांत आपलीही नाचक्की होण्याचा संभव भुजंगरावांना वाटत होता! त्यामुळें त्यांच्या सरकार दरबारच्या वजनास धक्का लागण्याचा संभव होता! तेव्हां सावळ्यानें केलेला आंबराईतील अपमान तूर्त गिळावा; आणि दुसरें किटाळ त्याच्यावर आणून किंवा उत्पन्न करून त्याला एकदम पकडण्याची योजना करावी, असें भुजंगरावांनीं दूरदर्शीपणानें ठरविलें! गेलीं तीन चार वर्षें राजकीय पुढाऱ्यांत वावरून त्यांनीं संपादलेला मुत्सद्दीपणा अशा प्रकारें त्यांना उपयोगीं पडला!

वास्तविक आंबराईत घडून आलेला प्रसंग अचानकच होता. तो कांहीं कोणीं मुद्दाम जाणूनबुजून उत्पन्न केलेला नव्हता. सावळ्याला साखर-गोटीचे आंबे उतरण्याची लहर एकदमच आली होती! ही बातमी गांवांत पसरेल आणि आबा पंचनाम्याचा खटाटोप ताबडतोब करतील, अशी त्यालाही कल्पना नव्हती.

मग हें झालें कसें? सावळ्याच्या उपकारी स्वभावाचा तो अपकारी परिणाम न कळतच घडून आलेला होता!

रखमाच्या लक्षांत ती गोष्ट अगोदर आली.

सायंकाळच्या सुमारास सखी रामोशीण रखमाच्या घरीं आली. तिला तिच्याकडून दाणे विकत घ्यावयाचे होते. रखमा आपल्या घरची ज्वारी जरा स्वस्त विकी; पण रोख पैशाशिवाय ती कोणास विकीत नसे! सकाळीं सखीजवळ रोख पैसे नव्हते, म्हणून तिनें तिलाही पण ज्वारी घातली नव्हती! आतां सखी येतांच रखमास म्हणाली,

"दाणे घालतां का मला आतां ? मी अधेली घेऊन आलंय ! रखमामामी ! . . . . . ."

"अग, सकाळीं आपल्याजवळ दमडीही नाहीं म्हणत होतीस, अन् आतां ग तुला चांगली अधेली कुठनं मिळाली ?——"

रखमा सुपांत दाणे घेऊन येत असतां सखीला बोलली.

"सावळ्याचे लई उपकार झालेती माज्यावर, रखमाबाई आज !"

"त्यानं तुला पैसे दिले ?——"

त्या तरण्याताठ्या सखीकडे रोखून पाहात रखमानें विचारलें.

"तसं नव्ह रखमाबाई !" मिस्किलपणें हंसत सखी बोलूं लागली, "त्यानं साखरगोटीचे आंबे दिले मला खायाला. पण घरांत दाणे नव्हते, म्हणून मीं बाजारांत नेले विकायला ते ! साखरगोटी संमद्यांना ठावं हाय ! उड्या पडल्या तिच्यावर ! दिडकीला एक एक अिकली मी !——"

"अस्सं होय !——" रखमा उद्गारली.

"पन रखमाबाय म्यां वंगाळ केलं हें !" सखी डोळ्यास पदर लावून बोलूं लागली "आबा मोऱ्यानं मला आंबं इकतांना पाहिलं. त्यानं इचारलं; 'कुणी आंबं दिलं तुला ?' म्यां म्हटलं, "सावळ्या आंब उतरतोय तिकडं गेलें मी. दिलं मला त्यानं हे आंबे ! . . . ." एवढे बोलून सखी रडूं लागली !

"कां ग रडतेस ? सांग सगळं——" रखमा म्हणाली.

"सांगायचं काय ? रखमाबाई. मला आबानं ज्ञानू पाटलाकडं नेलं. मो त्याला तेंच सांगितलं. त्यो पानगांवचा भुजंगरावही होता बरोबर ! सावळ्याला पकडायला गेलेत ते !"

रखमाच्या काळजांत चर्र झालें !

  

आबांच्या घरीं एक दिवस अगदीं मोकळा काढण्यांत भुजंगरावांचा आणखी एक सुप्त हेतु होता. रंगीच्या सौंदर्यानें ते भारून गेले होते. दुसऱ्या दिवशीं सकाळीं तिनें चहा आणिला, त्या वेळीं उभयतांची दृष्टादृष्ट झाली. रंगी तोंडांतल्या तोंडांत हंसली ! भुजंगरावांना समक्ष पाहातांच ते चांगले ताकदवान असावेत, असें तिला दिसलें. अशाही जवानावर सावळ्यानें विजय मिळविल्याचें तिला कौतुक वाटलें; म्हणून ती हंसली !

भुजंगरावांना वाटलें, रंगी आपल्यावर खूष असावी. म्हणूनच दिवसभर त्यांनीं आबांचें घरही मोडलें नाहीं !

ते एकसारखे रंगीला निरखीत होते. ह्यापूर्वीं त्यांची निराशा झाली होती. पण आजचे ग्रह पालटले आहेत, असें त्यांना वाटलें.

भुजंगरावही वयानें तरुणच होते. ते सावळ्यापेक्षां तीनचार वर्षांनीं अधिक वयाचे होते इतकेंच. मोठे महत्त्वाकांक्षी होते ते. मॅट्रिकपर्यंतचा अभ्यासक्रम कसाबसा त्यांचा झाला होता. कॉंग्रेस चळवळींत अशा घरंदाज श्रीमंत मराठा वर्गास एकदम पुढारीपणाची संधि प्राप्त होत होती. तिचा फायदा त्यांनीं भरपूर घेतला. जिभेवरही सरस्वतीचा कांहींसा वरदहस्त असल्यामुळें त्यांचें बस्तान चांगलेंच बसलें !

भुजंगराव सुमारें सावळ्या इतकेच उंचीचे होते. पण अंगानें जरा जाड होते. तें त्यांचें कमावलेलें शरीर होतें. ते वर्णानें सावळे असले, तरी नाका-डोळ्यांनीं नीटस होते. दुसऱ्यावर छाप बसवील, अशी त्यांची मुद्रा होती.

सौंदर्यवान् पत्नी प्राप्त व्हावी, अशी त्यांची सहाजिकच मनीषा होती. पण रंगीइतकी अथांग सुंदर मुलगी त्यांना अद्यापि आढळली नव्हती ! म्हणून तर ते रंगीच्या मागें लागले होते !

  

सावळ्याचा दुसरा दिवस उदासवाणाच गेला. रंगी त्याला त्या दिवशीं भेटली नाहीं. तिनें आपलें घरच सोडलें नव्हतें मुळीं.

सायंकाळच्या वेळीं सावळ्या आपल्या मळ्यांतील झोंपडीच्या बाहेर घोंगडी टाकून बसला होता. त्याची नजर केळींच्या बागेकडे होती. केळींचीं पानें वाऱ्यानें एकसारखीं हलत होतीं. त्यामुळें केळी नाचत आहेत असें त्याला वाटत होतें. त्याच्या मनांतही असेच अनेक विचार नाचत होते !

सावळ्याची आई वारल्यापासून तो रखमाकडेच असे. दिवसा ती त्याला मळ्यांत भाकरी पोंचवी; रात्रीं तो घरीं जेवणास जाई. साखरगोटीचा तंटा झाल्यामुळें गांवांत आणखी कांही गडबड व्हावयास नको, म्हणून तो त्या रात्रीं घरीं जेवणास गेला नाहीं. दुसऱ्या दिवशींही रात्र पडली, तरी तो घरीं गेला नव्हता. रखमाला घरींही फार काम होतें. आबांच्या घरच्या हालचाली निरखण्याकरितांही तिनें घर सोडलें नव्हतें. दुसऱ्या दिवशीं

रात्रीं बराच वेळ वाट पाहिल्यानंतर तिनें सदोबांना जेवण देऊन मुद्दाम सावळयाच्या मळयाकडे पाठविलें.

सदोबा मळयांत गेले तेव्हां बरीच रात्र झाली होती. पण चांदणें पांढरें शुभ्र पडलें असल्यामुळें ती रात्र भयप्रद वाटत नव्हती, उलटी आल्हाद-कारकच ती वेळ होती.

झोंपडीच्या बाहेर सावळया आपल्या मित्रांबरोबर बोलत बसला होता. खाशा, बजा वगैरे त्याचे मित्र तेथें जमले होते. त्या मित्रांच्या टोळ-क्याचा पुढारी मन्या रामोशी मात्र त्या वेळी तेथें नव्हता !

सदोबांनीं आणलेल्या भाकरी सावळयानें सोडल्या. त्या भाकरी हातांवर घेऊन सारेजण खाऊं लागले. त्या वेळीं सदोबाच म्हणाले,

" सावळया, साखरगोटीकरितां पुन्हा वाद निघाला, हें बरं झालं नाही, बाबा ! --"

सदोबांना सारेजण मान देत होते. त्यांची उमर चाळिशीला येऊन ठेपलेली होती. त्यांचा चेहरा भव्य व हाडपेर मजबूत होतें. ते साध्या भोळया विचाराचे विठ्ठलभक्त आणि ते कष्टाळू शेतकरी होते. त्यांचा सावळयावर जिव्हाळयाचा लोभ होता.

भाकरीचा घांस सावळयाच्या तोंडांत होता. पांढरा कांदाही त्यानें हातानें फोडून त्याचा तुकडा तोंडांत घातला होता. तो चावून चावून गिळल्यानंतर सावळया म्हणाला,

" आमचीच साखरगोटी मूळची, असं तुम्ही सांगतां ना सदूकाका ? आमच्याच बांधाचा दगड साखरगोटीच्या पलीकडे आहे ना ? "

" हें सारं खरं आहे, सावळया, " सदोबा बोलूं लागले " पण बारा वर्षांची गोष्ट ऐक तरी एकदां. साखरगोटीला बारा वर्षांनीं आंबे येत असतात ! ह्या जुन्या दगडावरून तुझा बाप हैबतराव आपली साखरगोटी म्हणत होता. तेव्हां आबानं मोजणी आणली ! मोजणीदाराला लांच दिला ! आंबेझरी-पलीकडची आबाची हद्द त्यानें साखर गोटीपर्यंत आणून भिडवली ! अशा रीतीनें सरकार दरबार आबानं जिंकला. हैबतराव हरला ! "

" अस्सं आहे काय ? " खाशा म्हणाला, " पण रंगीचा भाऊ हिंमतराव

याचीच साखरगोटी असं लोक म्हणतात, म्हणून तर आम्ही सगळे रंगीलाच साखरगोटी म्हणत असतों!... ..."

"रंगीची साखरगोटी हेंही खरंच कीं! आबांचा पुतण्याच रंगीचा भाऊ हिंमतराव. त्याची जमीन आंबेझरीच्या अलीकडची साखरगोटीला लागूनच. मग त्याच्याही हद्दीवर साखरगोटी येतेच कीं! म्हणून हिंमतरावही सावळ्याच्या बापाबरोबर भांडत होताच!... ..."

सगळ्यांनीं एक मोठा सुस्कारा टाकला. "आम्ही आतां मनगटाच्या जोरावर आमची साखरगोटी म्हणणार--" बजा त्वेषानें बोलला. आणि त्यानें दांतांनीं एकदम कांदा फोडला.

"ऐका तरी माझं! तुम्ही कोवळीं पोरं आहांत. तुम्हांला ठाऊक नाहीं ती गोष्ट!" सदोबा म्हणाले,

"ऐकतों आम्ही सगळं. सांगा काका तुम्ही!" बजा सदोबाकडे पाहात बोलला.

सावळ्यानें लसणीची चटणी आणि शेंगदाण्याचें कूट घातलेला झुणका साऱ्यांच्या भाकरीवर आणखी घातला. त्या चांदण्या रात्री त्यांच्या त्या जेवणाला मजा आली होती! सदोबाही तन्मयतेनें त्यांना जुना इतिहास निवेदन करीत होते. ते म्हणाले,

"पण हें तिघांतलं भांडण फार पेटलं. हैबतराव रात्रीची राखण करीत असे. तो आंब्याखालींच झोंपत असे. सावळ्यासारखाच गोरा गोमटा होता तो. शरीरानं चार जणांला भारी होता. पण रात्रीं त्याचा कुऱ्हाडीनं कुणीं गळाच तोडला! दोन तुकडे केले त्याच्या देहाचे! खून झाला त्याचा!... .."

सदोबांच्या डोळ्यांना पाणी आलें. कोणी कांहीं बोलेना. सर्वत्र गंभीरता पसरली! जो तो "चू चू" करूं लागला. सावळ्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले. त्याच्या तोंडांतील भाकरीचा घांस घोटाळूं लागला.

कांहीं वेळानें सदोबाच बोलूं लागले,

"तो खून रंगीचा भाऊ हिंमतराव ह्यानें केला, असा त्याच्यावर सरकारनें आरोप ठेवला! खटला झाला. हिंमतराव फांशी जाणार असेंही लोक म्हणूं लागले. पण हिंमतराव तुरुंग फोडून पळून गेला. मोठा मस्तवाल

पैहलवान होता तो ! कुणी म्हणतात, त्याला शिपायांनीं गोळ्या घालून मारलं. पण मला नाहीं खरं वाटत तें ! ''

"विठ्ठल माउली ! विठोबा माउली ! तुकाराम."

सदोबांच्या मनाला त्रास होत होता, म्हणून ते असें भजन करूं लागले.

" फार वाईट झाली ही गोष्ट खरी ! '' खाशा म्हणाला, " पण आतां हिंमतरावांच्या जागीं आपल्या रंगूताई ना ? त्यांच्याकडे साखरगोटी आली, तरी ती सावळ्याचीच सदूकाका ! ''

सदूकाका हंसले आणि गंभीरपणें म्हणाले,

" आबा रंगी सावळ्याला देणार नाहीं. तो भुजंगरावाला देणार आहे. मला पक्कं ठाऊक आहे ते ! रंगी पण खूष दिसते आज तरी त्याच्यावर ! आज त्याला चहा देतांना पाहिलं मी ! --''

" सदूकाका, रंगी कुणावर फिदा होणार नाहीं, ती माझी आहे. विचारा तिला तुम्ही ! --''

सावळ्या एकदम चिडून बोलला.

" चैत्र तर उलटूं द्या. वैशाखांतल्या पहिल्या मुहूर्तावर रंगीचं लग्न आबा भुजंगरावाशी लावून देईल बघा ! -- '' सदोबांनी सरळपणें सांगितलें

" चैत्रांतच रंगीचं लग्न होऊन गेलं तर ! --''

खाशा म्हणाला.

" असं कुठं झालंय का ? तो गुंडोपंत भट असं कसं लग्न लावील चैत्रांत ?--''

" आम्हीच लावलं तर सदूकाका ! '' बजा गंभीरपणें बोलूं लागला. " हरीपुरा कॉंग्रेसला गेलों होतों आम्ही. तेथें महात्मा गांधींनीं पायंडा पाडून दिलाय साध्यासुध्या लग्नांचा. एकमेकांनी गळ्यांत माळा घातल्या कीं होतं तें लग्न. आतां अशीं लग्नं पुष्कळ होतात. त्याला आम्ही 'गांधी-विवाह' म्हणतों ! --''

" पण 'गांधीविवाह' आबाला पसंत पडणार नाहीं--''

सदूकाका जरा त्रासून म्हणाले.

इतक्यांत रखमा तशा रात्रीची तेथें आली. तिनें सदोबांना कांहींसें

सांगितलं. तरुण मंडळींना कांही न बोललेलें बरें, असें तिला वाटलें. सदोबा रखमाबरोबर निघाले. तिला खाशा म्हणाला.

"उद्यां सावळ्या रंगीचं लग्न लावून टाकूं! तुम्ही या लग्नाला!"

"मेल्यांनो कसलं लग्न लावताय! आबांच्या घरांत गोंधळ उडवून दिलाय चोरानं... ..."

रखमा सदोबाना घेऊन जलदीनें निघून गेली. सावळ्या त्याच्या मागून गेला.

# चांडाळ चौकडी ३

आबा मोरे याच्या गांवाबाहेरील वाडयांत चोरानें गोंधळ उडवून देण्यास वास्तविक रंगीची करणीच कारणीभूत होती !

ती त्या दिवशी घरींच होती. तिनें थाटमाट पण चांगलाच केला होता.

तिनें स्वत: सकाळचा चहा पुरुष मंडळींना नेऊन दिला होता. त्या वेळीं सदोबाही तेथें होते. भुजंगरावाकडे पाहून ती गालांतल्या गालांत हंसत होती !

रंगी खेळकर वृत्तीची होती. आबांना ती फार आवडत होती.

आबा मोरे यांचे वजन आंबेगाव भागांत चांगलेंच होतें. त्यांच्या वयाची चाळिशी उलटलेली होती. त्यांची उंची सुमारें सहा फूट असून त्याचा वर्ण चागला गोरा होता. भव्य कपाळ, सरळ नाक, ऐटदार मिशा आणि घारे डोळे ह्यामुळे त्यांच्याकडे पाहिलें कीं, हा गृहस्थ मोठा कारस्थानी असावा, असें कोणालाही वाटे.

तरुणपणी त्यांनी नाना ढंग केले होते ! त्यांना संतति होई, पण ती फार दिवस जगत नसे !

त्यांना गौराबाई ही साधीभोळी पत्नी मिळाली होती. त्या उभयतांचेंही रंगीवर प्रेम होतें.

—आणि रंगी तशीच कोणीही कौतुक करील अशीच खेळकर वृत्तीची मुलगी होती. दहा अकरा वर्षांची होईपर्यंत ती खेडयाच्या शाळेंत शिकली तेवढीच. त्यानंतर तिला आबांनीं शाळेंतून काढलें. त्यापुढें ती दिवसां बराच वेळ मळयांतच असे. तेथें मुलांमुलींत यथेच्छ खेळे. हलकें सलकें कामही

पण करी. सावळ्याची व तिची तेथेच लहानपणापासूनची झालेली गट्टी सर्वांना कौतुकाची वाटे !

आबांना रंगीचा फार लळा होता. तिचे आईबाप लहानपणीं वारले होते. तिचा एकुलता एक भाऊ हिमतराव हाही बारा वर्षांपूर्वी नाहींसा झाला होता. त्याची भली मोठी इस्टेट आबांनीं पूर्णपणें आपलीशी केलेली होती !

तसें कांहींही असलें, तरी रंगीविषयीं आबांना आपुलकी वाटे. ते तिचे लाड पुरवीत. तिच्यावर सहसा रागावत नसत, हें खरें !

भुजंगराव तिला अनुरूप वर आहे, हें आबांच्या मनानें अलीकडे पुरें घेतलेलें होतें. त्यांत कांहींसा त्यांचा स्वार्थी हेतुही होता !

ह्यापूर्वी मात्र आबांना सावळ्या पसंत होता. कारण त्यांच्या अंतःकरणांत कसली तरी एक टोंचणी सतत लागून राहिली होती. ती ते कोणासच उघड करून दाखवीत नसत ! कारण तसें करणें त्यांनाच धोक्याचें होतें. मात्र रंगीचे जास्तीत जास्त कल्याण झालें, म्हणजे त्यांना कांहींसें समाधान लाभणार होते !

तसें कल्याण भुजंगरावासारख्या कीर्ति मिळविलेल्या तरुणाशीं तिचा विवाह लावल्यानें होईल, असें त्यांच्या व्यवहारी वृत्तीला अलीकडे जास्त जास्त वाटू लागलें होतें खरें !

पण रंगीनें मनानें सावळ्यालाच वरलें आहे, ह्याची तितकीशी जाणीव आबांना नव्हती.

सकाळपासून भुजंगरावांना पाहून ती हंसे, डोक्यावरील पदर सरळ करीत त्यांच्याकडे तिरपी नजर टाकी. त्यामुळें तर भुजंगरावांवर ती नाखूष नाही, असें आबांचें अनुमान झालें असल्यास त्यांत नवल नाहीं !

दुपारीं आबा चावडींत कांहीं कामाकरितां गेले होते. भुजंगराव वाड्यांत एकटेच होते. आबा बाहेरच्या खोलींत आहेत की काय, ह पाहाण्याच्या मिषानें तिनें त्या खोलीत दोन तीनदां डोकावलें. तेथें भुजंगरावांना एकट्यांनाच पाहून तिनें लाजल्याचें दाखविलें आणि पदर डोकीवर ओढून घेऊन ती चपळाईनें निघून गेली ! पण भुजंगरावांच्या अंतःकरणांतून ती मुळीच दूर गेली नव्हती !

दुपारचा चहा त्यांना तिनेंच आणून दिला. त्या वेळीं ती गोड हंसली ! भुजंगरावांना वाटलें, रंगी आपल्यावर चांगलीच खूष आहे !

त्या दिवशीं आवशीच्या वेळीं चांदणें पण शुभ्र पडलें होतें. आकाश निरभ्र होतें. आकाशांतील चांदण्या चंद्राकडे टकमक पाहात होत्या !

उन्हाळयामुळें आबांनीं बाहेरील अगणांतच बैठक घातली होती. ते बैलांना कडबा घालण्याकरितां मागील बाजूच्या गोठयांत गेले होते. गडी माणसें घरीं गेलीं होतीं !

भुजंगराव एकटेच बैठकीवर बसले होते. आकाशांत चांदण्याकडे त्यांनीं टक लावली होती. कसल्या तरी गोड विचारांत त्याचें मन घुटमळलें होतें !

आबांच्या घरीं घारी नांवाची एक अस्सल खिलारी गाय होती. त्यांनीं ती लहानपणापासून पाळली होती. रंगीचा तिला आरंभापासूनचा लळा होता.

ती गाय भारी चपळ होती. रंगीखेरीज ती कोणाला आपल्या अंगाला हात लावूं देत नसे ! गोंजारूं देत नसे ! बांधूं देखील देत नसे !

घारी नुकतीच व्याली होती. तिला सुंदर कालवड झाली होती. रंगीखेरीज ती कोणालाच आपली धार काढूं देत नसे !

भुजंगराव अंगणांतील बैठकीवर विचारमग्न स्थितींत बसले होते, त्याच वेळी रंगी घारीची धार काढण्याकरितां हातांत स्वच्छ चरवी घेऊन अंगणांतून दरवाजालगतच्या गोठयाकडे जाऊं लागली. तिकडे जात असतां पायांत कांहीतरी टोंचल्याचें निमित्त करून ती भुजंगरावापासून थोडया अंतरावर वाकली. भुजंगरावांची दृष्टि तिच्याकडे होतीच. तेव्हां रंगीनें हंसत हंसत त्यांच्याकडे पाहिलें. नंतर ती तेथून पुढें गोठयाकडे जाऊं लागली.

रंगी गोठयाजवळ येतांच घारीनें हुंकार दिला. वासरानें आईकडे ओढ घेतली. रंगीनें वासरूं सोडलें. तें घारीच्या स्तनांना लागलें. घारी पान्हा घालूं लागली. रंगी घारीचें आचळ चोळूं लागली. लवकरच तिनें पूर्ण पान्हा घातला.

रंगीनें घारीच्या पुढें वासरूं बांधलें. चरवी गुडघ्यावर ठेवून ती धार काढूं लागली.

धार काढीत असतां ती गाणें गुणगुणत होती.

*सख्या रे मनमोहना।*
*येई सजणा ह्या रमणीच्या ऐकाया गाना!*

भुजंगरावांच्या कानीं गाण्याचे मंजूळ स्वर पडले. त्या गाण्यानें ते अगदी अधीर झाले—वेडेच होऊन गेले म्हणाना!—

वास्तविक भुजंगराव पुष्कळसे संयमी होते. आबांच्या घरी त्यांची नेहमीची ये जा होती. रंगीची व त्यांची चांगली जानपछान होती.

रंगीच्या सौंदर्याचें व चापल्याचें त्यांनीं अनेक वेळां कौतुक केलें होतें. रंगीनें नाजूक दृष्टीने आपल्याकडे पाहावें, म्हणून त्यांनीं यत्न करूनही पाहिला होता. पण त्यांत त्यांना आतांपर्यंत यश आलें नव्हतें.

पण आज भर तारुण्यात आलेली रंगी आपल्याकडे पाहून मधुर हंसत आहे, ह्याची त्यांना धन्यता वाटत होती. ह्याच तंद्रीत ते असतांना त्यांच्या कानीं तें गोड गाणें पडलें.

—आणि ते झटकन उठले. दबत दबत पुढे चालले. रंगीच्या मागील बाजूस जाऊन ते उभे राहिले.

रंगीनें गोठ्यांतील घडवंचीवर कंदील ठेवला होता. त्याच्या प्रकाशात ती धार काढीत होती.

तिचे खालींवर होणारे मांसल दंड मोठे मनोहर दिसत होते. तिच्या हिरव्या चोळींतून वरखालीं होत असलेला उन्नत भाग तिच्या गोड सौंदर्यात अनुपम भर घालीत होता!

भुजंगरावांच्या हालचालीवर त्या मिस्किल रंगीची नजरही पण होतीच.

थोड्या वेळानें भुजंगराव आणखी थोडे पुढें सरकले. त्यांनी हळूच "रंगू" म्हटलें.

आपण धार काढण्याच्या नादांतच आहों, असें रंगी पूर्णपणें भासवीत होती. त्यामुळें पुन्हा "रंगू" असे शब्द तिच्या कानी पडलेच!

ती मागें पाहून हंसली, पण पुन्हा दूध काढू लागली. भुजंगरावांना

आतां ज़रा जास्त धीर आला. ते आणखी पुढें सरकले. अगदीं तिच्या संनिध येऊन ठेपले.

रंगी गाणें म्हणतच होती.

भुजंगरावांना आता रहावेना. त्यांनी तिच्या खांद्यावर हळूच हात ठेवला. त्यांचें सर्वांग थरारले. अंगांत गोड झिणझिण्याही संचारल्या !

पण ती नागीण भुजंगरावांच्या स्पर्शामुळे बेहाय चवताळली ! ती एकदम उठून उभी राहिली ! तिच्या गुडघ्यांवरील दुधाची चरवी उपडी झाली ! तिच्या नेत्रांतून आग बाहेर पडूं लागली !

--आणि काय सांगावें, तिनें घारीच्या शेणाचा एक मोठा पोह उचलला आणि "मेल्या ! मेल्या !" असें म्हणत त्यांच्या तोंडावर फेकला !

"आबा ! आबा ! आबा ! भामटा आलाय ! चोर आलाय !" रंगी मोठमोठ्यानें ओरडत अंगणांतून घराकडे धांवत जाऊं लागली ! आबांच्या पत्नी गौराबाई घाबरल्या. त्या रंगीकडे धांवत आल्या. आबाही हातचें काम टाकून घरांत आले.

रंगी फार घाबरलेली दिसत होती. कांहीं तरी विशेष भयप्रद कारण घडल्याशिवाय ती अशी भिणारी मुलगी नाहीं, हें आबांना माहीत होतें.

"घरांत चोर शिरलाय--"

रंगीनें भीतभीतच म्हटलें.

आबा सावधगिरीनें घरांत तपास करूं लागले. मागील बाजूचा कडबा वाजल्याचा त्यांना भास झाला. हातांत फरशीची कुऱ्हाड घेऊन ते तिकडे गेले.

इकडे रंगीनें भयंकर अपमान केल्यामुळें भुजंगरावांच्या अंगाचा भडका उडाला. पण करतात काय बिचारे ? आणखी जास्त अपमान होऊं नये, म्हणून त्यांनीं धोतरानेंच तोंड पुसलें. आणि हळूच दरवाजांतून निसटून ते बाहेर पडले !

ते थेट आंबेझरीपर्यंत गेले. त्यांनीं तेथें पाण्यानें तोंड धुतलें. डोक्यावर पाण्याचे हाबके मारून मस्तक शांत करण्याचा प्रयत्न पण त्यांनीं चालविला !

सावळ्या आणि रंगी ह्या दोघांनींही आपली मानखंडना केली. दोघांचा हा गुप्त बेत असावा असें वाटून त्या दोघांचाही सूड घेण्याची कल्पना त्यांच्या डोक्यांत थैमान घालूं लागली !

पुन्हा ते आबांच्या वाड्याकडे वळले. रंगीनें आपल्या नांवाचा बोभाटा केला आहे कीं काय, ह्याचा अंदाज प्रथम त्यांना काढावयाचा होता !

त्या वेळीं आबा वाड्याच्या सर्व आवारांत हिंडून आले होते. त्यांना चोराचा सुगावा लागला नव्हता. ते रंगीकडे येऊन तिला खोदून खोदून माहिती विचारीत होते.

भुजंगराव दरवाजाच्या बाहेरील बाजूस दडून उभे राहून तें बोलणें ऐकत होते.

आबा विचारीत होते—

" रंगे, चोर आला म्हणतेस. त्या वेळी भुजंगराव अंगणांतच होते ना ? त्यांना कां नाहीं हांक मारलीस ? —"

" तें अंगणांत असते, तर त्यांनीं चोराला झोडपलें नसतें का आबा ! मी धार काढावयास गेलें, तेव्हांच ते बाहेर निघून गेले होते ! —"

रंगी चाचरत चाचरत बोलली.

" पण चोर वाड्यांत शिरला, हें तरी खरं का ? माझ्या वाड्यांत कोणी भामटा शिरण्याचं धाडस करायचा नाहीं ! माझ्या फरशीचं पाणी जगाला माहीत आहे ! —"

आबांनीं हातांत घेतलेली फरशी पुढे करून म्हटलें.

आबांच्या ह्या बोलण्यावर रंगीला उत्तर देतां येईना. ती घाबरल्यासारखें करूं लागली.

आबांना वाटलें, रंगी घाबरली. इतक्यांत रखमा तेथें आली. तिला गौराबाईनीं हांक मारून आणिलें होतें. रखमा रंगीच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली—

" रंगे, घाबरूं नको अशी ! आबासाबांच्या वाड्यांत कोणी भामटा शिरायचा नाहीं. त्याचा वचक गांवभर आहे ! —"

" मामी ! " रंगी जरा धीर दाखवून म्हणाली, " मी खरंच घोंगडी पांघरून आलेला माणूस पाहिला. भुजंगरावांकडे आला असेल, म्हणून मी

गप्प होतें. पण तो माझ्याकडच आला! त्यानं एक मला ठोसा दिला! दूध सांडलं! कंदीलपण त्यानंच विझविला! मी अगदीं खरं खरं सांगतें मामी! —"

रंगी अगदीं मनापासून बोलत असल्याचें दाखवीत होती. आबा आणि गौराबाई यांना तें खरें वाटत होतें. पण रखमाला कांहीं शंका येऊन तिनेंच विचारलें—

"रंगे, मग भुजंगराव तरी केव्हां बाहेर गेले? चोराचा पाठलाग करण्याकरितां ते बाहेर पडले कीं काय?—"

भुजंगरावांना वाटलें आतां ही संधि ठीक आहे. ते दरवाजांतून घाईनें आंत येत येतच म्हणाले,

"आबा, तो चोर नसावा. तो माझ्या पाळतीवर आलेला इसम असावा, तो माझा शोध रंगीजवळ काढीत असावा! मीही कांहीं बेसावध नव्हतों. मी त्याच्या मागें लागलों. पण तो दरवाजांतून झपाट्यानें निसटला. मी चांगला ओढ्यापर्यंत त्याचा पाठलाग केला. पण तो आंबराईच्या अंधारांत पळाला— "

भुजंगरावांचा शब्द कानीं पडला, त्याबरोबर रंगी घरांत निघून गेली. तिच्याबरोबर गौराबाईही गेल्या. भुजंगरावांचें बोलणें ऐकून आबांना आश्चर्य वाटलें. त्यांना कसला तरी एक संशय आला. थोडा वेळ त्यांनीं आणखी विचार केला. त्यांना खात्री वाटली. आणि त्यांनीं रखमाला विचारलें,

"रखमा, जेवायला आलाय का ग सावळ्या तुझ्याकडे?"

"कालपासन् तो घरीं आलाच नाहीं—" रखमानें उत्तर दिलें.

"मग तो कुठं असेल? सदोबांना हांक मार बरें?"

आबा संशयी मुद्रेनें बोलले.

रखमानेंच सदोबांना सावळ्याचें जेवण देऊन मळ्यांत पाठविलें होतें. आबांना सावळ्याचा संशय येत आहे, हें तिनें जाणलें; तिला वाटलें—

"भुजंगरावांच्या मागें सावळ्या हात धुवून लागेल देखील! रंगी-करितां भुजंगराव येथें ठाण मांडून राहिले आहेत. तेव्हां त्यांना आणखी अद्दल घडावी, म्हणून आबांच्या वाड्यांत सावळ्या येण्याचा संभव आहे—"

रखमा लवकर उत्तर देत नाहीं, हें पाहून आबा रागानें म्हणाले,

"रखमा, बोलत कां नाहींस? मला कळतंय सगळं! हा सारा बंडावा सावळ्याचा दिसतोय! तुला नाहीं पटत?—"

रखमाला आबांच्या म्हणण्यांत कांहीं अर्थ असावा, असें वाटत होतें. इतक्यांत भुजंगरावच जोरानें म्हणाले,

"तो सावळ्याच! माझी खात्री झाली अगदीं! नाहीं तर आंबराईनील साखरगोटीच्या बाजूला कोण पळत जाणार? काय दुष्टपणा हा! मी म्हणत होतों, कालच्या तंट्यामुळें पोलिस आले, तर त्यांना थातूरमातूर करून द्यावें वाटेस लावून! फार तर सैन्यभरतींत घ्यावं त्याला! पण ह्याचं कपट आतां चांगलंच कळलं—"

भुजंगरावांचें बोलणें ऐकून आबांनींही एक सुस्कारा टाकला आणि ते म्हणाले,

"साखरगोटी उतरण्यांत मला सावळ्याचा खोडसाळपणा दिसला! बापाची झाली तीच गत पोराची व्हायची, दुसरं काय? —"

रखमा आबांचें बोलणें ऐकत होती. आबांचे दुष्टाव्याचे उद्गार तिच्या मनांत भीति उत्पन्न करीत होते. त्यामुळें तिचे आंग थरारलें!

"रखमा, जा सदोबांना माझ्याकडे पाठव पाहूं—"

आबा म्हणाले. त्यांना आतां भुजंगरावांशीं बोलावयाचें होतें. म्हणून त्यांना रखमा तेथें नको होती.

रखमालाही तेथें उभें राहाणें नकोच होतें. तिला सावळ्याला इशारा द्यावयाचा होता. सदोबा मळ्यांत गेले होतेच. त्यांना हांक मारण्याच्या निमित्तानें ती तडक मळ्याकडेच गेली. तेथें सावळ्याचे मित्र दिसल्यामुळें ती त्याला विशेष कांहीं बोलली नाहीं. सदोबांना घेऊन ती जलदीनें घराकडे निघाली होती.

तिला पोंचविण्यासाठीं सावळ्या त्यांच्या बरोबर आलाच होता. ते सर्व हळूहळू बोलत आबांच्या घरापर्यंत आले.

रखमा मळ्यांत सदोबांस हांक मारण्यास जात आहे, हें रंगीस माहीत होतें. त्यांच्याबरोबर सावळ्याही आल्याशिवाय राहाणार नाहीं. अशी तिची

कल्पना होती. म्हणून ती बर्हिदिशेच्या निमित्तानें तपेली घेऊन वाड्याच्या बाहेरील बाजूस घुटमळत होती.

अपेक्षेप्रमाणें रंगीला सावळ्या भेटला. तिला सारी गंमत सावळ्याला केव्हां सांगेन असें होऊन गेलें होतें. पण खाशा, बजा वगैरे मित्रांनीं धांवतच येऊन तेथें सावळ्याला गांठलें.

सारेजण सदोबांच्याच घराकडे वळले. घरांत गेल्याबरोबर तेथें रखमा ऐकलेली हकीकत सर्वांना सांगत होती.

मिस्किल रंगी एकसारखी हंसत होती ! सावळ्या तिच्याकडे कौतुकानें पाहात होता !

  

पण त्याचवेळी भुजंगरावही सावळ्यासंबंधी आबांजवळ बोलत होते. अर्थातच ते सावळ्यास कळणें शक्य नव्हतें !

भुजंगराव म्हणत होते--

"सावळ्याचा कांटा प्रथम येथून काढला पाहिजे, आबासाहेब ! फारच डाळ नासली आहे त्यानें ! त्याला सैन्यभरतींत कसें तरी गुंतवा आबासाहेब ! शूरपणा दाखविण्याची संधि पुन्हा येणार नाही अशी ! 'साळुंख्यांच्या कुळाचा मोठेपणा वाढविशील तूं ! नतर रंगी पण तुला देईनच कीं' असं कांहीं तरी सांगा आणि घाला त्याला एकदां रिक्रूटभरतीत !--"

"खरं हें सारं भुजंगराव" आबा बोलूं लागले, "कार्टीला पण आतां जास्त कळूं लागलं आहे. तीही पण अलीकडे त्याच्या मागें मागेंच असते. तेव्हां त्याला येथून उचलला पाहिजे, हें खरं--"

भुजंगराव थोडा वेळ स्वस्थ होते. त्यांच्या मनांत आणखीही भयंकर विचार येत होते. तसें करण्याचा निश्चय त्यांनीं त्या वेळीं केलाच. पण आबांना त्या वेळीं तो त्यांनी सांगितला नाही. तसें करण्यास त्यांना ती संधि योग्य वाटत नव्हती. कारण आबांच्या पत्नी गौराबाई ह्या जेवणाची वर्दी देण्यासाठीं किती वेळ तिष्ठत उभ्या असलेल्या भुजंगरावाला दिसत होत्या. आबांचें त्यांच्याकडे लक्षच नव्हतें !

त्या दिवशीं जेवणास बराच उशीर झाला होता. मोलकरीण एका बाजूच्या कोपऱ्यांत पेंगत बसली होती. आबांच्या घरीं आवशीस गडीमाडसे

नसत; तीं आपआपल्या घरीं जेवावयास जात. रात्रीं मात्र राखणीस सर्वजण वाड्यांत येत असत. तीं येऊन झोंपली देखील होतीं! बारा वाजण्याचा सुमार झाला होता त्या वेळीं!

जेवणास बसत असतां आबांनीं रंगीची चौकशी केली. ती घरांत नसल्याचें त्यांना समजलें. त्यामुळें आबांना तिचा विलक्षण राग आला. ते गौराबाईनाच वेडेंवांकडें बोलूं लागले. रंगी रखमीच्या घरीच ह्यावेळीं गेली असली पाहिजे, हें त्यांनीं ताडलें.

ते जेवणाच्या पाटावरून ताडकन उठले आणि रखमीच्या घराकडे चालले.

रखमाच्या घरांत शिरतांच आबांना अनपेक्षित देखावा दिसला!

खाशा, बजा वगैरे गुंड तेथें त्यांना दिसले.

त्यांनीं अलीकडे लोकांवरील आबांच्या दबदब्याचा फुगा फोडण्यास सुरुवात केली होती!

आबा त्यांना चांडाळचौकडी म्हणत.

त्या मंडळींत सावळ्या होताच आणि रंगीही पण होती.

त्यामुळें आबांच्या आंगचा भडका उडाला!

## अकल्पित घटना

## ४

आजबा ज्यांना गुंड किंवा चांडाळचौकडी अशीं नांवें ठेवीत, तशा गुंडांच्या टोळ्या महायुद्धाच्या सुरुवातीनंतर सात आठ महिन्यांच्या अवधींत पुष्कळ ठिकाणीं निर्माण झाल्या होत्या. त्या गुप्तपणानें आपला कारभार चालवीत असत. तऱ्हेगांव तालुक्यांत त्या टोळ्यांनी बराच धुमाकूळ घातला होता!

ह्या टोळ्या त्या भागांतील श्रीमंत लोकांना धाकदपटशा दाखवीत! त्यांना खंडण्या मागत! त्या सक्तीनें वसूल करीत. कोणी टाळाटाळ करण्याचा प्रयत्न केला, तर रात्रीं बेरात्री त्यांच्या घरावर हल्ले चढविण्यास ह्या टोळ्यांतील लोक कमी करीत नसत!

आणि गंमत अशी कीं, हे लोक अशा प्रकारें मिळालेलें धन, किंवा धान्य पुष्कळसें गोरगरिबांना वांटीत!

ह्यामुळें कंगाल स्थितीतील लोकांची सहानुभूति ह्या लोकांकडे झुके. त्या लोकांच्या दऱ्याखोऱ्यांतील झोंपड्या किंवा गांवांतील लोकांचें लक्ष जाणार नाही, अशी मोडकी तोडकीं घरें त्यांचीं आश्रयस्थानें होत!

मध्यम स्थितीतील लोकांच्या नजरेस ह्या टोळ्यांतील लोक पडत नसत असें नाहीं, पण कोणी जावें त्यांच्या वाटेला, असें म्हणून ते केव्हांही आपल्या कानांवर हात ठेवीत!

पानगांवचा मन्या रामोशी ह्या सर्व टोळ्यांचीं सूत्रे अत्यंत गुप्तपणे आणि कौशल्यानें चालवीत असे! तो त्याचा गुप्तपणा इतका असे की, भुजंगरावांना देखील त्याचा यत्किंचित संशय वाटत नव्हता! भुजंगरावांचा मदतनीस म्हणून त्याची ख्याति होती. भुजंगराव सैन्यभरतीच्या दौऱ्यावर

असोत किंवा सरकारी अधिकाऱ्याच्या भेटीस निघोत, मन्या त्यांच्या बरोबर अगदीं सावलीसारखा असे.

मन्या रामोशी सडपातळ, मध्यम उंचीचा, पंचविशी उलटलेला तरुण होता. तो निमगोऱ्या वर्णाचा आणि सरळ नाकाचा असून त्याची दृष्टि अत्यंत तीक्ष्ण होती.

चपळाईंत त्याची बरोबरी करणारा तरुण क्वचितच सांपडे! उंच उंच भिंतीवर तोल सांभाळून चढणें, काठीच्या साहाय्यानें उंच कुंपावरून उडी मारून जाणें, बंदुकीनें नेम बरोबर साधणें हा तर त्याच्या हातचा मळ असे!

मात्र त्याच्या अंगीं असलेला सांगण्यासारखा कोणता मोठा दोष असेल, तर तो दारूच्या व्यसनाचा होय!

ह्या नव्या तरुणांनी श्रीमंत लोक म्हणजे भांडवलवाले आणि गरीब लोक म्हणजे मजूर असल्या तत्त्वज्ञानाची भाषणें पुष्कळ सभांतून ऐकली होती. त्यांचा पगडा त्यांच्यावर चांगलाच बसला होता! ह्या अर्धवट ज्ञानाचा विकृत परिणाम त्यांच्या चळवळींत झालेला दिसून येत असे!

भुजंगरावाबरोबर सैन्यभरतीच्या सभांना मन्या लष्करी गणवेष घालून जात असे.

आदर्श सैनिकाचा नमुना म्हणून भुजंगराव त्याच्याकडे बोट दाखवीत.

मन्या अशा सभांना गेला म्हणजे तो दलित वर्गाचें सूक्ष्म निरीक्षण करी. त्या वेळी त्यांची कमालीची विपन्नावस्था त्याच्या नजरेस येई. अशाच एका सैन्यभरतीच्या दूरच्या दहिवडीच्या सभेस भुजंगरावांना दुसऱ्या दिवशी जावयाचें होतें. त्याची आठवण त्यांना राहिली नव्हती. पण त्या दिवशीं सकाळी मन्या भुजंगरावांची मोटार घेऊन आला, तेव्हां एकदम त्यांच्या लक्षांत ती गोष्ट आली.

प्रवासाची तयारी करीत असतां भुजंगराव आबांना हळुहळू सांगू लागले--

"रंगीवर चांगली नजर ठेवा, आबासाहेब! सावळ्या बिघडवील तिला! आतां सावळ्याचा कांटा काढूं लवकरच! पोलिस स्टेशनवर जाऊन सावळ्याची चांडाळचौकडीच गिरफदार करण्याची तजवीज करीत आहें, मी!

"पोरटीला आतां घरांतच डांबून ठेवतों, तुम्ही तिची काळजी करूं नका, भुजंगराव—"

आबा जरा चाचरतच बोलले.

❦ ❦ ❦

ठरल्याप्रमाणें दहिवडीस दुपारच्या चार वाजण्याच्या सुमारास भुजंगरावांची मोटार आली.

तेथें पन्नास साठ गांवची तरुण आणि मध्यम वयाची पुरुष माणसें जमलेली होती. त्या भागांत त्यावर्षी पुरेसें धान्य पिकलेलें नव्हतें, त्यामुळे तेथील लोकांची अन्नान्न दशा झालेली होती.

सभेस आलेल्या तरुणांत बरेच जण पाप्याचे पितर दिसत होते! कपडालत्ता महाग झाल्यामुळे त्या लोकांचें नेसण्याचें वस्त्र अपुरें होतें! त्यांच्या पैरणी फाटलेल्या होत्या! त्यांनी खांद्यावर टाकलेल्या घोंगड्यांना मोठे मोठे भोसके पडलेले होते! विलक्षण महर्घतेमुळें जनावरांना लागणाऱ्या चाऱ्याकरितां त्यांना पैसा पुरा पडत नव्हता; त्यामुळे त्यांचे गाई, बैल कसायांच्या दावणीस गेले होते! लोकांची ही हृदयद्रावक स्थिति पाहून आणि त्यांची सारी माहिती ऐकून मन्याच्या डोळ्यांत अश्रू उभे राहिले! भुजंगरावांच्या हृदयालाही पाझर फुटला!

आपल्या भाषणांत प्रथमच भुजंगराव म्हणाले—

"सैन्यांतच सर्वांना दाखल होतां येईल, असें नाही. तरुणांना तसें करणें शक्य आहे. इतरांना शहरांत चाललेल्या युद्धाच्या अनेक कामधंद्यांत पुष्कळ मजुरी मिळेल. तरी त्याचा फायदा लोकांनी घ्यावा. म्हणजे त्यांची झालेली अन्नान्न दशा तरी कमी होईल!—"

एका खेडवळानें मध्येंच विचारलें—

"पुन्या म्हम्हइंत लइ कामधंदा मिळल म्हननां. पन ततं जान्याला, आट चार दिस जगन्याला पैस हवंत ना? त्या लंकंत सोन्याच्या इटा हैती! हतंच आमाला काम द्या!—"

"कांहीं हरकत नाहीं. आपण तसाही प्रयत्न करूं". वेळ मारून नेण्याकरितां कांहीं तरी बोलावयाचें म्हणून भुजंगराव बोलले.

नंतर ते आपल्या मुख्य विषयाकडे वळले.

कॉंग्रेसच्या चळवळींत चांगले वक्ते म्हणून भुजंगरावांची प्रसिद्धि झाली होती. पण आज त्यांच्या वक्तृत्वाचा जम बरोबर बसेना. त्यांचें सारें लक्ष आंबेगांवाकडे गेलेलें होतें.

तशा मनस्थितींत भुजंगराव जें कांहीं बोलले त्याचा सारांश असा होता—

"मराठ्यांच्या काळीं आपल्या माणदेशी तट्टांनीं दिल्ली गांठली होती! तेव्हांच्या संताजी घोरपडे, धनाजी जाधव ह्या शूरांची आठवण करा; आणि सैन्यांत दाखल व्हा! आतां कोणालाही सैन्यांत प्रवेश मिळतो. आतां येथें लष्करांत दाखल झालेले कांहीं लोक आले आहेत. त्यांना खुशाल विचारा. त्यांत ठक्या मांग, बहिरू कोळी, मारुती जमदाडा वगैरे लोक आहेत.

लष्करी पोषाखांतील मन्या रामोशी कसा तरतरीत दिसतो तो पाहा. तुम्हांला पगार, खाणें, पिणें, कपडालत्ता लष्करांत भरपूर मिळेल. तुमच्या बायकापोरांच्या पोटापाण्याची सोय सरकार चांगली करील—"

भुजंगरावांनीं भाषण लवकरच आटोपतें घेतलें.

अन्नाला मोताद झालेल्या पुष्कळशा तरुणांनीं सैन्यभरतींत नांवें दाखल केलीं. कांहींना वाटलें,—"आज दोन घांस तरी सुखानें खाण्यास मिळतील. घरी उपाशीं मरण्यापेक्षां सैन्यांत दाखल होण्यानें भुकेनें होणारे हाल तरी वांचतील!—"

भुकेच्या यातनांपेक्षां अधिक दुःखदायक यातना तरी कोणत्या असणार, असें वाटून निर्भयतेनें लोक नांवें नोंदीत होते!

दहिवडीचीं कामें आटापतांच भुजगरावांची मोटार सायंकाळच्या सुमारास परत निघाली. प्रथम आपल्या पानगांवीं जावें, असें त्यांनीं ठरविलें होतें. पण सावळ्याचा बंदाबस्त करण्याकरितां ते प्रथम तालुक्याचें ठाणें असलेल्या तऱ्हेगांवींच गेले. तेथें त्यांनीं आपल्या मनासारखी सगळी व्यवस्था करून घेतली. त्यामुळें त्यांच्या मनास जरा समाधान वाटलें.

आणखी चार पांच दिवस भुजंगराव दौऱ्यावरच होते. आपल्या गैरहजेरींत सावळ्याचा सूड उगवला जावा, अशी त्यांची इच्छा होती. म्हणून त्यांनीं दौऱ्याचा कार्यक्रम वाढविला होता!

दौऱ्यावर असतांना मन्या भुजंगरावांच्या सर्व हालचालींचा मोठ्या कौशल्यानें उपयोग करून घेत असे. सैन्यभरतीकरितां ज्या सभा होत 'त्यांत

त्याचे अनुयायीही जमत असत ! आपल्या कामाला योग्य असे तरुण शोधून ते त्यांना आपल्या जाळ्यांत ओढीत असत. शिवाय भुजंगरावांच्या कार-स्थानांची बित्तंबातमी मन्या मिळवीत असल्यामुळें सावळ्या, खाशा वगैरेंना तो आंतून अगदीं बिनचूक सूचना देत असे !

भुजंगराव रंगीकरितां फार उत्सुक आहेत, हें मन्याला माहीत झालेलें होतें. मन्याशीं बोलतांना मधून मधून तो विषय भुजंगरावांच्या तोंडून निघे.

दौरा संपल्यानंतर ते पानगांवीं जाण्यास निघाले. मन्या आणि भुजंगराव हे दोघेच त्या वेळीं मोटारींत होते.

मन्याचा आणि सावळ्याचा आंतून फार लोभ आहे, हें भुजंगरावांना माहीत नव्हतें, त्यामुळें ते जरा मोकळेपणानें मन्याला म्हणाले—

"मन्या एक काम कर कीं ! सावळ्या, खाशा वगैरेंना रिक्रूट-भरतींत आण कीं ! ..."

"सावळ्याला मी सैन्यभरतींत दाखल करतोंच बघा." मन्या झटकन म्हणाला, "पण खाशा, बजा ह्यांना मी नाहीं भरतींत आणणार !—"

"तसं कां पण ?—"

भुजंगराव मन्याकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहात बोलले.

"फक्त सावळ्या एकदां दूर गेला, म्हणजे तुम्हांला रंगी मिळणार ! मग दुसरे काय करतात आपल्याला ?"

मन्या भुजंगरावांना टोंचून बोलला !

"मन्या, तू भुजंगरावाला अजून ओळखलं नाहींस ! रंगीपेक्षां सवाई पोरी माझ्या पायाशी लोळण घालीत येतील ! रंगीकरितां झुरणारा मी माणूस नाहीं !" भुजंगराव आवेशानें म्हणाले.

"मी कुठं म्हणतो तसं !" मन्या बोलूं लागला, "रंगीचं तुमच्यांवर मन आहे मला ठाऊक आहे ! पण सावळ्या तिला नाचवील, म्हणून माझं म्हणणं असं ! सावळ्याला तुरुंगच दाखवावा भुजंगराव !"

मन्या अगदीं भुजंगरावांच्या मनांतलेच बोलत होता. त्यामुळें ते त्याच्यावर खूष झाले आणि सावळ्यावर आपण कोणते आरोप ठेवले आहेत; आबांनीं देखील त्याच्याबद्दल कोणत्या तक्रारी केल्या आहेत; पोलिस

सावळ्याला केव्हां पकडणार आहेत; वगैरे गुप्त हकीकत त्यांनीं मन्याच्या कानांवर हळुहळू घातली !

त्याच वेळीं मन्याला भुजंगरावाच्या विषारी अंतःकरणाची चांगली कल्पना आली !

मन्यानेच भुजंगरावांना आतांपर्यंत चांगला हात दिला होता. श्रीमत पण केलें होतें !

मन्या लहानपणापासून चोरीचा धंदा करी. त्याच्या बापानें त्याला त्या धंद्यात प्रवीण केलें होतें !

मन्या संस्थानच्या हद्दीत दरवडे घाली आणि मिळालेलें सोनेंनाणें भुजंगरावांच्या स्वाधीन करी ! भुजंगराव तें आटविण्याची व्यवस्था करीत ! मन्याला जरूर लागेल तेवढे पैसे देत ! पण ते मिळालेल्या संपत्तीच्या मानानें अगदीं अल्प असत ! पांच सहा वर्षांच्या अवधीत भुजंगराव चांगले श्रीमंत झाले होते. सरकार दरबारींही त्यांनीं वजन ठेवलें होतें. राजकीय चळवळींतही ते मराठ्यांचे पुढारी म्हणून नांवारूपास चढले होते. अशा रीतीनें संपत्ति आणि सत्ता त्यांच्या पायांशीं लोळण घालीत होती.

फक्त एकच उणीव त्यांना भासत होती ! ती प्रेमाची उणीव भरून काढण्याकरितां त्यांच्या आतां खटपटी चालल्या होत्या !

मन्या त्यांच्या बरोबर नेहमींच असे. तो त्यांचा शरीरसंरक्षक होता असें म्हणण्यास हरकत नव्हती. त्यानें भुजंगरावांच्या संगतीनें पुष्कळ राजकीय सभा पाहिल्या होत्या. त्यामुळें चांगल्या चांगल्या लोकांचीं भाषणें त्याच्या कानांवर पडलीं होतीं. त्यांतील श्रीमंतांविरुद्ध गरीब; भांडवलवाल्यांविरुद्ध मजूर असल्या विचारांचीं भाषणें त्याला पटत होतीं.

कां नाहीं पटणार ? कंगालांना मोहिनी घालणारी जादू ह्या तत्त्वज्ञानांत आहेच.

अलीकडे त्याला भुजंगरावांच्या लोभी वृत्तीचा तिटकारा येऊं लागला होता. त्यांनाही आपल्या कर्तबगारीची थोडी चुणूक दाखवावी, असें त्याच्या मनानें घेतलें होतें ! आज तो त्याच विचाराच्या तंद्रींत मोटार चालवीत होता !

पानगांवच्या खिंडीजवळ मोटार आली. त्या वेळीं बराच अंधार

पडला होता. मडकही चांगलीशी नव्हती. मोटार सावकाश चालविणें भाग होतें.

खिडींतून मोटार पुढे जाऊं लागली. पण एके ठिकाणीं रस्त्यावरच दगडांचा ढीग घातलेला दिसला ! मन्या सावध होता म्हणून बरें, नाहीतर अपघातच होणार होता ! त्याला मोटार थांबवावी लागली !

इतक्यांत मोटारीवर हल्ला झाला ! भुजंगराव गांगरून गेले ! खिशात पिस्तूल असून ते बाहेर काढण्याचें त्यांना सुचेना ! मन्या मात्र बंदुकीच्या फैरी झाडत होता. त्याच्या गोळ्या अचूक लागल्या की काय कोणास ठाऊक ! हल्ला करणारे पळून गेले खरे !

भुजंगरावांना हा नवा अनुभव मिळाला. पुन्हा दरवडेखोर हल्ला करतील, अशीही भीति त्यांना वाटली. म्हणून ते परत तऱ्हेगांवकडे निघाले.

तऱ्हेगांवीं पोलिस-ठाण्याजवळ त्यांची मोटार थांबली. भुजंगराव आपली बॅग शोधू लागले. त्यांना ती सांपडेना. तेव्हां भुजंगराव म्हणाले--

"मन्या, आपली बॅग रे कोठे आहे ? चोरट्यांनीं लांबविली तर नसेल ना ? ..."

मन्या काहीं बोलेना. तो कमल्या तरी काळजीत दिसत होता. तेव्हां त्याला भुजंगराव म्हणाले--

"मन्या बोल कीं ! बॅग कोठे आहे का पाहा ! कसला विचार चालविला आहेस ? ..."

"जाऊं द्या बॅग ती ! चोरट्यांनी लांबविली असेल ! पण मला वाईट वाटतंय, माझ्या बंदुकीनं कोणी मेलें तर नसेल ना ? माझ्या हातून हिंसेचें पाप घडलें भुजंगराव ! तुमच्याजवळ पिस्तूल असून तुम्ही उडविलं नाहीं ! मी मात्र पाप केलं ! ... ... "

"अरे, पाप कसलें आहे ह्यांत ?--"

"पापच तें ! मी आहे गांधींचा चेला ! मी नाहीं कोणाला मारणार !"

"वा रे गांधीच्या चेल्या ! महात्माजी दारू पिऊं नको म्हणून सांगतात, मग तू रे कशी दारू पितोस ?--"

"सखीची खोड मोडण्याकरितां मी दारू पितो भुजंगराव ? ती म्हणते दारू पिऊं नको. मी मर्द बायांच्या आहारीं जाणारा नाहीं भुजंगराव !

बायकांच्या नादीं लागणारे भित्रे होतात. रंगीचा ध्यास लागला म्हणून तुम्ही भ्याला ! खिशांतलं पिस्तूल देखील तुम्ही काढलं नाहीं ! —"

मन्याचें तत्त्वज्ञान उपरोधिक होतें, हें भुजंगराव जाणत होते. त्यांच्याशीं फुका वाद करण्याचें त्यांनीं थांबविलें.

बॅग गेली ! तिच्याबरोबर तींत असलेले दोन हजार रुपयेही गेले ! पैसे गेले म्हणून भुजंगराव तळमळत होते ! मद्य घेण्यास पैसा राहिला नाहीं, म्हणून मन्याही तळमळूं लागला !

ह्या अकल्पित घटनेनें सावळ्यावर आणखी आरोप आणतां येतील, असें लक्षांत आल्यावर भुजंगरावांची तळमळ कमी कमी होऊं लागली.

भुजंगरावांस ठरल्याप्रमाणें अगदीं बेमालूम चाट बसली ; आपण ठरविलेली गोष्ट बिनचूक पार पडली; ह्या आनंदांत मन्या देखील आपल्या आवडत्या दारूला त्या रात्रीपुरतें विसरला !

## नवा खटाटोप

# ५

रंगीला घराबाहेर जाऊं द्यावयाचें नाहीं, हें आबांचें म्हणणें गौराबाईना पटेना. अशा रीतीनें तिला वागविल्यास त्यांत आपलेंच हंसें होईल, असें त्या म्हणूं लागल्या. पण प्रथम आबांना आपल्या पत्नीचें म्हणणें पटलें नाही.

वास्तविक पाहातां आज आबांना आलेलें ऐश्वर्य रंगीचेंच होतें. आबा राहात असलेला वाडा रंगीच्या वडिलांचा होता. अर्थात् तो तिचा एकुलता एक भाऊ हिंमतराव याचा होता. आबांनीं तरुणपणीं नाना रंगढंग केले होते. त्यामुळें त्यांना कर्ज झालें होतें. हिंमतरावांचा जमीनजुमला, पैसाअडका हातीं आल्यानें ते ऋणमुक्त तर झाले होतेच, शिवाय आंबेगांवच्या सधन गृहस्थांत त्यांची गणना होऊं लागली होती! असें असतां त्या संपत्तीच्या खऱ्या मालकिणीला बंधनांत ठेवण्याचें पाप आबा करीत होते!

पण आबांच्या मनाला कसल्याच पापाची दिक्कत वाटत नव्हती. हें प्राप्त झालेलें ऐश्वर्य देखील आबांच्या पदरीं सरळ मार्गानें पडलेलें नव्हतें, असा लोकापवाद होता खरा! पण तसल्या लोकापवादाची पर्वा आबांना नव्हती. हिंमतरावांच्या मृत्युपत्राप्रमाणें त्यांच्या मिळकतीचा ताबा सरळ आबांकडे आला होता.

ह्या कामांत गुंडंभट आणि मगनशेठ ह्यांची सर्वस्वीं मदत आबांना झाली होती, त्यामुळें तें मृत्युपत्र बनावट असल्याचा भाऊबंदांनीं केलेला दावा खोटा ठरून आबा विजयी झाले होते!

पण त्यांचें आंतलें मन सांगे कीं, हिंमतरावांची सारी मिळकत रंगीचीच

आहे ! म्हणूनच रंगीला घरीं डांबून ठेवावें, तिचे बाहेर जाणें बंद करावें, असें भुजंगरावांनीं सुचविले असलें, तरी आबांना मनापासून तें तितकेसें पटत नव्हतें !

गौराबाईना रंगीच्या शुद्ध आचरणाची जाणीव असल्यामुळे त्याना ती कल्पना देखील पसंत नव्हती. पण बायकोच्या मताची तितकीशी पर्वा करणारे आबा नव्हते.

आंबराईतील मळ्याची राखण रंगी अशी काळजीने करी की, तें काम पगारी गड्यानेंही होणें शक्य नव्हतें. ही जाणीव आबांना होती. पण रंगी मळ्यांत गेल्यास सावळ्या तिला भेटेल आणि आणखी नव्या कटकटी निर्माण होतील असें त्यांना वाटत होते. म्हणून थोडे दिवस त्यांनीं तिला मळ्यांत जाऊं दिले नाही.

सावळ्या आणि रंगी यांचा विवाह व्हावा, अशी आबांची पहिली इच्छाही होती. सावळ्या भाबडा आहे, तो कांही हिमतरावांची मिळकत रंगीच्या मालकीची आहे, असं म्हणणार नाहीं. त्यामुळे तंटाबखेडा केव्हांही माजण्याचें कारण नाही, असें त्यांना वाटत होतें.

पण "साखरगोटी माझी आहे, मीच तिचे आंबे उतरणार" ह्या सावळ्याच्या वल्गनांनीं आबांचें सावळ्यासंबंधीं पहिलें मत बदललें !

भुजंगरावांचा स्वतःचा मोठा जमीनजुमला आहे. त्यांच्याजवळ आतां मायाही चांगली झाली आहे. त्यामुळें रंगीच्या वारशाच्या हक्काचा विचार त्यांना यःकश्चित वाटेल. रंगीचें सौंदर्य हेंच भुजंगरावांना बहुमोल वाटत आहे, म्हणून आबांची सहानुभूति आतां भुजंगरावांकडे वळली होती.

पण लग्नाचा विचार असा व्यापारी पद्धतीनें होण्याचे जुने दिवस गेले. प्रेमाच्या ओलाव्यानेंच ह्या विचारांची जोपासना होते आणि ते सुफल होतात, ही नवी जाणीव आबांना तितकीशी नव्हती !

रंगीकडे वारसाहक्कानें जाणाऱ्या संपत्तीकडे भुजंगराव दुर्लक्ष करतील, अशी खोटी आशा आबांना वाटत होती. गरिबांना वाटणाऱ्या संपत्तीचा मोह फार थोड्या प्रमाणांत असतो. संपत्तीच्या वाढत्या प्रमाणांत श्रीमंतांचा हा मोह वाढतच जातो. त्यामुळें क्षुल्लक फायद्याकरितांही ते प्रयत्नांचा

आटापिटा करितात, ह्याची जाणीव आबांना नव्हती. आपल्या स्वार्थापुरतें आपल्याच दृष्टीनें पाहाणाराची अशीच स्थिति असते !

निवडणुकींत मतें मिळवून देण्याचें कौशल्य भुजंगराव आणि आबा ह्यांच्या अंगी आहे, असें कॉंग्रेसच्या पुढाऱ्यांनाही दिसून आलें होतें. म्हणून कांग्रेसच्या अमदानींत भुजंगरावांबरोबर आबांनाही मानमरातब मिळू लागला होता.

कॉंग्रेसच्या मद्यपानबंदीची झळ आबांनाही लागली होती. कारण त्यांचा गांव दारूबंदीच्या कक्षेत होता. त्यामुळें त्यांना स्वतःला मद्याचा घोट मिळणें दुर्मिळ झालें होतें !

आतां तिकडील मद्यपानबंदी उठावयाची होती. आबांचा विचार भुजंगरावांच्या साहाय्यानें एक दोन गुत्त्यांचा मक्ता घेण्याचा होता. त्यांत पुष्कळ फायदा होईल, अशी त्यांची कल्पना होती, म्हणूनही भुजंगराव सध्यां त्यांचे आवडते झाले होते !

त्यांच्या आवडीचें हें कारण गौराबाईनी जाणलें होते. रखमालाही तें कळलें होतें.

स्वार्थाच्या रोखानेंच आबाच्या हालचाली चालत असत. शेताची राखण, गाई म्हशीची जपणूक रंगी फार काळजीनें करी. त्यामुळें आबांचा त्रास वांचे; पैसा वांचे आणि मनामारखी कामं होत. म्हणूनही रंगी त्यांना प्रिय होती.

दोन चार दिवस रंगीला घरांतच डांबून ठेवल्यानें तिच्या हातून हीं कामें होईनात. आबांचें नुकसान होऊं लागलें.

गाय दूध देईना ! मळ्यांतील भाजीपाल्याची चोरी होऊं लागली !

सावळ्या गांवी नव्हता. चार पांच दिवस कोणास त्याचा ठाव ठिकाणा समजलेला नव्हता. खाशा, बजा वगैरे त्याचे मित्रही गांवीं नव्हते. कोणी म्हणे, सावळ्या सैन्यांत शिरला. कोणी म्हणे, सावळ्याला पोलिसांनीं पकडलें !

ह्या बातम्यांनीं रंगी काळजींत पडली. तिला कांहीं सुचेना. तिच्या हातून कामधंदा होईना. ती चिडखोर बनूं लागली.

भुजंगरावांच्या फजितीची खरी हकीकत तिनें अद्यापि कोणास

सांगितली नव्हती. रखमास देखील ती कांहीं बोलली नव्हती ! ती गंमत सावळ्याला प्रथम सांगावी, अशी तिची इच्छा होती. त्याकरितां ती त्याची वाट पाहात होती. पण सावळ्याचा पत्ताच नव्हता !

रंगी उदासवाणी झाली. तिला अन्नही गोड लागेना. गौराबाईना तिच्या मनःस्थितीची कल्पना आली. पण त्यांना कांहीं करितां येत नव्हतें !

आबांच्यावर त्यांचें तितकेंसे वजन नव्हतें. त्या सुंदर होत्या, पण त्यांचा एक डोळा चकणा होता, म्हणून आबांना त्या आवडत नव्हत्या !

आबांचें खरें म्हणा किंवा खोटें म्हणा, रखमावर लक्ष होतें किंवा प्रेम होतें. तसें कांहीं तरी होतें खरें !

रखमानें सांगितलेलें आबा सहसा मोडत नसत ! गौराबाईना त्यामुळें रखमाचा मत्सर वाटे. पण रखमाचें वर्तन शुद्ध असल्यामुळें गौराबाईंच्या मत्सराची परिणति द्वेषांत झाली नव्हती.

आबांचें मन वळविण्याचें सामर्थ्य रखमात होतें, हें लोकांनाही दिसत असे; पण त्याचें कारण कोणी कांहीं म्हणत, कोणी कांहीं म्हणत; पण खरें कारण कोणांसच ठाऊक नव्हतें !

सावळ्या आणि रंगी याच्याप्रमाणेंच आबा आणि रखमा यांचें लहानपण शेतांत काम करण्यांत, खेळण्याबागडण्यांत गेलें होतें. लहानपणीं एकमेकांचा ओढा एकमेकांकडे असे. सावळ्या आणि रंगी याप्रमाणें आबा आणि रखमा हा त्या वेळचा लोकांच्या कौतुकाचा विषय होता !

आईबापाच्या लडिवाळपणामुळें रखमाचें लग्न लहानपणीं झालें नव्हतें. ती वयांत आली, तेव्हां तिचें लग्न आबांशीं लावण्याचा विचार तिच्या वडिलांचा होता.

आबा आणि रखमा यांचें लग्न ठरल्यासारखेंही होतें ! पण मध्यंतरी कांहींना कांहीं कारणें झालीं. आबांना मिळकतीचा लोभ सुटला. रखमाच्या बाजूनें तशी मिळकत कांहीं मिळणारी नव्हती. फक्त तिचें प्रेम त्यांच्यावर होतें.

त्यामुळें तिच्या वडिलांनीं करावयास सांगितल्यामुळें आबाकरितां करूं नयेत तीं खोटीं कृत्यें रखमानें केलीं व आबांचा गळा सोडविला !

पण दुसऱ्याच्या गळयाला मात्र फास लावला ! तिनें प्रेमामुळें हें पाप केलें. पण त्यामुळें तिच्या सात्त्विक मनाला रुखरूख लागली. आबाशीं लग्न केल्यानें असलीं अनेक पापें करण्याचा प्रसंग कदाचित् आपल्यावर अनेकदां येईल, असें तिला वाटलें !

इतक्यांत तिचे आईबाप साथीच्या रोगास बळी पडले !

त्यानंतर पुष्कळ दिवस ती उदासीनपणें वागली ! तिच्या मनाचा निर्णय ठरेना ! आबांचा लकडा पण तिच्या मागें लागला !

तिच्या मनांत प्रेम आणि सात्त्विकता यांचा झगडा चालू झाला. अखेरीस त्यांत तिच्या सात्त्विक वृत्तीनें प्रेमाला जिंकलें ! तिनें आबाशीं लग्न करण्याचें नाकारून भोळया सात्त्विक वृत्तीच्या सदोबांशीं लग्न लाविलें !

त्यामुळें आबा स्वेच्छाचारी बनले ! रखमाला फार वाईट वाटलें ! तिच्याच खटपटीनें गौराबाईशीं त्यांचा विवाह झाला.

पण अद्यापि रखमाचा शब्द त्यांच्यानें मोडवत नसे. स्वार्थी व दुष्ट माणसाच्या अंत:करणांतही कांही मऊ पापुद्रे असतात. तसल्याच प्रकारचा आबांच्या हृदयांत रखमाबद्दलचा हा नाजूक पापुद्रा होता !

  

सावळया मळयांत नव्हता. तो कोठें गेला, हें रखमाला कळलें नव्हतें. सावळया मळयांत आला कीं, रंगीला आपण आपल्याबरोबर आंबराईंत नेऊं, असें रखमानें ठरविलें होतें.

सावळयाच्या झोंपडीकडे तिची व सदोबांची नजर होती. ती झोंपडी म्हणजे सावळयाचें तें मळयांतील लहानसें घरच होतें. त्याला कुलूप लावून सावळया पांच सहा दिवस कोठें तरी भटकत होता !

रखमा घरकाम आणि शेतकाम दोन्हीही मोठया हुंबाडयानें उरकीत असे. ती आपला साधा सुधा प्रपंच तन्मयतेनें करी. दिवसभर कामांत असल्यामुळें तिचा वेळ तेव्हांच निघून जाई !

एके दिवशीं ती आपल्या दूरच्या शेतांतून घरीं चालली होती. तिच्या डोक्यावर वाळलेलें शेण भरलेली पाटी होती. दिवस मावळून गेल्यामुळें ती झपझप पाय उचलीत होती. ती माळावरील उंचवटयाच्या जागीं आली. तेथून आंबराई तिला जवळच दिसत होती. पण अंधार पडूं लागल्यामुळें

घरीं लवकर जातां यावें, म्हणून ती आडवाटेनें जाऊं लागली. त्या वेळीं अंधःकारानें आपले हातपाय चांगलेच पसरले होते.

त्या वाटेनें लपत छपत एक व्यक्ति चाललेली होती. ती व्यक्ति कोण आहे, हें तिला ओळखतां येईना. तिचा पोशाक तिला विचित्रच दिसत होता. त्या व्यक्तीच्या डोक्यास चौकोनी टोपड्यासारखीं लोंकरीची काळी टोपी होती! मिशा भरदार पण पांढऱ्या शुभ्र होत्या! अंगांतील सर्व कपडे काळे कुळकुळीत होते!

रात्रीच्या वेळीं कोणी तरी हा चोरटा येत असावा, असं वाटून तिनें हातांत एक गोलसा धोंडा घेतला आणि ती म्हणाली––

"कोण आहे?" बोल नाहीतर हा धोंडा आलाच! टाळकं फोडल्या-शिवाय तो राहाणार नाहीं!"

रखमाचे शब्द त्या व्यक्तीनें ऐकले. आणि विशेष कांही न बोलतां ती व्यक्ति रखमाकडे येण्याकरितां वळली.

पुन्हां रखमा ओरडून बोलली––

"खबरदार, पुढं पाऊल टाकशील तर! हा धोंडा आलाच बघ!"

रखमानें धोंडा फेकला. तो त्या व्यक्तीचें नेमकें टाळकें सडकणार होता. पण असल्या प्रकारास ती व्यक्ति निढावलेली होती. तिनें तो धोंडा चुकविला आणि जरा पुढें सरकून ती व्यक्ति म्हणाली,

"रखमा मामी, दुसरा धोंडा नको फेकूं! मी आहें!"

रखमानें त्या व्यक्तीचा शब्द ओळखला. आणि ती हंसली व म्हणाली,

"मन्या, मेल्या, कसलं सोंग घेतलस हें! मला फसविलंस कीं!"

मन्याही हंसला आणि म्हणाला,

"मामी रामोशाची जातच अशी! तूं भ्याली नाहीस ना?"

"मन्या, खरं सांगतें तुला! माझा पहिला दगड चुकला, तेव्हांच भ्यालें मी! कारण माझा नेम कधीच चुकायचा नाहीं! तेव्हां हें भूतच असेल असं वाटलं मला! किती दिवसांनीं आलास इकडे? सखी रडते आहे तुझ्या नांवानं! तिला नांदवायची नव्हती, तर लग्न रे कशाला केलंस तिच्याशीं? ..."

"मामी रागावूं नको अशी ! मी दारू पितो, म्हणून तीच रुसून आली आहे माहेरीं इकडे ! मी काय करूं त्याला ?... ... "

"तूं दारू सोड म्हणजे झालें !" रखमा म्हणाली.

"सोडीन ! सोडीन मामी ती केव्हां तरी ! विलायती दारू भुजंगराव चोरून आणून देतात मला ! थोडी घेतों मी ! तुमच्या गांवच्या गुडभटाला देखील औषधाकरितां देत असतों मी !—"

मन्या हंसला आणि 'चल मामी मी तुला गांवापर्यंत पोंचवितो, असें म्हणून त्यानें तिच्या डोक्यावरची पाटी घेतली. त्यानीं आडवाटेनें रखमाचें घर गांठलें.

अंधारांतून तो परत जाऊं लागला, इतक्यांत रखमा म्हणाली,

"दम जरा, मी तुला भाकरी आणून देतें. सखीकडे जाऊन खा तुम्ही ! तीही उपाशीं मरते आहे रे —"

रखमा घरांत गेली, तिनें घरांतल्या सर्व भाकरी आणल्या. त्यांवर तेल तिखट घातलें आणि त्या मन्याच्या स्वाधीन केल्या.

"मामी तूं आई आहेस आमची !"

मन्या सहृदयतेनें उद्गारला.

"जा ! जा ! घरीच जा आता—"

रखमा कळवळचानें बोलली. पण मन्या फक्त हंसला !

मात्र जातांना पंचवीस रुपयांची चवड त्यानें मामीच्या हातीं सखीला देण्याकरितां दिली. आणि तो अंधारांतूनच लगेच गुप्त झाला !

रखमाच्या डोक्यांत कांहीतरी नवा प्रकाश पडला. मन्या कोठें गेला असावा, हें तिनें मनाशीं ठरविलें.

तिचा स्वयंपाक झाला, जेवणें आटोपली !

भर मध्यान्हीची किट्ट काळोखांत ती बाहेर पडली.

ती थेट सावळ्याच्या मळचांत आली ! सावळ्याच्या झोंपडींत सावळ्या आणि त्याचे स्नेही बोलत बसले होते. त्या मंडळींत मन्याचा आवाज ऐकून तिला सावळ्याची काळजी वाटूं लागली ! मन्याच्या जाळचांत सावळ्या सांपडला आहे, असें तिला वाटलें. ती त्यांचा संवाद चोरून ऐकूं लागली—.

खाशा बोलत होता. तो म्हणाला—

" मन्या, तुझं कसब खरं लेका ! बंदूक उडवीत असतां माझ्या हातांत पैशाची बॅग दिलीस कीं !—"

" पण, तुम्ही वेळेवर आलांत ! बरोबर काम केलेंत ! ह्यांतही तुमची कर्तबगारी आहेच कीं !—" मन्या बोलला.

" पण असा लुटारूपणा करणं योग्य आहे का ?"

सावळ्या सौम्यपणें म्हणाला.

" लेकाचा आहे श्रीमंत ! गरिबांच्या माना मुरगाळूनच श्रीमंत झालाय ! त्याचा पैसा आमचाच !" बजा बोलला.

" सावळ्या ! सावळ्या ! आतां लेका रंगीबरोबर लग्न लावून टाक. दागिन्यांची तजवीज मन्या करतो आहे "

खाशा हंसत हंसत म्हणाला.

" पण रंगीला असल्या दागिन्यांची जरूरी नाहीं "

सावळ्यानें लगेच उत्तर दिलें.

मध्यान्ह उलटून गेली होती. मन्यानें कोठेंतरी हल्ला करण्याचें अगोदर ठरविल्याचे दिसत होतें. सावळ्यानें दुसऱ्या दिवशीं दुपारीं यावें; जुळल्यास रंगीला भेटावें; आणि रात्री पुढचा बेत ठरवावा; असें खाशानें सुचविलें. आणि ती टोळी मार्गास लागली.

रात्र उजळू लागल्यानें त्या लोकांच्या हातांतील चमकणारीं शस्त्रें रखमाला दिसलीं.

रखमा कोणाच्या दृष्टीस न पडतां घराकडे परतली.

सावळ्याचा हा नवा खटाटोप तिला कांहीं केल्या पसंत पडेना !

## भांडण लावणारं नांव

६

ती पाहाटेची वेळ होती. रंगी जागी झाली. ती उठून बसली. तिच्या वाड्यांतील कोंबडीं आरवूं लागलीं. गोठ्यांतील जनावरांची घसघस चालू झाली.

रंगी बाहेर अंगणांत आली. चंद्रोदय होऊन चंद्र कांहींसा वर आला होता. ती चंद्राची कोर तिला किती तरी आल्हादकारक वाटली. जणूं पूर्व दिशेच्या भालप्रदेशावरील ती कुंकुमाची कोरच होय !

तिची हालचाल घारी गाईच्या लक्षांत आली. लगेच तिनें हुंकार दिला. रंगी घारीजवळ गेली. तिची पोळी ती चोळूं लागली. तीही आपल्या मानेनें तिला कुरवाळूं लागली. रंगीला वाटलें, ही गायत्री म्हणजे जणूं आपली आईच होय. लगेच तिनें घारीच्या शेपटीला हात लावला. ती आपल्या डोळ्यांला लाविली. रंगीनें घारीला नमस्कार केला आणि ती परत जाऊं लागली. तेव्हां गाय हंबरूं लागली. जणूं आपल्यापासून आपलें मूलच दूर जात आहे, असेंही तिला वाटलें असेल !

गेले पांच सहा दिवस ती उदासवाणी दिसत होती. घरीं बसूनच होती. कामधंद्याकडे तिचें लक्षच नव्हतें. पण आज पाहाटेपासून ती पूर्वीं-प्रमाणें उत्साही दिसत होती. ह्याचें कारण तिच्याशिवाय कोणास कसें समजणार ?

झुंजू मुंजू दिसूं लागलें. थंडगार वारा सुटला. शेतकऱ्यांच्या गृहिणींचें दळण चाललें होतें. गडीमाणसें शेणगोठा करूं लागलीं होतीं.

रखमाचें दळण आटोपलें, तेव्हां चक्क उजाडलें होतें.

इतक्यांत "रखमा मामी! रखमा मामी!" अशा तिला गोड स्वरांत हांका ऐकू आल्या.

रखमानें दार उघडलें. ती रंगीला पाहून चकित झाली आणि म्हणाली—

"रंगे, इतक्या लवकर तू उठलीस कशाला पोरी? काम आटपून मी येणारच होते तुझ्याकडे तुला आंबराईत नेण्याकरितां!"

"मामी सावळ्या मळ्यात आलाय का ग? मला आलासा वाटतो. सांग, मामी सांग ना मला."

"अग, मळ्यांत आलेला सावळ्या मला ग इथं कसा दिसणार? तुला कसं कळलं? का रात्रीची गेली होतीस मळ्यांत? मध्यांच्या पोरट्या काय करतील कुणाला कळायचं नाही, बाई!"

रखमा रंगीकडे पाहात हसू लागली. रंगी ओशाळून तिला म्हणाली—

"तसं नव्हे मामी! मला पाहाटे स्वप्नांत सावळ्या दिसला! त्यानं मला शीळ घातली! मी मळ्यांतच होतें, असं मला वाटत होतं! मी जागी झाले. डोळे उघडलें तों सावळ्या कुठं आहे? मामी! सारें स्वप्नच! मला झोंप येईना, म्हणून तुला आलें विचारायला! आणि तुझं आपलं कांही तरीच!—"

ह्यावर रखमा कांही बोलली नाही. तिने रंगीला घरांत नेलें. रंगीनें आपलें डोकें रखमाच्या मांडीवर ठेवलें. रखमा तिच्या कानशिलावरून हात फिरवूं लागली. जणू त्या मायलेकीच असाव्या असें वाटत होतें!

  

सकाळीं नऊ दहा वाजण्याच्या सुमारास आबाची धादल चालू झाली होती. त्यांना अगदी जरूरीच्या कामाकरितां परगांवीं जावयाचें होते. सकाळीच भुजंगरावांचा तांतडीचा निरोप आला, म्हणून त्यांनी घाईघाईनें निघण्याची तयारी चालविली होती.

इतक्यांत कालही मळ्यांतील ऊंस कोणाच्या तरी बैलानें खाल्ला, अशी बातमी गड्यानें येऊन सांगितली.

रंगी मळ्यांत राखणीस जात नाहीं, त्यामुळें नुकसान होत आहे, ह्याची जाणीव आज आबांना चांगलीच झाली!

सावळ्याही कोठें तरी परगांवीं गेला आहे, हें आबांच्या कानावर होतेंच, म्हणून रंगीला आज मळ्यांत पाठवावें, असें त्यांच्या मनानें घेतलें.

इतक्यांत रखमा आली. तिच्या डोक्यावर जेवणाची पाटी होती. हातांत कालवण घातलेलें भांडें होतें. तिनें आपला पदर दांतांत धरलेला होता.

रंगीला आंबराईत आपल्याबरोबर नेण्याकरितांच ती आली होती. आबांना विचारल्याशिवाय रंगीला मळ्यात नेतां यावयाचें नाही, हे गौराबाईच्या कडून तिला कळलेंच होतें.

आबांच्या मनाचा ठाव घेण्याकरिता ती त्यांच्याकडे पाहून खुदकन हंसली!

आबांचा जामानिमा चालला होता. ते आरशांत पाहून आपला फेटा साफसूफ करीत होते. त्यांची दृष्टि रखमाकडे गेली. तेव्हा आपणहूनच ते रखमाला म्हणाले--

"बरी आलीस रखमा! रंगीला तुझ्याबरोबर आंबराईत ने. जनावरांनीं उंसाचा अगदीं फडशा पाडला आहे! कुणाची गुरं हीं! कोंडवाडाच दाखविला पाहिजे त्यांना!"

रखमाला पाहिजे होती ती परवानगी आपोआपच मिळाली. त्यामुळें कांहीं न बोलतांच ती घरांत रंगीला हांक मारण्यास चालली. तेव्हां आबा तिच्या पाठमोऱ्या बांधेमूद शरीराकडे निरखून पाहात म्हणाले--

"रखमा, जरा ऐकून घे माझं. रंगीवर चांगलं लक्ष ठेव. सावळ्या आज मळ्यांत नाही. तो आला तरी बायकांनी पुरुषाबरोबर कसं वागायचं असतं, हें रंगीला समजावून सांग. ती आतां कांही लहान नाहीं, पोरचेष्टा करायला!"

रखमानें मागें वळून पाहिले. तिने फक्त "हूं"! म्हटलें आणि आपली मान पण हलविली.

आबा तिच्याकडे पाहात होते. रखमा घरांत गेली, तरी त्यांची नजर तिकडेच होती. त्यांच्या मनांत तिच्याशीं आणखी बोलावयाचें होतें कीं काय, न कळे!

  

रखमाबरोबर रंगी आंबराईत आली. तेथें तिला पुष्कळ मोकळेपणा

वाटला. गेला आठवडा बागेंत बागडणाऱ्या फुलपांखराला बाटलींत कोंडून ठेविण्यासारखा तिला गेला होता !

सावळ्या दुपारीं येणार आहे, हें तिला रखमानें सांगितलें होतें, तरी देखील ती त्याच्या झोंपडीजवळून जाऊन आलीच !

रंगी आपल्या मनाशींच हंसत होती. तिनें मळ्याभोंवतीं एक चक्कर मारली. जनावरांनीं पुष्कळ नासधूस केली होती ! उंसाच्या कडेच्या गोवाऱ्या कोणी लांबविलेल्या दिसत होत्या ! बागेतले टपोरे गुलाब कोणी देठासकट खुडून नेले होते ! साखरगोटीचे डहाळे कोणी तोडलेले होते ! पालापाचोळ्याचा खच त्या झाडाखालीं झाला होता ! त्यांवर दुपारच्या वेळचे सूर्याचे प्रखर किरण मधून मधून पडलेले होते ! जणूं त्या पालापाचोळ्याची राख करण्याकरितां तेथें ते अवतरले आहेत, असें वाटत होतें !

सावळ्याची गाठ पडतांच तिला त्याच्याशीं पुष्कळ बोलावयाचें होतें. भुजंगरावांच्या उडविलेल्या फजितीची वाच्यता तिनें अद्यापि कोणाजवळ केली नव्हती. रखमाजवळही ती कांहीं बोलली नव्हती. मात्र सावळ्याला ती हकीकत केव्हां सांगेन, असें तिला होऊन गेलेलें होतें.

सावळ्यानें भुजंगरावांची जिरविलेली रग तिनें प्रत्यक्ष पाहिलेली होती. तिला त्या वेळीं कंसाचा पाडाव करणाऱ्या श्रीकृष्णासारखा सावळ्या वाटला होता !

तिनेंही भुजंगरावांचा फजितवाडा उडविला होता. त्यामुळें आपणही सावळ्याच्या पराक्रमाला शोभेसें आहोंत, असा तिला आत्मविश्वास वाटत होता ! पण त्याला तो निवेदन करण्याची संधिच तिला गेल्या आठवड्यांत मिळाली नव्हती. त्यामुळें ती आज सावळ्याच्या भेटीविषयी अत्यंत उतावीळ झाली होती.

दुपार झाली तरी, सावळ्या आला नव्हता. त्यामुळें रंगीचा हुरूप ओसरूं लागला. त्याची जागा काळजीनें घेतली. चेहरा जरा कोमेजूं लागलेल्या चमेलीच्या फुलासारखा दिसूं लागला.

इतक्यांत सावळ्याच्या झोंपडीकडे हालचाल झालेली तिला दिसली. एकदम तिच्या चर्येवर लाली उमटली !

लगेच तिनें आपली गोड शीळ घातली. त्या शिळेला ताबडतोब शिळेनेंच उत्तर मिळालें !

तिचा आनंद गगनांत मावेनासा झाला ! तिनें लहान मुलांसारख्या ोन तीन उड्या देखील मारल्या !

रखमा दुसरीकडे काम करीत होती. तिच्या कानीं ह्या शिळा आल्या. तिलाही सावळ्या आल्याचें समजलें. ती आपलें काम भरभर आटोपून आंबराईकडे जाण्याच्या तयारीस लागली.

रंगी साखरगोटीजवळ उभी होती. सावळ्या आपल्याकडे धांवत येईल, अशी तिची कल्पना होती. पण तो लवकर येईना, तेव्हां ती अधीर झाली. आपण तिकडे जावें, असें तिला एकदां वाटलें. पण तिचाही स्वाभिमान जागृत होता; तो तिला तसें करूं देईना.

मधला मार्ग म्हणून तिनें रखमास हांक मारली.

रखमा ताबडतोब रंगीपाशीं आली. तिनें रंगीकडे पाहिलें. उमलती चाफेकळी भर दुपारच्या उन्हानें किंचित् मलूलशी होते, तशी रंगी तिला दिसली !

रखमानें तिला जवळ घेतलें. इतक्यांत तेथें सावळ्याही धांवत आला. रंगी त्याच्याकडे पाहून हंसली. त्या वेळीं तिच्या गालावरील गोड खळी खुलून दिसली.

सावळ्याचा चेहरा गंभीर होता. त्याला पाहून रखमाच समय-सूचकतेनें म्हणाली—

"रगे, अशी कष्टी होऊं नकोस, बाई ! सावळ्या कांहीं वावगा वागावयाचा नाहीं—"

"मी तसं कुठं म्हणते मामी !" रंगी सावळ्याकडे पाहात हंसत हंसत बोलूं लागली." उगीच आपलं तुझं कांहींतरी म्हणणं ! पण एवढं खरं कीं, आबांचा राग सावळ्यावर फार झालाय. मी करायला गेलें एक आणि झालं भलतंच !—"

"रंगे, काय केलंस आणि झालं काय भलतं सांग तरी मला !—"

सावळ्या घाईघाईनें बोलला.

ते सर्वजण जवळच्या आंब्याखालीं बसले.

त्या दिवशी उष्मा अतिशय होत होता. पक्षी देखील आंबराईच्या आश्रयाला आले होते. त्यांपैकीं कांही कावळे काव काव करीत होते..

रंगीनें वर पाहिलें आणि थोडया वेळानें ती बोलूं लागली.

आपण घारीची धार काढण्यास जात असतां भुजंगरावांशी मिस्किलपणा कसा केला, त्यांना आपण तोंडघशी कसें पाडलें, व त्यांची फजिती कशी झाली, ही हकीकत रंगीनें रंगात येऊन सांगितली.

त्या वेळी रखमा आणि सावळ्या ही खो खो हंसूं लागली !

" कार्टे, मला देखील कळूं दिलं नाहीस हें ! मी त्याच वेळी त्याचे दांत त्याच्या घशाखाली चांगले घातले असते ! —— "

रखमी रंगीकडे पाहात हात हलवीत म्हणली.

" पण मामी, मीच वात्रटपणा केला होता त्याला अद्दल घडण्याकरितां ! नाहीतर, भुजंगराव तसा कांही वाईट माणूस नाहीं ! "

रंगीनें खरीच गोष्ट पण ती सावळ्याकडे मिस्किलपणें पाहात जरा लागट स्वरांत सांगितली.

" मग कर लग्न त्यांच्याशीं, रंगे ! ——"

रखमा हंसत हंसत म्हणाली.

सावळ्यानें मान डोलावून तिला संमति दिली आणि तो मिस्किलपणें हंसूं पण लागला !

रंगीला रखमाऐवजी सावळ्याचाच राग आला आणि ती चवताळून म्हणाली,

" सावळ्या रंगीला कोण समजतोस तूं ?——"

तिला जास्त बोलवेना. तिच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. आपण केलेल्या चेष्टेबद्दल रखमालाही वाईट वाटलें.

सावळ्या नरमाईच्या भाषेंत बोलूं लागला,

" रंगे, आबा आपलं लग्न कांही सुखासुखी होऊं देणार नाहीत. त्यांचा ओढा आतां भुजंगरावाकडे आहे. त्याला पण तूं फार आवडली आहेस. तसं केल्यानं आबांचा मान वाढणार आहे. मन्या सगळं सांगत होता आम्हांला ! त्याला सारं कांहीं ठाऊक आहे. म्हणून मी रखमाच्या बोलण्याला मान डोलावली. रागावूं नकोस अशी—— "

त्यानें रंगीच्या पाठीवर हळूच चापटी मारली आणि तिच्याकडे तो पाहूं लागला.

त्याच्याकडे भुवया वक्र करून पाहात रंगी म्हणाली—

" नको, वात्रटपणा असा ! आता काही आपण लहान नाही इतके ! मामी काय म्हणेल आपल्याला ! —"

सावळ्यानें अगदीं शांतपणें उत्तर दिले—

" रंगे, मामी ग काय म्हणणार ? ती तुझी सासू होणार आणि आईपण आहेच— "

रखमानें तिला आपल्याकडे ओढले, आपल्या एका हातानें तिच्या मानेला वळसा घालून दोन्ही हातांची मिठी तिच्या गळ्यांभोंवती मारली.

रंगीची नजर सावळ्याकडे होती. सावळ्याची नजर पण रंगीकडेच होती. सावळ्यानें सहज आपला हात पुढें केला, रंगीनेंही पण सहजच त्याच्या हातावर हात ठेवला.

त्याच वेळी उभयतांनी एकमेकांना मनानें वरलें. रखमानेंही मनानेंच कन्यादान उरकून घेतलें !

काही वेळ सर्वजण स्वस्थ होते. त्या तिन्ही व्यक्ती समाधि-स्थितींत असल्याचा भास होत होता.

ह्या समाधि-स्थितीचा भंग खाशाच्या हांक मारण्यानें झाला !

ताबडतोब सावळ्या झोंपडीकडे जाण्याकरितां उठला. आंब्यावरचे दोन कावळे एकमेकांत भांडू लागले. दोघांचा काव काव असा कर्कश ध्वनि त्यांच्या कानांवर पडत होता !

रखमाला त्यांचा भारी राग आला. ती उठली, तिने हातांत धोंडा घेतलेला पाहतांच कावळे पण उडून गेले !

  

सावळ्या, खाशा आणि बजा यांचीं खलबतें बराच वेळ चालू होतीं. तिसऱ्या प्रहरपर्यंत त्यांचें बोलणें संपलें नव्हतें. ते दोघे मन्याचा खास निरोप घेऊन आले होते.

" आबा आणि भुजंगराव ह्यांनीं गुप्त व्यूह रचला आहे. उद्यां सकाळी मोटारनें आंबेगांवांत येऊन रंगीला घेऊन ते जाणार आहेत. रंगीचें लग्न

भुजंगरावांशीं लावण्याचा त्यांचा गुप्त कट ठरला आहे. शिवाय आणखी कांहीं तरी त्यांचें भयंकर कारस्थान चाललेलें आहे. त्याची माहिती तो आपल्या माणसाबरोबर संध्याकाळपर्यंत कळविणार आहे. म्हणून रंगीचा विवाह एकमेकांच्या गळ्यांत माळा घालून आजच उरकून घ्यावा . . . . . . "

मन्याच्या निरोपाचा असा एकंदरींत निष्कर्ष होता.

तसा घाईनें विवाह करण्यास सावळ्याचें मन धजेना. म्हणून त्यानें रखमास बोलावून आणलें. तिला सारी हकीकत सांगितली. ती म्हणाली—

"आम्हांला काय बायकांना कळतंय ह्यांतलं. आपल्यांत लग्नाला भट लागत असतो. आमच्या आंबेगांवांत भटाशिवाय लग्न लावीत नाहींत; मराठा भट देखील नाहीं चालत आम्हांला !—"

"मामी ! " बजा सांगूं लागला, "आतां पुष्कळ ठिकाणीं नुसत्या एकमेकांच्या गळ्यांत माळा घालून लग्नं होतात. कोणीं आतां नांवं ठेवीत नाहींत! गांधींनी पण असा पायंडा पाडून दिलाय ! मला ठाऊक आहे."

खाशानेंही बजाच्या म्हणण्याला दुजोरा दिला.

"करा काय करायचं तें ! कांहीं का कराना, लग्न झालं म्हटलं म्हणजे कोणी रंगीच्या लग्नाची गोष्ट काढणार नाहीं. तिला मी आमच्याच घरीं नेऊन ठेवीन. नाहीं कारे सावळ्या ? . . . . . . "

रखमा उत्सुकतेनें बोलली.

सावळ्याच्या विचारानें त्या दिवशींचाच लग्नाचा बेत नक्की ठरला. पण नुसत्या माळा घालून लग्न झालें, तरी खरें लग्न भुजंगरावांचा कांटा काढून मोठ्या थाटामाटानें करावें, असें रखमाच्या विचारानें साऱ्यांनीं ठरविलें.

संध्याकाळच्या आंत हा बेत उरकावयाचा आणि तो साखरगोटी-खालच्या सावळ्याच्या वडिलांच्या समाधीजवळ गुपचूप उरकावयाचा, असें निश्चित झालें !

जो तो कामास लागला. साखरगोटीखालची जागा खाशा व बजा स्वच्छ करूं लागले. रंगी व सावळ्या माळा करण्यांत दंग झाले. रखमा पंचारतीचें सामान आणण्याकरितां गांवांत निघाली.

ती भाविक स्त्री प्रथम घरीं न जातां विठोबाच्या देवळांत गेली. तिनें

मनोभावें देवाची प्रार्थना केली. देवाच्या पायांवर मस्तक ठेवून तिनें त्याला मनानें लग्नास येण्याकरितां निमंत्रण दिलें.

जातां जातां मगनशेठकडून नारळ, सुपाऱ्या वगैरे सामान तिनें खरेदी केलें.

मगनशेठ तिला इतकें सामान कशाला पाहिजे, हें खोदून खोदून विचारीत होते. रखमा उडवाउडवीचीं उत्तरें देत होती.

हा सारा प्रकार शेठजींच्या दुकानांत जेठा मारून बसलेले गुंडभट ऐकत होते. ते नुकतेच तऱ्हेगांवाहून आले होते. ते कसल्या तरी विचाराच्या तंद्रींत होते. त्यामुळें रखमाच्या हालचालीवर त्यांची बारीक नजर नव्हती. पण सामानाची भली मोठी पाटी उचलून नेत असतां त्यांनीं तिच्याकडे संशयित दृष्टीनें पाहिलें.

पाहिजे असलेलें सामान घेऊन रखमा आंबराईंत चालली. तिलाही आंबेझरीच्या बाजूकडे गुंडभट गेलेले दिसले.

संध्याकाळच्या सुमारास रखमा आंबराईंत येऊन पोहोंचली.

रंगीनें सावळ्याच्या गळ्यांत आणि सावळ्यानें रंगीच्या गळ्यांत माळा घातल्या. गोरज मुहूर्तावर हा समारंभ गुपचूप पार पडला.

रखमानें उभयतांच्या कपाळास कुंकू लावून त्यांना पंचारतीनें ओवाळलें.

सावळ्या आणि रंगी यांनीं सावळ्याच्या वडिलांच्या समाधीचें दर्शन घेतलें.

सर्वजण सावळ्याच्या झोंपडीकडे निघाले. अंधार पडण्याचा सुमार झाला होता. त्या वेळीं उंसाच्या बाजूस कांहीं हालचाल चाललेली रखमाच्या लक्षांत आली. उंसांत जनावर शिरलें असेल, असें वाटून रखमा काठी घेऊन तिकडे धावली. तिच्या नजरेस गुंडभट पडला. तो तोडलेली भाजी तेथेंच टाकून धूम पळत गांवाकडे निघाला!

रखमा ह्या क्षुद्र भटाचा पाठलाग करण्यास गेली नाहीं.

रंगीचें सासरचें नांव साखरगोटी ठेवावें, असेंच पुरुषांच्या मतानें रलें. पण रखमा म्हणाली, "नको बाई असलं भांडणं लावणारं नांव! मी आपली रंगीच म्हणत जाईन तिला!"

## ब्राह्मणाचा शाप

७

गुंडभट गांवांत गेला, तो प्रथम मगनशेठच्या दुकानी गेला. त्याच्याच दुकानीं रखमाची हालचाल त्याच्या नजरेस पडली होती, म्हणून तर तो तिच्या मागून गुपचूप आंबराईकडे गेला होता.

आंबराईतील आबांच्या मळ्यांतील उंसाकडेची भाजी तोडून तो गेले दोन चार दिवस नेत असे ! त्या उंसाच्या आड उभा राहून तो साखर-गोटीखाली चाललेला समारंभ पाहात होता. तसें करीत असतां उंसाकडेच्या गोवारीच्या शेंगा पण तो तोडीत होता !

लग्नाचा चाललेला पोरखेळ पाहून तो खूप संतापला होता. त्यांत पुन्हा रखमानें त्याला पाहिल्यामुळें तो अधिकच चिडून गेला होता !

मनांत दबून राहिलेला त्याचा हा राग मगनशेठच्या दुकानी बाहेर पडला !

त्यानें तावातावानें तेथें सावळ्याचा पोरकटपणा जगजाहीर केला ! लग्नसमारंभांतील त्याच्या मिळकतीवर पाणी पडल्यामुळें त्याचा संताप भडकला होता !

भांडणें लावण्याच्या कामीं गुंडभटाचा हातखंडा असे. चाललेल्या भांडणांत भर घालूनही कोणीकडून तरी लभ्यांश साधण्याचा त्याचा राजरोस धंदाच होता म्हणाना !

त्याच्या ह्या वृत्तीचा उपयोग आबा हरहमेश करून घेत असत. म्हणून तर आबांचा आणि त्याचा लोभ होता. गुंडभट नेहमी म्हणे, “आबांवर माझं असं वजन आहे कीं, माझ्यावांचून त्यांच्या घरचें पानही हलावयाचें नाहीं !—”

मगनशेठला गुंडभटाच्या वल्गनांतील फोलपणा माहीत होता. तेव्हां आतां सहज डवचण्याच्या हेतूनें मगनशेठ गुंडभटाला म्हणाले,

"गुरुजी, आतां तुमचं आबांच्या घरचं वजन राहिलं नाहीं! तुम्ही आपलं उगीच म्हणावं तसं! ......"

मगनशेठचें बोलणें गुंडभटाला लागलें. ते ताडकन तेथून उठले आणि जातां जातां म्हणाले,

"चाललोंच आबांच्या वाड्यांत! सांगतों त्यांना सगळं! तो क्षत्रिय कांही धर्मबुडव्या नाहीं! --"

गुंडभट निघाले. त्यांनी जातां जातां तंबाखूची एक फक्की तोंडांत टाकलीच.

गुडभट चांगला पन्नाशीच्या सुमाराचा ब्राह्मण होता. त्याच्या कपाळा-वरील पांढरें आडवें गंध त्याच्या काळ्या कुळकुळीत वर्णास शोभून दिसे. त्याचें नाक बसकें असून डोळे तरतरीत होते. लहानपणचे देवीचे वण त्याच्या तोंडावर उठावून दिसत असत! खांद्यावर धोतर, आणि डोक्यास मळकट जरीचा रुमाल हा त्याचा गांवांतील पोशाक सर्वांच्या परिचयाचा होता.

ती गुंडभटाची बुटकी मूर्ति आबांचा चांगला समाचार घेण्याच्या हेतूने त्यांच्या वाड्यांत आली होती. पण ते घरीं नाहीत, हें समजल्यानें गुंडभट मनांतल्या मनांत हिरमुसला. तरी देखील गौराबाईच्यावर उसळून तो म्हणाला --

"आबा नसतांना असा प्रकार ह्या वाड्यांत कसा घडला? मी तुमच्या सात पिढ्यांचा उपाध्या मेलोंय वाटतं? --"

भटजींना काय उत्तर द्यावे हें गौराबाईना सुचेना. त्या सौम्यपणें म्हणाल्या,

"घरांत माणसं नाहींत, भटजी! ते आल्यावर त्यांना सांगा सगळं! आम्हां बायका माणसांना सांगून काय उपयोग? --"

"बजावतों गौराबाई तुम्हांला! तुमची फूस असली पाहिजे ह्याला! भटांशिवाय तुमच्या इथं लग्न कधीं होतं का? चैत्रांत झालेलं लग्न कुठं ऐकलंय का? --" गुंडभट तावातावानें म्हणाले.

इतक्यांत तेथें सदोबा आले, त्यामुळें गौराबाईना हायसें वाटलें.

गुंडभटांनीं सदोबास छेडण्यास सुरुवात केली. त्या सरळ वृत्तीच्या माणसाला गुंडभट आडवूं लागले.

गुंडभट आबांच्या वाड्यांत भांडण्याकरितां गेला आहे, ही बातमी मगनशेठच्या दुकानांतून गांवभर पसरली होती. म्हणून तो तमाशा पाहण्याकरितां काळोखी रात्र होती, तरी आबांच्या वाड्यांत बरेच लोक जमले.

गुंडभटाच्या तोंडाला आतां फार जोर चढला !

"धर्म बुडाला ! धर्म बुडाला !" असा टाहो फोडण्यास त्यानें सुरुवात केली !

रंगी रखमाच्या घरीं होती. सावळ्या आणि त्याचे मित्र ह्यांना पुरणपोळीचें जेवण घालण्याचें तिनें ठरविलें होतें. तिचा स्वयंपाक चालला होता. शेजारीपाजारी तिला मदत करीत होते.

आबांच्या वाड्यांतील गुंडभटांनीं चालविलेली बडबड तिला कोणी तरी सांगितली. गुंडभटाविषयींचा तिचा संताप अनावर झाला ! रखमा खरकट्या हातांनींच आबांच्या घरीं आली.

तेथें "धर्म बुडाला धर्म बुडाला !" ही गुंडभटाची बडबड चाललीच होती. ती ऐकतांच तिच्या अंगाचा तिळपापड झाला !

रखमानें गुंडभटाचा तो अवतार पाहिला. सदोबा तेथें आहेतसें पाहून ती त्यांना उद्देशून म्हणाली—

"आबा घरांत नाहींत, सांगा त्या भटाला ! हाकलून द्या त्याला ! चला आपल्या घरीं ! रात्र बरीच झाली आहे—"

"आतांच्या आतां चार मंडळींत ह्याचा निकाल लागला पाहिजे—" गुंडभट ओरडून बोलूं लागले. "चैत्रांत लग्न लागतं ? मोऱ्यांच्या कुळांत कुणीं असं ऐकलं तरी का ? हें लग्न नव्हे ! पोरखेळ आहे हा ! मी भट गांवांत होतो, कांहीं मेलों नव्हतों ! धर्म बुडाला ! हरहर ! धर्म बुडाला !"

रखमा चवताळली, पण संयम ठेवून ती सदोबांनाच उद्देशून बोलली—

"बडबडूं द्या भटाला असाच ! ह्याच्यापेक्षां रामोशी बरा—"

लोकांदेखत रखमानें आपली अब्रू घेतली, असें गुंडभटाला वाटलें. त्यानें मिशांवरून हात फिरविला ! त्याची मिळकत बुडाल्यामुळें त्याला

संताप आलाच होता. त्यांत रखमाच्या बोलण्यानें आगींत तेल ओतल्या-मारखें झालें. तो उसळून म्हणाला,

"तोंड आवर रखमे ! तुझीच फूस रंगीला आन् सावळ्याला ! तूंच धर्म बुडविलास ! मोरे घराण्याचं वाटोळं केलंस —"

आतां मात्र रखमाचा राग अनावर झाला ! तिचा तोल सुटला. ती गुंडभटापुढें आपला खरकटा हात नाचवीत बोलली—

"भटा, मला धर्म कळतोय सगळा तुझा ! तुझी मिळकत बुडाली म्हणून धर्म बुडाला म्हणतोस ? खोट्या साक्षी देतोस, तेव्हां धर्म बुडत नाहीं वाटतं तुझा ? नवरा असलेल्या पोरींची लग्नं लावल्यानं तुला दंड झाला तेव्हां नाही तुझा धर्म बुडाला ? पाटाच्या लग्नाचं आडवून पैसं घेतोस, तेव्हां तुझा धर्म कुठं जातो ? खोकला येतो म्हणून मन्याबरोबर दारू पितोस तेव्हां धर्म बुडत नाहीं ना ? खेटरं मारावीं असल्या भटाला—"

रागाच्या भरांत रखमा गुंडभटाचें श्रीमुख रंगवील कीं काय, असें लोकांना वाटलें.

भटजी सदोबाकडे करुणमुद्रेनें पाहूं लागले. त्यांना रखमाचें वागणें पसंत पडत नव्हतें, पण ती बोलत होती तें सर्व कांहीं खरें असल्यामुळें सदोबाही तोंडांतून शब्द काढीनात.

गुंडभटानें पुटपुटत आतां शाप देण्यास सुरुवात केली ! रखमाचेही ओंठ रागानें थरथरूं लागले. ती कांहीं तरी विलक्षण करील, असें वाटल्यामुळें सदोबा गुंडभट आणि रखमा ह्यांच्यामध्यें उभे राहिले.

इतक्यांत रंगीच तेथें धांवत आली.

"घरीं चल ! पुरण करपलंय ! कोणसं आलंय —"

रंगी घाईनें हें बोलली आणि रखमाच्या हाताला धरून तिनें तिला ओढीतच घरीं नेलें !

  

रखमा घरीं आली, ती अगोदर पुरण करपलें कीं काय, हें पाहाण्यास गेली !

त्या वेळीं रखमाच्या घरीं सावळ्या आणि त्याचे मित्र आले होते. त्यांना रखमाला कांहीं बातमी सांगावयाची होती !

त्यांना इतक्या घाईनें येण्यास तसें अकल्पित आणि काळजी उत्पन्न करणारें कारण घडून आलें होतें.

समारंभ आटोपल्यानंतर ते सर्व सावळ्याच्या झोंपडींत गेले. तेव्हां ते सगळे आनंदांत होते.

झोंपडींत साखरगोटीच्या आंब्यांची अढी होती, तींतील पिकलेले आंबे खाता खातां बजा म्हणाला होता,

"खाशा, असे आंबे आपण जन्मांत खाल्ले नाहीत! खरंच फार गोड गोटी ही! —"

"बजा, साखरगोटी आंब्याची प्रसिद्धि पांच पन्नास गांवांत आहे. साखरगोटीला तोड नाही इकडे! —"

खाशा आंबा चोखीत चोखीत म्हणाला.

"सावळ्यानं मिळविलेली साखरगोटी पण तशीच गोड आहे. आतां साखरगोटी आंबा पण बिनधोक सावळ्याचा! आबांचा मात्र भारी जळफळाट होईल!"

बजाही आंबे चोखतच बोलला.

"काय करतोय तो! आपल्या मन्याचा बेत वेगळाच आहे, खासेराव! —"

त्या झोंपडींत ह्या मंडळीचें हंसत खेळत असे गोड बेत चालले होते.

पण बाहेरील झाडींत रातकिड्यांची भेसूर गुणगुण होत होती. त्या भेसूरपणांत गडद काळोखानें भर घातली होती. त्यामुळें सर्व वातावरणच भीतिदायक होऊन गेलेले होतें.

इतक्यांत झोंपडीच्या बाहेरून एक खुणेची शीळ आली. ती ऐकतांच खाशा सावधपणे बाहेर गेला. परवलीचा शब्द त्याला पटला. शीळ घालणाऱ्या व्यक्तीनें फक्त एक सुरा खाशाच्या स्वाधीन केला.

एका तासाच्या आंत गाव सोडून निघून जाण्याची ती सूचना होती. मन्याकडून ती आली होती!

त्यामुळेंच सावळ्या, खाशा आणि बजा रखमाचा निरोप घेण्याकरितां आले होते.

रखमाला बोलवेना. तिचे डोळे भरून आले. रंगी स्वयंपाकघरांत

होती. तिला एकवार पाहावें, अशी सावळयाची इच्छा होती. पण खाशा आणि बजा ह्यांच्यापुढें त्याला आपल्या मनांतील हेतु स्पष्ट करितां येईना. ते सर्व तांतडीनें निघून गेले. रखमा भ्रमिष्टासारखी तेथेंच उभी राहिली.

इतक्यांत रंगी तेथें आली. तिच्या दृष्टीस सावळयाची पाठमोरी आकृति पडली.

तिनें शीळ घातली, पण सावळया परत येण्याचें चिन्ह दिसेना. ती एकदम निराश झाली!

ती घरांत आली आणि रखमाच्या कुशींत डोकें खुपसून स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

स्वयंपाक तसाच पडून राहिला, अन्नाचा घांस कोणाच्याच पोटांत गेला नाहीं.

त्या काळोख्या रात्री त्या दोघीही रडत पडल्या होत्या. दिवसभर केलेल्या श्रमामुळें मध्यान्हीनंतर रखमाचा डोळा लागला. रंगी बेधडकपणें तिच्या जवळून उठली. अंधारात वाट फुटेल तिकडे तिचे पाय जाऊं लागले.

ती पुष्कळ भटकली पण तिला सावळयाचा पत्ता लागला नाहीं!

❦ ❦ ❦

भल्या पाहाटेस आंबेगांवी भयंकर गडबड उडून गेली. आबांचा वाडा पोलिसांच्या तुकडीनें वेढला. सदोबांच्याही घराला वेढा पडला. खाशा, बजा वगैरे संशयी लोकांचीं घरेंही पोलिसांनी वेढून टाकली!

जिकडे तिकडे कसून झडती सुरू झाली!

खाशा, बजा, सावळया वगैरे सर्व फरारी झाले होते. फक्त सावळयाच्या झोंपडींत पोलिसांना रंगी सांपडली, तिला पोलिसांनीं कैद केलें!

रखमा आणि सदोबा यांचीही तीच गत झाली. त्यांनाही पण अटक झाली. सारा आंबेगांव हादरून गेला!

रात्रभर कोठेंतरी भटकत असलेला गुंडभट घरीं पाय ठेविल्याबरोबर आपल्या पत्नीजवळ उद्गारला,

"ब्राह्मणाचा शाप देवादिकांनाही बाधतो, मग इतरांची कथा काय! —"

## कचेरीवर हल्ला !

## ८

दुर्दैव एकदां पाठीस लागलें की, एकामागून एक संकटें चालून येतात. बिचाऱ्या रंगीची तीच स्थिति झाली. ती रात्रीं रखमाच्या घरांतून भटकत बाहेर पडली. तिच्या भ्रमिष्ट स्थितींत वाटेंतील खांचखळग्यांत तिचा पाय अनेकदां मुरगळला. पायांत कांटेकुटे बोंचले. तिला ठेचा पण लागल्या. वणवण करीत रानावनांतून, काळोखांतून हिंडतांना तिला शुद्धच नव्हती म्हणाना !

बऱ्याच वेळानें जरा थंडगार वारा सुटला. त्यामुळें तिचें डोकें कांहींसें ठिकाणावर आलें आणि तिनें थेट सावळ्याच्या मळ्याची वाट धरली. तिनें त्याची झोंपडी गांठली. झोंपडी उघडी पाहून तिच्या मनांत आशेचा अंकुर उद्भवला !

सावळ्या कुलूप लावून नेहमीं बाहेर जात असतो, झोंपडीस तर कुलूप नाहीं. तेव्हां तो कुलूप लावण्यास तरी येईल, ह्या आशेनें झोंपडीचें दार सताड उघडें ठेवून ती आंत जाऊन बसली !

पाहाटेच्या वेळीं झोंपडीच्या बाहेरची हालचाल जेव्हां तिला ऐकूं येऊं लागली, तेव्हां सावळ्या आला, असें वाटून तिला आनंद झाला. सावळ्या कुलूप लावूं लागला की, त्याला आपण चकित करून सोडावयाचें, असा तिनें बेत योजला ! ह्या गोड कल्पनेनें ती रात्रीचें सारें दुःख विसरूं लागली !

पण मन चिंतितें एक आणि घडून येतें भलतेंच, अशी तिची स्थिति झाली !.

ती सावळ्याची वाट पाहात होती. सावळ्या आतां येईल, मग

येईल, असें तिला वाटतां वाटतां किती तरी वेळ निघून गेला. त्यामुळें पुढें ती अत्यंत अधीर झाली !

आणि तिनें सावळयास हाका मारण्यास सुरुवात केली.

सावळयानें 'ओ' देण्याऐवजीं बाहेरचा भेसूर हास्यध्वनि तिच्या कानीं पडला !

ती घाबरली. तशा स्थितींत ती बिचारी काय करणार ?

उजाडतांच तिच्या झोंपडीची झडती झाली. त्या झडतींत पोलिसांना एक नवें कोरें पिस्तुल सांपडलें !

तिला पोलिसांनीं गिरफदार करून चावडींत नेलें. असे तिचे अब्रूचे धिडवडे निघाले !

रखमा आणि सदोबा यांनाही पोलिसांनी पकडलें. त्यांच्या घरींही आणखी एक पिस्तुल पोलिसांच्या हातीं लागलें. त्याचा पंचनामा चालला असतां रखमा चरफडून बोलली,

"असलं लोखंड आमच्या घरीं नव्हतंच मुळीं ! शिपुर्ड्यांना कसं सापडलं कुणास ठाऊक !"

सदोबा तिला दाबू लागले. त्यांनीं विठोबाचें भजन सुरू केलें.

रखमा त्यांच्यावर चवताळून म्हणाली,

"कुठं हाय तुमचा विठोबा ! इथं सोडवायला येतोय का ?"

ताबडतोब ह्या तिघांना पोलिसांनीं तालुक्याच्या ठिकाणीं तऱ्हेगांवीं नेलें आणि त्यांना तेथें अटकेंत ठेवलें.

सारा आंबेगांव झाल्या प्रकारानें हळहळला.

ताटांत वाढलेल्या गोड अन्नांत विष कालवणारा कोण असावा, ह्याचा अंदाज रखमाला करतां येईना. त्यांतलें त्यांत पोलिसांच्या तावडींत सावळ्या सांपडला नाहीं, हे एकपरी बरें झालें, असें त्या दोघींना वाटलें.

गौराबाईना अत्यंत दुःख झालें. त्या यजमानांची वाट पाहात होत्या. ते आल्यावर सर्वांना सोडविल्याशिवाय राहाणार नाहींत, असें त्या भोळ्या बिचारीला वाटत होतें.

त्या मनांत म्हणत होत्या—

"आपल्या यजमानांनीं खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें किती तरी

वेळां घडवून आणलें आहे. तर मग खऱ्याचें खरें त्यांना सहज करितां येईल. पोलिसांनी पकडण्यामारखा अपराध रंगी, रखमा आणि कट्टे वारकरी सदोबा हे कधींच करणार नाहींत ! —''

त्या दिवशी सायंकाळपर्यंत गौराबाई यजमानांची वाट पाहात होत्या. पण ते आले नाहीत. दोन तीन दिवसांनी मन्या, हा आबा आणि भुजंगराव यांना मोटारीतून घेऊन आंबेगांवी आला. लगेच त्यांना गुंडभटांनी सगळी हकीकत सांगितली !

दोघांना झालेल्या प्रकाराचें अत्यंत आश्चर्य वाटलें !

आरोपींना जामीनावर सोडविण्याची त्यांनी ताबडतोब खटपट सुरू केली.

जामीनदाराची जुळवाजुळव झाली. गुंडभट सदोबाला जामीन राहाण्यास तयार झाला. पण रखमाला जामीन राहाण्यास तो कबूल नव्हता !

ती कायमची कैदेंत जावी व आपला शाप खरा व्हावा, असे त्याला वाटत होतें की काय, न कळे !

  

तऱ्हेगांव तालुक्याचा गांव होता. तेथें तुरुंग तो केवढा असणार ? कच्च्या कैदेंतील आरोपींना ठेवण्याकरितां दोन तीन कोठड्या असतील तेवढ्याच !

त्यांतील एका कोठडींत रंगी आणि रखमा ह्या दोघींना ठेवलें होतें आणि सदोबांना दुसऱ्या कोठडींत ठेवलें होतें.

सावळ्याची बातमी रंगी आणि रखमा यांच्याकडून कळेल, असे पोलिसांना सहाजिकच वाटत होतें. म्हणून पोलिस अधिकाऱ्यांनी त्यांना अनेक प्रश्न विचारले, त्यांच्या सुटकेचें आमिष दाखविलें आणि कांहींसा रुद्रावतारही दाखवून पाहिला !

पण त्या स्त्रियांकडून त्यांना पाहिजे असलेली माहिती मिळाली नाहीं. खरोखर त्यांना कांही माहिती नव्हतीच, तर त्या तरी काय सांगणार ?

झाल्या प्रकारानें रंगीचें अंतःकरण अत्यंत व्यथित झालें होतें. अमृताचा म्हणून पेला हातीं यावा; आणि त्यांत विष भरलेलें असावें अशी तिची स्थिति झाली !

आणि खरोखर एकादी विषारी वल्ली हातीं लागून प्राणार्पण करतां

आलें, तर तें ह्या यातनेपेक्षां सुसह होईल, असेही तिला वाटल्याशिवाय राहिलें नाही !

तिनें दोन तीन दिवस अन्नाला स्पर्शही केला नाही. तिला जुलमानें अन्न घालण्याचें धारिष्ट पोलिसांना होत नव्हतें.

त्यांना फक्त कच्च्या कैदेंत ठेवलें होतें. त्यांच्यावर नेमके आरोप कोणते ठेवले होते, ह्याची त्यांना माहिती दिलेली नव्हती. कारण खरे आरोपी त्यांपैकीं कोणीच नव्हते. संशयावरून त्यांना पकडून आणलें होते. त्यांचे आरोपी सावळ्या, खाशा व बजा हे होत.

पानगांवच्या खिंडीत त्यांनीं भुजंगरावांवर हल्ला करून त्यांना लुटलें; त्यांनी सैन्यभरतीस अडथळा केला; अनेक ठिकाणची लुटालूट केली; असे किती तरी आरोप त्या तिघांवर होते !

हे आरोप आबा आणि भुजंगराव ह्यांनीच केलें होते. त्यांच्याजवळ भरपूर पुरावाही असल्याचे पोलिसदप्तरी दाखल होतें. पण ते दोघे अद्यापि तऱ्हेगांवास आलेच नव्हते !

वास्तविक हा सारा व्यूह भुजंगरावांनी रचिला होता. सावळ्या, खाशा आणि बजा ह्यांच्यावर असले काही भयंकर आरोप ठेवले, म्हणजे ते नरम येतील. कैदेतील हाल सोसण्यापेक्षा सैन्यभरतीत जाणें फार श्रेयस्कर आहे, हें त्यांना पटवून देतां येईल आणि त्या योगानें आपलाही मार्ग निष्कंटक होईल, अशी त्यांची मूळची कल्पना होती !

शिवाय चांगल्या सुदृढ आणि चलाख मराठ्यांनी सैन्यांत शिरावें; पराक्रम गाजवावा; अधिकाराचें स्थान मिळवावें आणि शीख व गुरखे ह्यांना ज्या प्रकारचें महत्त्व सैन्यांत प्राप्त झालें आहे, तशाच प्रकारचें महत्त्व मराठ्यांना प्राप्त व्हावें, असें त्यांना मनापासून वाटत होतें.

पण लुटुपुटीच्या विवाहाची आणि स्त्रियांना पकडून नेल्याची हकीकत कळल्याबरोबर आपण करावयास गेलों एक आणि झालें भलतेंच, हें त्यांच्या ध्यानीं आलें !

मात्र भुजंगराव प्रयत्नवादी गृहस्थ होते. आलेल्या अडचणींना पाया-खालीं तुडवून पुढें मार्ग काढण्याचा त्यांचा स्वभाव होता. ह्या त्यांच्या

गुणांचा उपयोग क्षुद्र स्वार्थ साधण्याच्या कामीं होत होता, एवढेंच काय तें वाईट होतें !

सावळ्या फरारी झाला. त्याच्यावर भयंकर आरोप आहेतच. तो कांहीं राजरोसपणें आंबेगांवीं येत नाहीं, अशी खात्री झाल्यामुळें कच्च्या कैदेंतून रंगी, रखमा आणि सदोबा ह्यांना सोडविलें पाहिजे, असें भुजंगरावांनीं आपल्या मनाशीं पक्कें ठरविलें.

तऱ्हेगांवच्या तुरुंगांतील पाहाऱ्यावर अधिकाऱ्यांनीं वयस्क शिपायांना ठेवलें होतें. ते सदोबा, रखमा वगैरे आरोपींशीं फार कनवाळूपणें बोलत. रखमाच्या व ह्या शिपायांच्या प्रेमळ आग्रहानें तीन चार दिवसांनंतर रंगी दूध घेऊं लागली !

मायेनें माया वाढते. पोलिसांना त्या स्त्रिया निरपराधी वाटत होत्या. त्यामुळें प्रेमळपणें त्या स्त्रियांशीं ते गोड बोलत ! उपदेशही करीत ! त्यामुळें ते पोलिस त्या स्त्रियांना सज्जन दिसले ! ते आपल्यास सोडून देतील असेंही त्यांना वाटूं लागलें ! पण त्यांना सोडून देण्याचें त्या पोलिसांच्या हातीं काय होतें ?

एकादा पोलिस त्यांना असेंही सांगे कीं, "गुन्हा कबूल करावा. पहिलाच अपराध असल्यामुळें मॅजिस्ट्रेट सोडूनही देतील !"

तिन्ही बाजूंनीं भक्कम दगडी भिंत आणि फक्त एका बाजूनें लोखंडी गज असलेले पक्कें दार अशा त्या कोठडींत त्या अबला कंटाळून गेल्या; वैतागूनही गेल्या !

एके दिवशीं रात्रीं दहाच्या सुमारास रंगी कोठडीच्या बाहेरच्या बाजूस पाहात निजली होती. तेथून आकाशाचा कांहीं भाग दिसत होता. त्यांतील एका तेजस्वी चांदणीकडे बोट दाखवून रंगी रखमाला म्हणाली,

"ती बघ चांदणी कशी चमकत आहे. ती स्वर्गांत आहे, म्हणूनच सुखी दिसते, नाहीं मामी ?.... .. "

रंगीच्या बोलण्यांतील मतलब जाणून रखमा म्हणाली "रंगे, स्वर्ग बिर्ग कांहीं काढूं नकोस बाई ! कोणी तरी सोडवील आपल्याला ! आपलं कर्म वाईट म्हणून पडलों आपण कैदेंत —"

दोघी कांहीं वेळ स्वस्थ होत्या. थोड्या वेळानें रंगी म्हणाली,

" भुजंगरावांनीं सूड उगविला खरा, नाहीं का मामी ?—"

रात्रीचे अकरा वाजण्याची ती वेळ होती. तशा वेळीं आरोपींना भेटण्यास कोणी येत नाहीं. पण आरोपींना भेटण्याची स्पेशल परवानगी काढून आबा आणि भुजंगराव तेथें आले.

रखमा आणि रंगी ह्यांना तशा स्थितींत पाहिल्याबरोबर खरोखरच आबांना वाईट वाटलें. त्यांना गहिंवरून आलें.

इतक्यांत तेथें बाहेर पोलिसांनीं सदोबांनाही आणलें. त्यांचा तोंडांतल्या तोंडांत हरिनामाचा जप चालला होता.

भुजंगराव प्रथम सदोबांना म्हणाले,

" आतां झालें तें झालें, सदोबा ! गुन्ह्याबद्दल माफी मागून आपली सुटका करून घ्या--"

" मी कसलाही गुन्हा केला नाहीं. विठोबा साक्ष आहे त्याला !"

" रखमे, सदोबाला कांहीं कळत नाही !" आबा म्हणाले " सावळ्या, बजा, खाशा यांनीं पिस्तुलं घरांत आणिलीं होतीं, भुजंगरावांचा खून करायला ! असं सांगा म्हणजे सुटका होईल तुमची !......"

रखमा आबाकडे डोळे फाडून पाहात बोलूं लागली,

" मी खोटं बोलूं ? जन्मांत एकदांच खोटं बोललें आबा ! ते तुझ्याच करितां ! तूं कैदेंत पडूं नयेस म्हणून ! पुन्हा मी नाहीं खोटें बोलायची !—"

बारा वर्षांपूर्वीची हकीकत रखमा येथें आतां बरळेल, असें आबांना वाटून त्यांनीं रखमाशीं बोलूं नये, असें ठरविलें आणि ते रंगीला म्हणाले,

" रंगे, तूं तरी मी सांगतों तसं ऐक बाळ ! घरीं तिनं अन्न सोडलं आहे. माझी अब्रू चव्हाटयावर आली आहे ! ऐक माझं !--"

रंगी कांहीं बोलेना. ती मुळी वरच पाहीना. खालीं मान घालून बसली होती ती ! ..."

" मी जबाब लिहून आणला आहे साऱ्यांचा ! फक्त ह्यांनीं हूं म्हणावं ! रावसाहेब आतांच सोडतील सर्वांना--" भुजंगराव म्हणाले.

" खोटा जबाब मी प्राण गेला तरी देणार नाहीं—"

रंगीनें भुजंगरावाकडे पाहात म्हटलें, तिचे डोळे आग ओकत होते.

इतक्यांत दूर अंतरावर कुत्रीं जोरानें भुंकत असल्याचा आवाज ऐकूं येऊं लागला !

गांवापासून बऱ्याच अंतरावरील माळावर ही तऱ्हेगांवची कचेरी होती. पाहाऱ्यावरील पोलिसांशिवाय रात्रीं तिच्या जवळपासही कोणी फिरकत नसत.

भुजंगराव मोटार घेऊन आले होते. झटपट काम उरकून मोटारींतून साऱ्यांना घेऊन जावें, असा त्यांचा विचार होता.

पण काम होईल, असें चिन्ह दिसेना. कबुलीजबाबास कोणीच तयार होईना !

मन्या मोटारीचें हॉर्न वाजवून भुजंगरावांना बोलावीत होता !

कांहीं तरी तोड काढल्याशिवाय भुजंगरावांना तेथून उठतां येईना !

इतक्यांत दूर अंतरावर रंगीच्या माहितीची शीळ झाल्याचा तिला भास झाला ! तिचें मन तिला धीर देऊं लागलें !

कसला तरी निश्चय ठरवून रागाचा आविर्भाव आणून भुजंगराव म्हणाले,

"रंगीला अशीच अद्दल घडली पाहिजे. कसली अब्रू जाते तुमची आबा ? तिचा दिमाख उतरला पाहिजे आणि सावळ्याचा कांटा निघाला पाहिजे !—"

"कुणाचा कांटा काढणार म्हणतां ? त्या दिवशीं पाहिली तुमची ऐट !

रंगी बेधडकपणें बोलली !

यावर भुजंगराव चिडून उद्गारले—

"पोलिसदादा, काय पोरटी बोलते, ऐकून घ्या ! हिला सोडवायला आलों आम्ही ! कार्टी काय गुणाची आहे पाहा तरी —"

"कुणाला कार्टी म्हणतोस भुजंग्या—"

रखमा पिसाळून बोलली.

ती जोरजोरानें दाराचे गज हालवूं लागली ! ती वाघीण दाराबाहेर येऊं पाहात होती ! तिचा संताप तिला आवरेना !

ती थयथय नाचूं लागली आणि कर्कश आवाजांत बोलली,

" कर तोंड काळं ! इथं आम्ही मरूं पण खोटं साफ बोलणार नाही ! "

त्या वेळी मध्यरात्र झाली होती. मन्याचें हॉर्न वाजविणें चालू होतें.

इतक्यांत एक मोठी टोळी कचेरीत घुसली ! तींतील लोकांचा वेष अगदी पोलिसांच्या वेषासारखाच होता !

त्या टोळींतील लोकांनीं एकदम कचेरीतील पाहारेकऱ्यांवर हल्ला केला ! त्यांच्या तोंडांत बोळे घातले ! त्यांना करकचून बांधून टाकलें !

भुजगराव व आबा यांचीही अगदीं तीच गत झाली !

इतकें होईपर्यंत कांहीनी स्त्रियांच्या कोठडीचें कुलूप तोडलें. रखमा आणि रगी ह्यांना त्यांनीं मोकळे केलें ; आणि त्यांना ते बरोबर घेऊन गेले.

पाहाऱ्यावरील पोलिसांच्या बदुकाही घेऊन सारे लोक अगदीं जलदीनें पसार झाले.

एकटे सदोबा मात्र तेथें मोकळे होते, हा सारा प्रकार ते आश्चर्यानें पाहात होते व म्हणत होते "विठोबाची करणी अगाध आहे."

ती टोळी तेथून निघून गेल्यावरही ते जागचे हलले नाहींत !

फक्त ते खालील अभंग डोळे मिटून म्हणत होते--

*तुज म्हणतात कृपेचा सागर ।*
*तरी कां केला धीर पांडुरंगा ॥*
*अजुनि का नये तुज माझी दया ।*
*काय देवराया पाहातोसी ॥*

हे अभंगाचे दोन चरण घोळघोळून म्हणण्यांत ते अगदीं तल्लीन होऊन गेले होते !

## गोडाला कीड



ताहेगांवच्या कचेरीवर हल्ला करणारी ती टोळी लगोलग जिकडे तिकडे पांगापांग करून निघून गेली! फक्त मन्याची मोटार त्याच्यासुद्धां चार माणसांना घेऊन ती पानगांवच्या खिडीच्या मार्गास लागली!

त्या टोळींतील लोक पोलिसांच्या वेषांत होते. तेव्हां हे नवे पोलिस, कचेरींतील पोलिसांवर कां तुटून पडत आहेत, हें रखमाच्या लक्षांत आलें नाहीं.

त्यांच्या कोठडीचें कुलूप तोडतेवेळीं त्या दोघी फार घाबरून गेल्या. आपल्यावर आतां आणखी कोणता भयंकर प्रसंग गुदरणार, ह्याची त्यांना कल्पना येईना! रखमाची तर बोबडीच वळली आणि बाहेरचा दंगलीचा तो भयंकर देखावा पाहून रंगी बेशुद्ध झाली!

त्या दोघी स्त्रियांना तुरुंगाच्या कोठडीतून बाहेर काढून त्या टोळींतील लोकांनीं त्यांना अलगत उचलून मोटारींत नेऊन ठेवलें. आणि क्षणाचाही विलंब होऊं न देतां ती मोटार चालू झाली.

कोणीच हूं कां चूं करीत नव्हतें. सर्व अगदीं गुपचूप होते.

तुरुंगावर हल्ला करणाऱ्या लोकांच्या तोंडावर काळ्या कापडाचें आवरण होतें. ते सारे लोक सशस्त्र होते. कोणी गडबड केल्यास त्यांना तडाखे देण्याचीही त्यांची तयारी होती. ठरलेल्या शिस्तींत त्यांचीं कामें अगदीं काळजीपूर्वक चालू होतीं.

पोलिस आणि भुजंगराव यांच्या तोंडांत बोळे कोंबतांना थोडी झटापट झाली, पण झटकन त्यांचें श्रीमुख रंगतांच सर्व कारभार सुरळीत चालू झाला.

हा सारा प्रकार रखमाच्या दृष्टीसमोरून गेला होता. कोणा एका हरदासानें आंबेगांवच्या विठोबाच्या देवळांत तानाजी मालुसऱ्याचें आख्यान लावलें होतें, त्या वेळीं तो सिंहगडावरील झटापटीचें वर्णन करीत होता. त्याची आठवण रखमाला या वेळीं झाली ! तिच्या आश्चर्यास पारावार राहिला नाहीं !

अशा आश्चर्यचकित स्थितींतच तिला उचलून नेऊन मोटारींत ठेवलें होतें. ती सावध होती, रंगीसारखी बेशुद्धीत नव्हती.

रात्रीच्या वेळी देखील ती मोटार भर वेगानें निघाली होती ! सडकेच्या दोन्ही बाजूंचीं अंधाराचा काळा बुरखा पांघरलेलीं झाडेंझुडपें भीति वाटल्या-मुळेंच कीं काय, मागें मागें झपाट्यानें पळत चाललेलीं रखमाला दिसत होतीं !

ती मोटार सुमारें पंचवीस मैलांवर असलेल्या पानगांवच्या खिंडींतील एका उंच जागीं थांबली. तेथें रंगीला उचलून एका तरुणानें खांद्यावर घेतलें. रखमाला त्या तरुणाच्या मागून जावें लागलें. तो तरुण त्या दोन्ही स्त्रियांना घेऊन एका आडवळणाच्या जागीं गेला !

रखमाला तो तरुण कोण आहे, हें चालतां चालतां कळलें. त्यामुळें ती निःशंकपणें पाय उचलीत होती. ठरलेल्या जागीं येतांच तो तरुण रंगीचें मस्तक मांडीवर घेऊन शून्य चित्तानें आकाशाकडे पाहूं लागला !

त्या वेळीं आकाशांत चांदण्यांची गर्दीच गर्दी झाली होती. जणूं काय, त्या तरुणाच्या मांडीवरील आपल्या मैत्रिणीला डोळे भरून पाहतां यावें, म्हणून त्या जमल्या होत्या !

रखमाची नजर सभोंवार गेली. तिला दूरदूर हातपाय पसरलेल्या काळ्याकुट्ट टेकड्यांच्या रांगा दिसत होत्या ! मधून मधून झाडींतून चाललेली वन्य श्वापदांची हालचाल तिच्या कानांवर येत होती आणि खालच्या दऱ्या-खोऱ्यांच्या पलीकडे सपाट मैदानांतील मेंढपाळांच्या कुत्र्यांचें भुंकणेंही तिच्या कानीं येत होतें.

आतां गार वाऱ्याची झुळूक सुटली. त्यामुळें रंगी हळुहळू सावध होऊं लागली.

जवळच असलेल्या झऱ्यांतील थंडगार पाणी रखमानें ओंझळीनें आणलें.

रंगीच्या तोंडांत त्या पाण्याचे थोडे थेंब जातांच अमृताचे बिंदु मुखांत पडल्या-प्रमाणें रंगी सावध झाली !

आपलें मस्तक एका तरुणाच्या मांडीवर आहे; हळुवार हातानें तो आपलें कानशील थोपटीत आहे; आपल्या केंसांवरूनही त्याचा प्रेमळ हात मधून मधून फिरत आहे; आणि तोंडानें तो आपल्या माहितीची गोड शीळ घालीत आहे; एवढी जाणीव झाल्याबरोबर तिला आपण तसेंच पडून राहावें, असें वाटूं लागलें.

किलकल्या नेत्रांनीं तिची दृष्टि आकाशाकडे गेली ! सुंदर चांदण्या तिला दिसल्या, पण रंगीला वाटलें, त्यांच्या स्वर्गसुखाला लाजविणारें पवित्र आणि सोज्ज्वल सुख आपण आतां ह्या पृथ्वीवरच उपभोगीत आहोंत !

त्या तरुणाला घाई होती. त्याला फार वेळ तेथें काढणें शक्य नव्हतें. तो डोळे भरून रंगीकडे पाहूं लागला. ती डोळे मिटून सावळ्याच्या मूर्तीचें ध्यान करीत होती.

त्या वेळी तो तरुण जरा अधीरतेनें म्हणाला––

"रंगे, सावध झालीस का ? आपल्या लग्नाला थोडेच दिवस झाले आहेत. पण त्या दिवसापासून मी वेड्यासारखा झालों आहें. आपल्या मन्यानेंच आपली ही भेट घडवून आणली ! पुन्हा केव्हां आपली गांठ पडेल तेव्हां पडेल ! आतां माझ्याशीं दोन शब्द बोल तरी !––"

रंगीच्या डोळ्यांतून गंगायमुना वाहूं लागल्या. तिनें सावळ्याच्या गळ्याला घट्ट मिठी मारली. अश्रूंच्या पुरानें त्याची छाती ओलीचिंब झाली. त्याचें अंतःकरणही शांत होऊं लागलें !

इतक्यांत मन्या दुरूनच म्हणाला,

"सावळ्या, आटप लवकर ! फार वेळ लावूं नकोस ! नाहींतर साराच घोटाळा होईल !––"

हे शब्द ऐकतांच सावळ्यानें रंगीला छातीशीं धरलें आणि तो हळुहळू बोलूं लागला,

"रंगे, तूं काळजी करूं नकोस. मी कांही फांशी जात नाहीं. मी कुणाचा खून केला नाहीं. करणारही नाहीं पण ! भुजंगरावानं आमच्यावर किटाळ आणलयं ! त्या दिवशीचं साखरगोटीखालचं भांडण त्याला झोंबलं एवढं !

त्याचा खून करावयाचा म्हटला, तरी देखील मी करीन! पण असलं पाप मला मुळीं करायचं नाही! मन्यालाही करायचं नाही! कुणालाच पण करायचं नाहीं! भुजंगरावासारखे गरिबांना नागवितात, त्यांना अद्दल घडेल असं करायचं आहे आम्हांला! त्यांत झालं तर गोरगरिबांचं कल्याणच होईल आणि भुजंगरावासारख्यांना धडा मिळेल!—"

त्या वेळी सावळ्यानें आपल्या तोंडावरील काळा बुरखा दूर केला होता. त्याच्या मुद्रेवरील गंभीरता रंगीच्या नजरेस येत होती. ती त्याच्याकडे पाहात म्हणाली,

"सावळ्या, असलं कांहीं मला कळत नाहीं. आतां मला काय वाटतंय तेंही सांगतां येत नाही! मी काय करूं? कसं वागू?..."

"रखमा मामी माझी आई आहे! ती तुला सांभाळील! तीच तुला कसं वागायचं तें सांगेल—"

सावळ्यानें हे शब्द भावनेच्या भरांत जरा मोठ्यानें उच्चारले. पति-पत्नींना एकांत मिळावा, म्हणून रखमा जरा दूर जाऊन बसली होती. तिच्याही कानीं हे शब्द पडले.

रखमाला आतां राहावेना. तिला भडभडून आलें. ती स्फुंदून स्फुंदून रडूं लागली. तिचे हुदके ऐकून सावळ्या म्हणाला,

"मामी, तू इकडे ये बरं! —"

रखमा सावळ्याजवळ आली. ती मांडी घालून बसली. तिच्या एका मांडीवर सावळ्यानें डोकें ठेवलें. दुसऱ्या मांडीवर रंगीनें आपलें मस्तक ठेवलें.

त्या प्रभातकाळीं परमेश्वराचें चिंतन करीत रखमानें आपले दोन्ही वरदहस्त त्या दोघांच्या मस्तकांवर ठेवले होते.

इतक्यांत मन्यानें सावळ्यास तयार राहाण्याचा गडबडीनें इशारा दिला. कोणी तरी माग काढून तिकडे येत असल्याचा त्याला संशय आला.

पण तो खाशा होता. त्याला तऱ्हेगांवच्या हालचालीवर नजर ठेवण्यास मन्यानें सांगितलें होतें. तो सायकलवरून अत्यंत वेगानें आला होता.

त्यानें येतांच तऱ्हेगांवची हकीकत सांगितली.

"आरडाओरड होऊन कचेरीकडे एकादा दुसरा माणूस येऊं लागला आहे. आपला पाठलाग होण्याचा संभव आहे."

ही माहिती कळतांच मन्याने सावळ्या आणि खाशा यांना आडरस्त्यानें ताबडतोब निघून जा, असें सांगितलें. रंगी आणि रखमा ह्यांना मोटारींत नेऊन बसविलें.

त्या दोघीजणी पुन्हा दिङ्मूढ होऊन गेल्या !

त्यानंतरचा मन्यानें चालविलेला आतताईपणा पाहून तर त्यांना चक्करच येऊं लागली !

मन्यानें आपल्या खिशांतून चाकू काढला आणि आपल्याच अंगावर दोनचार ठिकाणीं जखमा करून घेतल्या !

त्यानें आपले कपडे फाडले; त्या दोघींनाही आपलीं लुगडीं फाडावयास लाविलीं !

एक मोठा धोंडा हातांत घेऊन त्या मोटारीस दोन चार ठिकाणी पोचे पण पाडून घेतले !

त्यानें स्वत: हे वेडेचार केलेच आणि त्या दोघींनाही बेशुद्ध असल्याचें सोंग करून मोटारीत स्वस्थ पडून राहाण्यास सांगितलें !

त्यांनीं मुकाट्यानें मन्या सांगतो त्याप्रमाणे केलें ! मन्या सांगेल तसें ऐकावेंसेंच त्यांना वाटलें ! त्यांच्या मनावर मन्याच्या कर्तृत्वाची अशीच कांहीं विलक्षण मोहनी पडली होती !

पुन्हा मोटार भर वेगानें तऱ्हेगांवच्या रस्त्यास लागली.

लवकरच मन्याची मोटार तऱ्हेगांवच्या कचेरीसमोर येऊन उभी राहिली.

लोकांचा आणि पोलिसांचा घोळका त्या मोटारीभोंवतीं जमला. चक्क उजाडलें असल्यामुळें मोटारींतील सारा प्रकार लोकांना उघड उघड दिसत होता.

मन्या अधिकाऱ्यांना सर्व हकीकत सविस्तर निवेदन करूं लागला,

आपण कचेरीवर हल्ला करणाऱ्या लोकांचा पाठलाग कसा केला; त्या टोळीच्या हातून ह्या स्त्रियांची सुटका कशी करून घेतली; आपण किती जणांना जखमी केलें; आपल्याला कशा जखमा झाल्या; आपल्या मोटारीची नासधूस त्या चोरट्यांनी कशी केली; ह्या स्त्रियांची अब्रू घेण्याचा प्रयत्न त्या गुंडांनीं कसा केला; त्या झटापटींत आपलें आणि ह्या स्त्रियांचे कपडे कसे फाटले—

इत्यादि सविस्तर हकीकत त्यानें निर्भयपणें सांगितली !

सर्वांनीं त्याच्या ह्या धाडसी पराक्रमाचें कौतुक चालविलें ! सरकारी अधिकाऱ्यांनीही त्याची वाहवा केली !

भुजंगरावांच्या अंगावर मूठभर मांस चढल्यासारखें झालें. आपल्या दिमतीस असलेल्या आपल्याच इसमाच्या शौर्यामुळें दोन्ही स्त्रियांची सुटका झाली, ह्याचें त्यांना भूषण वाटलें !

आतां आपण पोलिसांच्या मदतीनें आरोपी लवकरच पकडू, अशीही बढाई मारण्यास भुजंगरावांनी कमी केलें नाहीं.

सावध असलेल्या पण बेशुद्धीचें ढोंग केलेल्या ह्या दोघी स्त्रियांना मन्यानें सांगितलेल्या हकीकतीची विलक्षण गंमत वाटत होती ! पण त्यांना हूं कीं चूं करतां येत नव्हतें !

कांहीं वेळानें त्या स्त्रिया शुद्धीवर आल्या. मन्याच्या जखमाही बांधण्यांत आल्या !

मन्याच्या कर्तबगारीचें वर्णन पुण्यामुंबईच्या वर्तमानपत्रांत भरपूर आलें !

  

भुजंगरावांनी रंगी, रखमा, आणि सदोबा यांची तुरुंगांतून सुटका करवून घेतली ! सर्व मंडळी आंबेगांवास आली.

रखमाच्या घरी असलेले साखरगोटीचे आंबे पिकून नासूंही लागले होते. तें पाहून रखमा म्हणाली —

"रंगू, ही साखरगोटी गोड खरी पण फार नासकी आहे ही ! सावळ्याच्या बापाचा हिनें बळी घेतला; तुझा भाऊही हिनं घालविला आणि आज सावळ्यावर तीच पाळी आली ! —"

"मामी—" रंगी म्हणाली, "साखरगोटीनं काय केलं आहे बरं ! ती कितीक पिढ्या तिथं आहे. तिचीं फळं गोड म्हणून हे हेवेदावे ! गोडामागं कीड असायचीच ग ! —"

रंगीच्या ह्या वेदांतानें रखमा चकितच झाली !

आणि सदोबा आपल्या एकतारीवर अभंग म्हणूं लागले,

*विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां ।*
*हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥*

# नका करूं नाश आयुष्याचा १०

खाखरगोटीप्रमाणें भुजंगराव आरंभी कांही कांही बाबतींत गोड विचाराचे आणि आचाराचेही पण होते. त्यांना लहानपणापासूनच तालमीचा नाद असे. कुस्त्यांच्या फडांत त्यांची पंच म्हणून निवड होई. एवढ्या लहान वयांत तो मान त्यांना मिळे, ह्याचें कारण त्यांचें मल्लयुद्धांतील नैपुण्य हें तर खरेंच, पण त्यांच्या निःपक्षपातीपणाच्या गुणामुळेंही हा मान त्यांच्याकडे चालून येई !

भुजंगरावांना भेदरट तालीमबाजांचा फार तिटकारा असे. असे लोक आपल्या शक्तीच्या बळावर गांवांतील गोरगरिबांवर गुरकावतील; पण सरकारी अंमलदारापुढें तेव्हांच माना वांकवितील. सैन्यांतील धैर्याच्या आणि शौर्याच्या कामगिरीकडे ते ढुकूनही पाहाणार नाहींत. अशा आडमुठ्यांचा उपयोग राष्ट्राच्या दृष्टीनें कांहीं नाहीं, असें त्यांचें मत होतें.

राष्ट्रीय बाण्याचे किंवा निदान उमद्या विचाराचे तरुण सैन्यभरतींत अधिकाधिक यावेत, म्हणून ते अहर्निश खटपट करीत असत. मन्यासारख्या निधड्या छातीच्या तरुणाच्या साहाय्यामुळें त्यांचें कार्य बरेंच यशस्वीही होत असे.

आंबेगांवचे कांहीं तरुण आपल्या विचाराचे आहेत, असें त्यांना आरंभापासून वाटत असे. म्हणून त्याकरितां आंबेगांवीं ते वरचेवर येत. पण आतां मात्र त्यांचें मन आंबेगांवाविषयीं उलट होऊं लागलें !

तऱ्हेगांवच्या कचेरीवर झालेला हल्ला खाशा, बजा आणि सावळ्या ह्यांच्या पुढाकारामुळें झाला, असा सुगावा पोलिसांना लागलेला त्यांच्या

कानीं आला ! मन्याचें देखील त्यांत अंग असावें, असेंही गुप्त पोलिस खात्यांतील एक अधिकारी भुजंगरावांजवळ अप्रत्यक्षपणें बोलले !

मन्यावरील पोलिसांचा असला संशय भुजंगरावांना पटला तर नाहीच, पण अशा प्रकारच्या संशयी वृत्तीमुळें कर्तबगार लोकांत असंतोष माजतो, असें त्यांनी सरकारी अधिकाऱ्यांना बजावलें होतें.

वास्तविक सरकारी अधिकारी जें बोलत होते, तें त्यांना मिळालेल्या माहितीवरूनच बोलत. अशा गुप्त नोंदी त्यांच्या कचेरीत करून ठेवलेल्या असत. मन्याविषयीच पाहा ना ! पोलिसांनीं मिळविलेली माहिती त्यांच्या गुप्त दप्तरांत पुढीलप्रमाणें होती.

"मन्या रामोशी हा महा बिलंदर दंगेखोर आहे. ह्याच्या बापजाद्यापासून ह्याचा मोठमोठ्या चोऱ्या करण्याचा धंदा आहे. ह्यानेंही अनेक चोऱ्या केल्या आहेत. त्या चोरीतील हजारों रुपयांचा सोन्याचांदीचा माल भुजंगराव देशमुखांच्या साहाय्यानें आटवून त्याची विल्हेवाट त्यानें केली आहे !......"

"भुजंगरावाच्या आश्रयाखालीं हा असल्यामुळें ह्याच्या विरुद्ध भरपूर पुरावा मिळू शकत नाहीं. म्हणून त्याच्यावर खटला करतां आला नाहीं --"

ही मन्याच्या विषयींची जुनी हकीकत झाली. त्यांत नवीन भर पुढीलप्रमाणें पडली आहे.

"मन्या हा एका गुप्त टोळीचा पुढारी असावा, असा दाट संशय आहे. ही टोळी आपल्याला गरिबांचा वाली समजते. श्रीमंतांना लुटून ती संपत्ति गरिबांस वांटून देण्याचा तिनें धूमधडाका सुरू केला आहे ! --"

"मुंबईतील मजुरांच्या चळवळींतले लोक ह्या टोळीत असावेत.--"

ह्या पोलिसांच्या माहितींत खरेंखोटेंपणा कितपत आहे, हें कळण्यास इतरांना मार्ग नाही.

पण मन्याची गुप्त टोळी होती, ह्यांत संशय नाहीं. त्यांत अलीकडे आंबेगांवचे खाशा, बजा, सावळ्या हे तरुण सामील झाले होते.

ही परिस्थिति उत्पन्न होण्यास भुजंगरावांची बदललेली वृत्तिही कारणीभूत होती हेंही तितकेंच खरें !

नाहींतर मन्यानें मिळवून दिलेल्या संपत्तीचा दुरुपयोग भुजंगराव करूं लागले नसते.

आतां भुजंगराव आपल्या जमिनीजवळच्या गोरगरिबांच्या जमिनी संपत्तीच्या जोरावर बळकावूं लागले होते ! धाकदपटशा दाखवून दलित वर्गाकडून ते मोफत कामें करून घेत होते ! आपल्या संपत्तीचे एकाचे दोन भल्याबुऱ्या मार्गांनी कसे होतील, ह्याचा त्यांना हव्यास लागून राहिला होता !

थोडक्यांत म्हणावयाचें म्हणजे संपत्तीचा मद त्यांना चढला होता !

संपत्ति आणि स्त्री यांच्या लोभानें माणसाच्या अंगच्या सद्‌गुणांचे मातेरें होतें !

रंगीच्या प्राप्तीच्या लोभानें भुजंगराव सावळ्याचा द्वेष करूं लागले. त्याला नेस्तनाबूद करण्याचा त्यांनीं आतां विडाच उचलला.

साखरगोटीचे आंबे जादा उबेमुळें जसे नासूं लागले, त्याप्रमाणें स्त्री आणि पैसा यांच्या जादा मोहामुळें भुजंगरावांच्या अंगचा मूळचा गोडपणा आतां नासण्याच्या मार्गास लागला. त्यांच्या मनांत आतां नासक्या विचारांचें प्राबल्य वाढूं लागलें !

त्यांत पुन्हा स्वार्थलंपट आबांच्या लोभाची भर पडली.

रंगीची पोरकट वागणूक आतां आबांना जेथें तेथें नडूं लागली. भुजंगरावही कांहींसे नाखूष झाले. त्यामुळें आबांना गुत्त्याचे मक्ते मिळण्याची शक्यता दुरावूं लागली !

रंगीसारखी गोड पोर आपल्यापासून दूर राहूं लागली, ह्याचें तर त्यांना फार वाईट वाटूं लागलें !

कैदेंतून सुटून आल्याला आतां एक महिना झाला असेल, पण रंगी त्या वेळेपासून रखमाकडेच राहिली होती. ती आबांच्या घरीं येत जात नसे, असें नाहीं. पण रखमाचें घर तें आपलें घर असें तिला वाटे.

सावळ्याचे मधून मधून येणारे निरोप रखमाकडेच येत. अशा प्रकारें कळणाऱ्या सावळ्याच्या खुशालीवरच समाधान मानून तिला आयुष्याचे दिवस कंठणें भाग होतें !

आतां सावळ्याला आंबेगांव बाजूस फिरकणेंही अशक्य होऊन बसलें होतें. पोलिसांची टेहळणी आतां त्या भागांत फार कडक होती. म्हणून त्याला जंगलांत किंवा डोंगरांच्या दऱ्याखोऱ्यांत दडून राहाण्याशिवाय गत्यंतर नव्हतें !

अशा प्रकारें सावळ्या आंबेगांवास येऊं शकत नव्हता, हें आबांच्या पथ्यावरच पडलें.

सावळ्यास पकडण्यांत यावें आणि त्यास जबर शिक्षा व्हावी, असेंही त्यांना वाटूं लागलें होतें. कारण तसें झाल्यासच रंगीसंबंधी त्यांच्या मनांत घोळत असलेली योजना सुरळीत पार पडणार होती !

रंगी आतां घरीं राहात नाहीं; रखमाकडेच राहाते, हें आबांना पसंत नव्हतं. बेताबेतानें तिची समजूत घालून तिला घरीं आणावें, असें त्यांना वाटत होतें.

मानसिक त्रासाचा परिणाम रंगीच्या प्रकृतीवर झाला होता. तिची प्रकृति बिघडूं लागली होती. गौराबाईच्या हें लक्षांत आलें होतें.

त्या रंगीला घरी बोलावून आणीत, कांहींतरी गोडधोड तिला खाण्यास देत. तिच्या प्रकृतीची विचारपूस करीत.

अशीच एकदां रंगी आबांच्या घरीं आली होती. गौराबाईनीं दिलेला संठगूळ खाऊन त्यावर ती दूध पीत होती.

इतक्यांत तेथें आबा आले. त्यांनीं प्रेमळपणें तिच्या पाठीवरून हात फिरविला. प्रकृतीबद्दल चौकशी केली. आणि ते अगदीं गोड शब्दांत तिला म्हणाले––

" रंगू, आतां तूं आपल्या घरीं राहा कशी ! मला तर तूं घरीं नसल्या-मुळें अगदीं चुकल्याचुकल्यासारखं होतं. आपला मळा सोडून सावळ्याच्याच मळ्यांत राखणीस जातेस. आपल्या मळ्यांत जाण्याचें, घरांत येण्याचें टाळतेस, हें मला नाही बरं दिसत, बाळ ! –– "

आबांच्या मनांतला हेतु रंगीच्या लक्षांत तेव्हांच आला. त्यांना समजेसें जरा स्पष्टपणें बोलावें, असें तिच्या मनानें बरेच दिवस घेतलें होतें. ही संधि बरी आहे, असें वाटून ती हळुहळू मृदु शब्दांत म्हणाली,

" माझें घर आणि तुमचं घर दोन्ही माझींच घरं ना ? माझं आतां लग्न झालंय आबा, म्हणून मी सासरीं राहातें-- "

रंगीचा बोलण्याचा हेतु आबांनीं जाणला. आपल्याही मनांतला हेतु तिच्या ध्यानांत आणून द्यावा म्हणून ते बोलूं लागले,

" रंगे, तुझं कल्याण व्हावं, हीच माझी इच्छा ! पण रखमीच्या नादानं कांहीं तरी बोलूं नकोस ! लग्न म्हणजे कांहीं पोरखेळ नव्हे. खेळांत पोरापोरींचीं लग्नं होतात, तीं काय सारीं खरीं असतात ? आपण मराठे म्हणजे क्षत्रिय आहोंत. त्यांचीं लग्नें देवाब्राह्मणांच्या साक्षीनें, मराठ्यांच्या घरंदाज पद्धतीनं झालीं, तर तीं खरीं लग्नं... "

" पण आतां नुसत्या नवरानवरीच्या गळ्यांत माळा घालून मराठा भट लग्नं लावतो की--"

गौराबाई रंगीवरील सहानुभूतीनें मध्येंच बोलल्या.

" गप्प बस ! तुला काय कळतंय ! उचलली जीभ लावली टाळ्याला ! रंगीला तूंच बिघडविलीस ! नाही तर किती गुणाची पोर होती ही ! --'

आबा गौराबाईवर उसळून बोलले.

हा चाललेला प्रकार रंगीला बोलावण्यास आलेली रखमा दाराआडून ऐकत होती. गौराबाईना आबा टोंचून बोलले, हेंही कांहीं तिला आवडलें नाहीं.

--शिवाय तिलाही रंगीच्या लग्नाविषयीं आबांना खडसून बोलायाचें होतेंच. आबांचा रंगीवरील घुस्सा तिला चांगला माहीत होता. ती लगेंच आंत येऊन म्हणाली,

" रंगीनं असं काय वावगं केलंय ? ती कांहीं कुणाचा हात धरून गेली नाहीं ना ? तिचं अन् सावळ्याचं लग्न पुष्कळ दिवस ठरलंच होतं ! मीच ठरविलं होतं तें ! --"

" पण तूं कोण ठरविणार ? " आबांनी म्हटलें.

आबांचा चेहरा लाल झाला होता. भांडणाऱ्या बोक्याप्रमाणें त्यांच्या डोळ्यांत संतप्तपणा दिसत होता !

आबा रखमाला इतकें टाकून बोललेले आजच गौराबाईनीं पाहिलें. त्यांना आश्चर्य वाटलें.

आबांच्या रागाच्या बोलण्याला रखमानें पण खडकावून उत्तर दिलें. आपला हात पुढें करून ती फणकाऱ्यानें बोलली,

"मी तिची आणि सावळ्याची मामी! मीच ठरविणार! मला कांहीं तिचा मळा अन् साखरगोटी घशाखालीं घालायची नाहीं! —"

आबांच्या मर्मी हे शब्द लागले.

इतक्यांत "आबासाहेब! आबासाहेब!" अशा हांका मारीत गुंडभट वाड्यांत आले.

गुंडभटांची व आबांची भेट बऱ्याच दिवसांत झाली नव्हती. गुंडभट आबांच्या घरीं नेहमीं येई, पण आबा कोठें तरी परगांवीं गेलेले असत. तऱ्हेगांवीं तर त्यांच्या सारख्या फेऱ्या चाललेल्या होत्या. सावळ्या, बजा, खाशा यांच्या हालचाली समजाव्या, म्हणून आबांची हरएक प्रकारची मदत पोलिस घेत होते.

ही गुंडांची टोळी आतां पुष्कळ धीट झाली होती. श्रीमंतांचीं धान्याचीं कोठारें लुटून त्यांनीं तीं कित्येक ठिकाणीं गरिबांना वांटलीं!

कवडीन् कवडीचा खोटानाटा हिशेब करून अडचणींत सांपडलेल्या गरिबांकडून पैसे काढून, गडगंज संपत्ति मिळविलेल्या लोकांचीं घरें ह्या टोळीनें लुटलीं; आणि लुटींतील ऐवज गोरगरिबांना बहाल करून टाकला!

सारांश, अशा प्रकारें कायद्याच्या अंमलास त्यांनीं अडथळा आणिला म्हणून गांवोगांवीं ह्यांचा पत्ता लावण्याकरितां पोलिस अटोकाट प्रयत्न करूं लागले.

त्यांनीं ह्या लोकांची सूक्ष्म माहिती काढण्याकरितां गांवोगांव आपले गुप्त दूत ठेवले होते. हीं कामें गांवांतील लोकांकडूनच बहुधा ते करवून घेत.

आंबेगांवचे आबा मोरे हे तर सरकारला उघड उघड मदत करणारे अशी त्यांची जुनी प्रसिद्धि होती.

पण मगनशेठची तशी स्थिति नव्हती. ते कॉंग्रेसचे कट्टे अभिमानी होते.

भुजंगराव, आबा यांच्याप्रमाणें कॉंग्रेसच्या चढत्या काळांत ते कॉंग्रेसमन झाले नव्हते. महात्मा गांधी कॉंग्रेसमध्यें शिरल्यापासून मगनशेठ कॉंग्रेसचे सभासद होते. विलायती जिनसांचा व्यापार ते कॉंग्रेसची स्वच्छ खादी

वापरून करीत ! पण आतां दरवडेखोरांच्या बंदोबस्ताकरितां तेही गुप्त दूताचें काम करूं लागले !

गुंडभटाचें काय ? पैसा दक्षिणेसाठीं देखील वाटेल तीं कामें ते करीत ! मग सरकारी मदतीचा लभ्यांश पदरांत पडूं लागल्यानंतर सावळ्याच्या हालचालींच्या गुप्त बातम्या पुरविण्याचें काम त्यांनीं पतकरलें ह्यांत नवल वाटण्यासारखें कांहीं नाहीं.

म्हणूनच गुंडभट नेहमीं आबांच्या घरीं येत ! गौराबाईशीं बोलत ! रखमा, रंगी यांची विचारपूस त्यांच्याजवळ करीत. रखमानें न कळत सावळ्याकडून आलेला निरोप गौराबाईच्या कानावर घातला असल्यास तो युक्तीनें भटजी त्यांच्याकडून काढून घेत !

मात्र आज गुंडभट आले होते, ते अगदी वेगळ्या कामाकरितां आले होते. लग्नसराई चालली, पण त्यांना तशी कांहीं अपेक्षेप्रमाणें मिळकत होत नव्हती. आबांना कांहीं तरी सांगून एकादें घबाड हातीं लागलें, तर पाहावें असा त्यांचा हेतु होता. मोठ्या धर्ममार्तंडाचा आव त्यांनी आज आणला होता. अंगभर भस्माचे पट्टे त्यांनीं फासले होते ! कपाळास आडवें पांढरें गंध लावून त्यांनीं डोकीस आपली जुनी पुराणी पगडी घातली होती ; आबांच्या खोलींतील बैठकीवर जेठा मारून त्यांनीं तंबाखू तोंडांत टाकली होती. तिची पिचकारी तेथून त्यांनीं खिडकीच्या बाजूस मारली पण तो सडा बैठकीवरच उडला होता !

आबा त्या खोलींत येऊन जरा सचिंत स्थितींत बसले होते. पण भटजींनीं एकदम कांहीं तरी बोलावयाचें ठरवून आपली मान झाडली व ते म्हणाले,

"आबा, मी बोलतों त्याचा राग येऊं देऊं नका. मी स्पष्टच आज बोलणार आहे, म्हटलंच आहे कीं, "निःस्पृहस्य तृणं जगत्—"

गुंडभटाकडे आश्चर्यानें पाहात आबा म्हणाले—

"बोला गुरुजी ! बोलू नका म्हटलं तर माझें तुम्ही थोडंच ऐकणार आहांत ! मग बोलाच कीं—"

"आबासाहेब मी खरं तेंच बोलतों" गुंडभटजी आबाकडे नजर टाकीत बोलूं लागले. "तुमच्या घरांत कोणीं जन्मलं, मेलं किंवा कुणाचं लग्न झालं,

तर भटपणा माझाच. तुमचा आमचा स्नेहही तसाच ! मी तुमच्याकरितां वाटेल तें केलं ! खुनाच्या खटल्यांत मी तुमच्याचकरितां खोटी साक्ष दिली ! एका पोटगीच्या दाव्यांत तुमच्या सांगण्यामुळं मी खोटं गंगापूजन केल्याचं सांगितलं ! काय सांगावं, तुमच्या लोभामुळें मी किती तरी वेळां खोटं बोललों ! आणि रंगीचं लग्न भटाशिवाय झालेलं तुम्हांला चालतंय ? अहो तें लग्न नव्हे ! हा काय अनर्थ तुमच्या घरांत ! उगीच नाहीं म्हणत मी धर्म बुडाला म्हणून ! पाखंड माजलं ! कली मातला ! हरे राम ! हरे राम ! हरे राम !—"

"मग काय करावं म्हणतां गुरुजी !—"

आबा सचिंतपणें बोलले,

"करायचं काय !" गुडभट उत्साहानें बोलूं लागले, "पोरीचं लग्न आपल्या पूर्वापार चालीरीतीप्रमाणें करा. चांगलं खंबीर स्थळ आणा, मी लावतों लग्न !

"पोर्टी पण काय करील ह्याचा नेम नाहीं, गुरुजी !—"

आबा काळजीच्या मुद्रेनें बोलले.

"वाटेल तें करणारे आबासाहेब तुम्ही, पोरीची सबब सांगतां ? तुम्हांलाच धर्म बुडवावयाचा आहे, झालें !"

गुंडभट हातवारे करीत बोलले.

दोघेही कांहीं वेळ स्तब्ध बसले. ते कांहीं तरी विचार करीत होते. आतां आबा बोलणार, तों भुजंगराव आल्याची वर्दी आली.

त्यांच्या बरोबर दहाबारा सशस्त्र पोलिसांची तुकडी होती.

आणखी हा नवीन कसला घोटाळा आहे, अशी शंका आबांना आली.

सारे पोलिस आबांच्या ओटीवर बसले. आबांच्या खोलींत भुजंगराव शिरले.

गुंडभटजींना भुजंगरावांनीं रामराम केला.

"हरे राम ! हरे राम !" हा गुंडभटाचा मंत्र चालूच होता.

इतक्यांत वाड्यांत सदोबा आले. ते तडक स्वयंपाकघरांत गेले. त्यांनीं अंगावर धोतर घेतलें होतें. त्यांच्या तोंडावर गंधाच्या मुद्रा होत्या. ते म्हणाले,

" अग ए, घरी चल की ! ––"

रखमा गौराबाईशी कुजबुजत बसली होती. रंगी केव्हांच घरीं गेली होती. मळ्यांत जाण्यास उशीर होत आहे, तें सांगण्याकरितां तिचा निरोप घेऊन सदोबा आले होते.

जातां जातां त्यांच्या नजरेस पोलिस पडले. त्यांनीं आश्चर्यानें त्यांच्याकडे पाहिलें.

ते पोलिस सदोबाकडे पाहून हंसूं लागले. तऱ्हेगांवच्या तुरुंगांत ही व्यक्ति होती. तेव्हांच्या गंमती पोलिसांना आठवल्या. पण सदोबा त्यांच्याकडे पाहात पुढील अभंग गुणगुणत चालले होते !

*आतां तरी पुढें हाचि उपदेश ।*
*नका करूं नाश आयुष्याचा ।।*

## कसायाच्या घरीं

## ११

आबांच्या वाड्यांत पोलिसांना येऊन फार वेळ झाला नाहीं, तोंच चावडींत उतरलेल्या त्यांच्या अधिकाऱ्यांकडून त्यांना तांतडीचे बोलावणें आलें !

पोलिसांना ताबडतोब तिकडे जाणें भाग पडलें.

त्या पोलिसांच्या दुपारच्या जेवणाची छान व्यवस्था करण्याविषयीं भुजंगरावांनीं वाड्यांत आल्याबरोबर आबांना सुचविलें होतें. त्याप्रमाणें आबाही ह्या मडळींना एक बोकड पुरेसा होईल किंवा नाहीं, ह्याचा विचार करीत होते. पण तें सुग्रास भोजन पोलिसांच्या मुखांत पडण्याचा योग नव्हता ! बिचाऱ्यांना उन्हातान्हाची पायपिटी करीत जवळच्या एका खेड्यांत सावधगिरीनें जलद जाण्याचा हुकूम मिळाला होता !

असा कांहीं प्रकार घडून येईल, ह्याची भुजंगरावांना कल्पना नव्हती. पण चावडींत नुकत्याच आलेल्या पोलिस अधिकाऱ्यांना एक महत्त्वाची बातमी मगनशेठनीं पुरविली होती.

जवळच्या एका खेड्यांत दंगेखोर लपून बसले आहेत, अशी ती बातमी होती !

पण सारेच पोलिस कांहीं तिकडे गेले नाहींत. त्यांपैकी कांही सावळ्याच्या घरावर पाहारा करण्याकरितां राहिले. कांही त्याच्या मळ्यातही टेहळणी करण्याकरितां गेले.

हा प्रकार पाहून आबा भुजंगरावांना म्हणाले—

" इथं आज दंगाबिंगा होण्याचा संभव आहे कीं काय भुजंगराव ?"

"तशी कांहीं आतां काळजी करूं नका आबा तुम्ही ! सावळ्या

आज इकडे फिरकण्याचा संभव आहे म्हणून पोलिसांचा पाहारा आहे त्याच्या घरावर ! पोलिस माझ्याबरोबर नेहमींच असतात. मन्या नसतो. पानगांवचा वाडा सांभाळण्याकरितां आतां त्याला मीं घरीं ठेवला आहे. फार प्रामाणिक आहे तो ! माझ्या रक्षणाकरितां पोलिस असल्यामुळें आमच्या सैन्यभरतीच्या सभा आतां बिनधोक पार पडूं लागल्या आहेत. नाहीं तर काय हो ! अशाही सभांवर गुंडांनीं हल्ले चालविले होते ! बरोबर मन्या असे, म्हणून मला काळजी नसे !"

भुजंगराव आबांना धीर देत म्हणाले.

तरीही आबा कांपऱ्या स्वरांत म्हणाले,

"मग आज हे इतके यमदूत येथें कशाला ? कांहीं म्हणा, मला देखील पोलिसांची भीति वाटूं लागली आहे, भुजंगराव ! —"

"आबासाहेब, तुम्हांला भीति कसली ? तुम्ही कांहीं गुन्हा केला नाहीं ना ?"

"मी कशाला गुन्हा करितों. पण ती रखमा आहे ना ? कचेरींत कांही तरी बडबडत होती, तशी बडबडेल देखील एकादे वेळ पोलिसांशीं ! ..."

आबा सचिंतपणें म्हणाले.

"असल्या भुरट्या स्त्रीची तुम्हांला भीति वाटते आबासाहेब ? —"

भुजंगराव आंगठ्या जवळचें बोट हलवीत बोलले. त्यामुळें आबा लाजल्यासारखे झाले !

❦ ❦ ❦

सायंकाळच्या सुमारास चावडींत पुष्कळ गांवचे लोक जमले होते. तेथें सैन्यभरतीची सभा होती. त्या सभेंत सैन्यभरतीच्या स्पेशल अधिकाऱ्यानें इंग्रजींत भाषण केलें. भुजंगरावांनीं त्याचा चांगला लोकांना समजेसा मराठींत अनुवाद केला. त्यामुळें तो इंग्रज अधिकारी खूष झाला ! आणि भुजंगरावास म्हणाला,

"तुम्ही फार चांगलं काम करितां ! तुम्ही सैन्यांत या भुजंगराव ! तुम्हांला बादशाही कमिशन मिळेल कीं —"

भुजंगरावांनीं 'होय' म्हणून उत्तर दिलें खरें, पण त्यांचें मन तसें करण्यास

ताबडतोब धजेना. बोलण्याचें धैर्य वेगळें आणि कृति करण्याकरितां लागणारें धैर्य वेगळें, असें तर नसेल ना?

ह्याचा उपयोग भुजंगरावांनीं एवढाच करून घेतला कीं, साहेब देखील आपल्यावर खूष आहेत, असें ज्यांना त्यांना ते सांगूं लागले!

मगनशेठच्या दुकानीं संध्याकाळीं भुजंगराव बसले असतां, त्यांच्या तोंडीं तोच विषय होता. तेथें त्यांना पोलिसांनीं दंगेखोर लपून बसलेल्या खेड्यावर घातलेला छापा फुकट गेल्याचें कळलें. मगनशेठनें बातमी दिल्या-प्रमाणें तेथें दंगेखोर लोक होते, हें खरें. पण पोलिस येण्यापूर्वीं तास दोन तास अगोदर ते तेथून पसार झाले होते!

मगनशेठ त्यामुळें फार हळहळला. नाही तर भुजंगरावांप्रमाणें घरी बसल्या बसल्या अधिकाऱ्यांची आपण पुष्कळ मर्जी संपादन केली असती, असें त्याला वाटत होतें! त्याला तशी मर्जी संपादण्याची जरूरी पण अलीकडे वाटूं लागली होती!

युद्धाच्या सुरुवातीपासून त्यानें चांदीचीं नाणी सांठविण्यास सुरुवात केली होती. त्याच्याजवळ तसे शेंकडों रुपये जमा झाले होते! चांदी महाग होऊं लागली, तसा तो रुपये आटवून त्यांतील चांदी मुबईस जाऊन विकतो, असा त्याच्यावर पोलिसांचा संशय होता.

पोलिस संरक्षणाकरितां येवोत किंवा कशाकरितां येवोत, त्यांची भीति कांहीं ना कांहीं कारणानें लोकांना वाटते खरी!

पोलिस व सैन्यभरतीचे अधिकारी मोटारीनें निघून गेले होते. त्यामुळें राहिलेल्या पोलिसांना हायसें वाटलें! रात्रीं त्यांचा मुक्काम आबाच्या वाड्यांत होता. भुजंगरावांच्या संरक्षणार्थच ते तेथें राहिले होते! दिवसभर झालेल्या श्रमामुळें त्यांना भूकही चांगली लागली होती. आणि आबांच्या घरीं त्यांना चांगला चमचमीत मांसाहारही मिळाला!

रात्रीं सर्वांना शांतपणें गाढ झोंप लागली.

गांवांत पोलिस पार्टी असल्यामुळें लोकांनाही निर्भयता वाटत होती. वैशाख महिना संपत आला होता. त्या दिवशींच्या त्या काळोख्या रात्रीं मध्यान्हीनंतर एकदम सशस्त्र गुंडांनीं मगनशेठच्या घरास वेढा दिला! आबांचा वाडा रोखून धरला! नाक्यांच्या जागीं त्यांचाच पाहारा बसला!

मगनशेठच्या घरांतील माणसांची तोंडें बांधून त्यांना हूं कां चूं करूं दिलें नाहीं !

शेंकडों रोकड रुपये गुंडांनीं लांबविले. जीं नाणी त्यांना नेतां आलीं नाहीत, त्यांचा घरभर सडा झाला !

गुंड ताबडतोब बिनधोक पसार झाले !

सकाळी पोलिसांच्या कानीं ही बातमी पडल्याबरोबर, इतके रोकड रुपये मगनशेठजवळ कसे आले, येथपासून चौकशीस सुरुवात झाली. पैशापरी पैसा गेला आणि भीक नको पण कुत्रा आवर, अशी स्थिति मगनशेठची झाली !

त्या टोळीत सावळ्या होता. दुपारी तो मळयांत कोठेतरी दडून होता. रात्रीं तो रखमा व आणि रंगी ह्यांना भेटला. अशा भुमका गांवभर पसरल्या !

त्यामुळें रखमाच्या घरावर पोलिसांचा जास्त कडक पाहारा बसला.

रखमा आणि रंगी यांची स्थिति कैदेंत असल्यासारखी झाली !

तीनचार दिवस भुजंगरावांनीं आंबेगांव सोडलें नाहीं. त्यांना मगन-शेठना रोकड सांठवून ठेवण्याच्या आरोपांतून सोडवावयाचें होतें !

पोलिसांचा घरादारांवर कडक पाहारा आणि सावळ्या संबंधीच्या वेड्यावांकड्या अफवा, ह्या परिस्थितीचा रंगीच्या प्रकृतीवर अतिशय वाईट परिणाम झाला. तिला आपल्या घराचाच काय, पण आंबेगांवाचाही कंटाळा आला ! तिटकारा पण वाटूं लागला !

दोन तीन दिवसानंतर आजारी स्थितीत असलेल्या रंगीला गौरा-बाईनीं घरीं आणलें.

तिनें तोंडांत अन्नाचा घांस घातला कीं, तो मळमळून बाहेर पडे. ओकून ओकून ती घाबरी होई.

तिला गौराबाईनीं स्वयंपाकघराला लागून असलेल्या खोलींत निजविलें होतें.

रंगीचे खोल गेलेले डोळे आणि बसलेले गाल पाहून त्यांच्या पोटांत धस्स होई !

रंगीला औषध देऊन दुपारच्या जेवणाची तयारी गौराबाईनीं चाल-विली होती. त्या मनांत म्हणूं लागल्या,

"काय ह्या पोरीची स्थिति झाली ! साखरगोटीसारखी गुटगुटीत पोर ही ! पण आज ती किती वाळून गेली ! कारभाऱ्यांना काय म्हणावं ! ज्याला जें आवडतं तें करूं द्यावं ! सावळ्या हिला आवडला होता ; त्यांत काय वाईट होतं !—"

इतक्यांत रगीला पुन्हा ओकारी आली. मोठी ओकारी होती ती ! तीमुळें रंगी घामाघूम होऊन गेली. गौराबाईनीं तिचें डोकें गच्च दाबून धरलें होतें.

आज स्वयपाकांत त्याचें लक्ष लागेना. कसा तरी स्वयंपाक घाई-घाईनें त्यांनीं उरकला होता !

भुजगराव आणि आबा जेवावयास बसले.

भात कच्चा राहिल्याची कुरकूर आबा करीत होते. इतक्यांत त्यांनी आमटीचा भुरका मारला. आबांचें तोंड खारटढोण झाले ! त्यांनी गौरा-बाईवर डोळे वटारले ! आणि दरडावून म्हटलें,

"आज डोकं ठिकाणावर नाही काय तुमचं ! भुजंगराव काय म्हणतील असल्या स्वयंपाकाला !"

"चालायचंच असं ! तसा कोणताही पदार्थ कांहीं वाईट झाला नाही, म्हणा —"

सहानुभूतीच्या स्वरांत भुजंगराव म्हणाले.

ह्यामुळे गौराबाईना थोडा धीर आला आणि त्या भाजी वाढतांना पतीकडे नजर टाकून म्हणाल्या,

"रगी ओकतेय भडाभडा ! तिला तापही भरलाय ! मला सुचेना कांहीं !"

"कार्टी गुणाचीच तशी ! तिनंच आमच्या अब्रूची धूळधाण उडविली !"

आबा तोंड वांकडें करून म्हणाले.

"अब्रूचा यांत काय संबंध आबासाहेब ?" भुजंगराव शांतपणें बोलूं लागले. "झाला खरा सारा पोरखळ ! ह्याच्यासाठीं इतकं कांहीं वाईट वाटून घ्यायला नको आपण—"

इतक्यांत रंगी 'आईग, आईग,' असें विवळली. तिला चक्कर आल्या-सारखें झालें. "काकू ! काकू !" अशा ती हांका मारूं लागली.

गौराबाईनीं हात धुतले आणि त्या रंगीकडे धांवत गेल्या.

इकडे दोघांनीं आपलें जेवण आटोपतें घेतलें. त्यांनीं हात धुतले आणि रंगीच्या खोलींत ते दोघे डोकावून पाहूं लागले.

रंगी भडभड ओकली. नंतर स्वस्थपणें खाटेवर पडली. थोड्या वेळानें तिचें डोकें किंचितसें उतरलें. तेव्हां गौराबाई वाकून तिच्याकडे नजर टाकीत तिला थोपटीत होत्या.

रंगीनें डोळे उघडले आणि ती हळुहळू बोलूं लागली.

"काकू, आतां ह्या गांवांत राहाणं नको मला! कुठं तरी जाऊं या ग! —"

त्या वेळीं आबा खोलींत आले आणि म्हणाले,

"पाठवीन कुठं तरी चांगल्या हवेच्या ठिकाणी तुम्हांला! रंगू, डोळे मिटून पड! तुला बरं वाटूं लागेल! —"

आबांच्या सहानुभूतीच्या बोलण्यानें गौराबाईच्या डोक्यांत एक कल्पना आली. तिचें माहेर पानगांवीं होतें. ऱ्याच दिवसांत त्याही माहेरीं गेल्या नव्हत्या. पानगांवची उन्हाळ्यांतील हवा थंड म्हणून प्रसिद्ध होती. तिकडे रंगीला घेऊन गेल्यास माहेर व हवापालट ह्या दोन्हीही गोष्टी साधतील, असें त्यांना वाटलें.

पुढें दोन तीन दिवस रंगी आबांच्याच घरीं होती. तेथें पोलिसांचा त्रास नव्हता. भुजंगराव पानगांवीं जाऊन मनासारखी कांहीं व्यवस्था करून आले होते.

त्या मुदतीत आबांनी पण एक निश्चय पक्का ठरविला होता. ते भुजंगरावांची वाटच पाहात होते! भुजंगरावांनीं आल्याबरोबर रंगीच्या प्रकृतीची चौकशी केली. तिची प्रकृति सुधारत असल्याचें ऐकून त्यांचा चेहरा जरा खुलला!

रात्रीचीं जेवणें आटोपल्यावर भुजंगराव व आबा खोलींत एका महत्त्वाच्या गोष्टीचा खल करीत बसले होते.

त्या वेळीं भुजंगराव म्हणाले——

"सावळ्याला पकडण्यात आले, म्हणजे आपला मार्ग सुलभ होईल आबासाहेब! मग मी लोकापवादाला भीत नाहीं. रंगी शुद्ध आहे, हें मी जाणतों —"

" आतां वैशाखाचा महिना संपून ज्येष्ठ सुरू झाला, घाई केली पाहिजे आपल्याला ! --"

आबा भुजंगरावाकडे उत्सुकतेनें पाहात म्हणाले.

" पण आबासाहेब, अशी घाई कशी चालेल ? कोणी कोर्टदरबार केला तर ?-- "

भुजंगराव गंभीरपणें बोलले.

" पुरावा भक्कम कीं निकाल आपला ! जन्मभर मी हेंच करीत आलों कीं ! पैसा ओतला कीं, पुरावा तयार ! --"

" पुरावाही तसाच खंबीर पाहिजे --" भुजंगराव म्हणाले.

" त्याची नको तुम्हांला काळजी ! आपला गुंडभट इकडची पृथ्वी तिकडे करील !"

गुंडभटाला त्या रात्री गड्यानें बोलावून आणलें. तो भीतभीतच आला होता !

त्यानें आल्यावर आपले दोन्ही हात जोडले आणि म्हणाला--

" कां बोलावलं यजमानांनीं ? भुजंगरावही आहेत ! कांहीं हव्यकव्य आहे वाटतं ?--"

गुंडभटाला त्यांनीं आपला हेतु हळुहळू सांगितला. त्यानें भीति वाटत असल्याचें थोडें ढोंग केलें. आबांनीं त्याच्या हाताचा आंगठा दाबल्याबरोबर गुंडभट खुशींत येऊन म्हणाला--

" करूं नका काळजी कशाची आबासाहेब ! तुमच्याकरितां मी पाहिजे तें करीन. मी विश्वामित्र गोत्राचा ब्राह्मण आहे ! आम्ही मूळचे पराक्रमी आहोंत ! कितीदां तरी क्षत्रियांचा निःपात केला विश्वामित्रांनीं ! त्याला कशाची भीति ?"

" गुरुजी " भुजंगराव म्हणाले " येथें तोडायचं नाहीं, जोडायचं आहे ! तोडण्याची भाषा बोलूं नका भटजी ! दक्षणा काय ! आबा देतील त्याच्या दुप्पट आमची ! --"

गुंडभटाला अतिशय आनंद झाला. पण भुजंगरावाचा गैरसमज झाला असेल, तो दूर व्हावा म्हणून त्यांनीं तोंड वाईट केलें आणि दोन्ही तोंडांत मारून घेऊन ते म्हणाले--

" अब्रह्मण्यम् ! अब्रह्मण्यम् ! चुकलों थोडासा ! कुळाचा अभिमान उसळला आमचा ! क्षमा करा ! पण तुमचं काम फत्ते करून देण्याची हमी माझी--"

आबांचा आंगठा शंभराचा आणि त्याच्या दुप्पट भुजंगरावाचे त्यांना मिळणार होते. मग त्यांना आनंद कां होणार नाहीं !

भटजी आनंदांत निघून गेले. भटजी गेल्यावर आबा आणि भुजंगराव खो खो हंसूं लागले.

* * *

सकाळी चहाच्या वेळीं ते दोघे स्वयंपाक घरांतच आले. आबांनीं रंगीला उठवून आपल्याजवळ बसवून घेतलें. तिच्या पाठीवरून हात फिरवून " किती वाळली ही !" असें म्हटलें.

यजमान खुषींत आहेत असे पाहून गौराबाई हळूच म्हणाल्या --

" रंगीला हवापालट करण्याकरितां माहेरीं नेऊं कां मी ? तिथं तिला चांगलं बरं वाटेल !—"

" वा ! छान ! किती तरी दिवस तुम्हीही माहेरीं गेला नाही. रंगीला घेऊन जा कीं !--"

" आमच्या नदीकांठच्या बंगल्यांतच राहा ना, कांहीं दिवस तुम्ही ! मोठे मोठे साहेब तेथे येतात हवा पालटायला ! तिथं आठ पंधरा दिवसांत कोणीही बरं होतं !--"

रंगीला भुजंगरावाचा तो उदारपणा वाटला. तिनें त्यांच्याकडे पाहिलें. तिला त्याचें ठिकाणी बंधुत्व दिसूं लागलें !

भुजंगरावांना पण समाधान वाटलें.

रखमाला घरची सारी माहिती देऊन त्याच दिवशीं दुपारीं गौराबाई रंगीला घेऊन मोटारीतून पानगांवला निघाल्या.

रखमाला मात्र सारखी हुरहूर वाटूं लागली. तिचे डोळे भरून आले मोटार दिसेनासी होईपर्यंत ती तिकडे पाहात होती !

तिच्या मनांत एक दुष्ट विचार आला--

" कसायाच्या घरीं तर गाय जात नाहीं ना ?"

## काळजीच नको

## १२

पानगांव आणि आंबेगांव हीं दोन्ही गांवें तऱ्हेगाव तालुक्यांतीलच होत. आंबेगांवापासून पानगांव सुमारें सोळा सतरा मैल अंतरावर आहे आणि ह्या दोन्ही गांवांपासून तऱ्हेगांव चांगलें वीस पंचवीस मैल लांब आहे.

तऱ्हेगांव हा उत्तरेच्या बाजूचा त्रिकोणाचा शिरोबिंदु म्हटला, तर पानगांव आणि आंबेगांव हीं त्या त्रिकोणाच्या पायाचीं टोंकें होत. अशी त्या गांवांची रचना आहे खरी !

पानगांव आणि आंबेगांव हीं गांवें सह्याद्रीच्या एका ओळीनें जोडलेलीं असून तऱ्हेगांवाहून पानगांवास जातांना सोळा सतरा मैलांवर एक खिड आहे. त्या खिडींत नेहमीं चोरट्यांची भीति असते.

आंबेगांवाहून पानगांवास मोटारीनें जावयाचें झाल्यासही ह्या खिडी-तीलच सडकेनें जावें लागतें. त्याशिवाय दुसरा सडकेचा मार्ग नाही. पायवाटा वाटेल तितक्या आहेत.

त्या खिडींतून गौराबाई, रंगी वगैरे मंडळींची मोटार चालली असतां खिडींतील झरीचें पाणी घेण्याकरितां तेथें काही वेळ ती थांबली. भुजंगराव बरोबर होतेच. ते गौराबाईंना तेथून दिसणारा सुंदर देखावा दाखवीत होते.

रंगीलाही तो भाग पाहून एकदम कसली तरी गोड आठवण झाली. तऱ्हेगांवाहून मन्या आपल्याला ह्याच खिडींत घेऊन आलेला होता. साव-ळ्याची भेट येथेंच झाली होती. तो आनंदाचा क्षण आठवून तिच्या मुखावर किंचितशी लाली चढली !

त्याच वेळीं भुजंगरावांची नजर तिच्याकडे गेली. तिच्या चेहऱ्यावरील टवटवी निरखून ते म्हणाले--

"ह्या खिडकीतल्या हवेनं कोणालाही आनंद वाटतो. आमच्या पानगांवच्या बंगल्यांत तर ह्यापेक्षां मजा आहे! --"

त्यांनीं दूर अंतरावर दिसणारें पानगांव बोटानें दाखविलें.

त्या खिडकीतून दिसणारा पानगांवचा देखावा मोठा रमणीय होता. ह्या गांवाच्या दक्षिण आणि पश्चिम बाजूस वृक्षाच्छादित डोंगर असून पूर्वेस आणि उत्तरेस उतरतें मैदान पसरलें होतें.

ह्या डोंगराच्या उतरणीवर पानगांव होतें. आणि त्या गांवापासून सुमारें एक मैल अंतरावर नागमोडी नदीच्या कांठी भुजंगरावांची गढी व बंगला होता.

मोटार गढीकडे जाऊं लागली, तसे दोन्ही बाजूचे नवे नवे पानमळे दिसूं लागले. छोट्या नागमोडी नदीला ठिकठिकाणीं अडवून त्या धरणाच्या पाण्यावर हे मळे, केळीच्या बागा आणि फुलबागा ह्यांनी ही भूमि तारुण्यांत नुकतेंच पाऊल टाकलेल्या मुग्ध बालिकेप्रमाणें मोठी मोहक दिसत होती!

मोटार गढीजवळ आली, तेव्हांपासून दिसणाऱ्या शोभेत अधिकच भर पडली. भुजंगरावांच्या वडिलांनीं पुण्याहून रोपें आणवून मुद्दाम लाविलेल्या पेरू, संत्रीं, मुसंबीं ह्यांच्या बागा आतां भर तारुण्यांत आल्या होत्या. मुसंब्यांचीं झाडें त्यांच्यावरील फलांच्या भारांनीं वांकून गेलीं होतीं.

गढीच्या जवळून वाहाणारी नागमोडी नदी मात्र खंगून गेल्याप्रमाणें अगदीच मंदमंद वाहात होती! रंगीप्रमाणें तिच्याही अंतःकरणांत कडक उन्हाळ्याची काळजी शिरल्यामुळें तिची अशी स्थिति तर झाली नसेल ना?

गढीच्या सभोंवतीं जुनी तटबंदी होती. आंत एक जुना वाडा होताच. पण भुजंगरावांनीं तेथे नवीन तऱ्हेची एक बंगली पण मोकळ्या जागेंत बांधली होती.

त्या बंगलींत शिकारीकरितां आलेल्या युरोपियन पाहुण्यांचे मुक्काम पडत. कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या कारकीर्दींत याच गढीत त्यांच्या एकदोन

बैठकी झाल्या होत्या. त्या वेळीं मंत्र्यांनीं तेथे भुजंगरावांचा पाहुणचारही यथेच्छ घेतलेला होता.

सत्ताधाऱ्यांचा सन्मान करून राजमान्यता संपादन करण्याचा जो सांप्रदाय आपल्याकडे आहे, त्यांतीलच भुजंगराव हे एक होते ! कोणत्याही राजवटींत असे लोक सत्ताधाऱ्यांच्या आवडीचे होतातच !

तेथें सुंदरशी फुलबागही होती. तीतील चौथऱ्यावर गौराबाई आणि रंगी विश्रांतीकरितां जाऊन बसल्या. गौराबाईच्या माहेरची मंडळीही तेथें आलीं होती. गडी माणसांची तर तेथें रेलचेल होती. तोंडांतून शब्द काढण्याचा अवकाश कीं, पाहिजे तें पुढें हजर !

अशा वैभवसंपन्न ठिकाणानें गौराबाई तर अगदी दिपून गेल्या. पण रंगीला भुजंगरावांच्या ह्या श्रीमंतीचें कौतुक वाटत नव्हतें ! तिला तिची आंबराई ह्यापेक्षां किती तरी श्रेष्ठ वाटत होती !

गाईचें दूध, उत्कृष्ट फळें, सुंदर हवा आणि लाभलेलें कांहीसें मानसिक स्वास्थ्य ह्यामुळें रंगीची प्रकृति तेथे जलद सुधारूं लागली ! आठ पधरा दिवसांत तिच्या मुखावर चांगलीच टवटवी दिसूं लागली !

त्यामुळें गौराबाईनाही समाधान वाटलें.

आबा पानगांवीं येऊन गेले. त्यांनाही रंगीला आनंदी पाहून बरें वाटलें.

रंगीला तेथे समाधान वाटण्याचें एक विशेष कारणही होतें. भुजंगरावांच्या गांवच्या वाड्याच्या देखरेखीवर मन्या असे. तो केव्हां केव्हां गढींत येऊन रंगीला भेटे. त्यामुळें सावळ्याच्या खुशालीची हकीकत तिला वरचेवर कळे.

एक दिवस नागमोडी नदीच्या कांठीं सायंकाळच्या वेळीं सावळ्याची आणि रंगीची भेटही पण मन्यानें करून दिली होती !

त्या दिवशीच पानगांवच्या खिंडींत या टोळीची गुप्त बैठक होती. म्हणून मन्या आणि सावळ्या यांना तांतडीनें तिकडे जावें लागलें होतें.

त्या बैठकींत मन्यानें सुचविलें,

"गढीवर हल्ला करून रंगीला तेथून पळवून न्यावें —"

"पण असें केल्यानें आपणच घोटाळयांत पडू. स्त्रियांच्या पाशानेंच आतांपर्यंत आपल्यासारखे लोक सांपडले आहेत––"

खाशानें आपलें मत दिलें.

सावळयालाही तें पटलें. त्याला तो व्यक्तिगत स्वार्थ वाटला. त्यानें मनाशीं विचार केला––"रंगी कांहीं कसल्याही मोहाला बळी पडणार नाही, ही आपली खात्री आहे. आजची घटका आज चाललीय खरी! पुढं काय होईल तें होईल!"

त्या टोळीतील लोकांपुढें निश्चित असा पुढचा मार्ग कोणताही नव्हता! कांहीं तरी अघटित करावयाचें, अशा प्रवृत्तीचे हे तरुण कांही तरीच करीत होते एवढें खरें!

त्या बैठकीत गढीवर हल्ला करण्याचें ठरलें तर नाहीच, पण भुजंग-रावांच्या गांवांतील वाड्यावर हल्ला करण्याच्या बाबतीतही मतभेद झाला! टोळीचा नायक मन्याच म्हणूं लागला––

"मी त्याचं अन्न खातोय! रामोशी लोक ज्याचं अन्न खाल्लं त्याच्या घरावरच धाड घालीत नाहीत––"

शेवटी सर्वांच्या विचारानें एक तडजोड निघाली. मन्यानें त्या दिवशीं हल्ल्याच्या वेळी तेथें असू नये. कोठें तरी संस्थानच्या हद्दींत जावे. नंतर तिकडेच सगळयांनीं जमावें ही ती तडजोड होय.

रात्री भुजंगरावांच्या पानगांवांतील वाड्यावरच गुडांचा भयंकर हल्ला झाला! त्या दिवशीं भुजंगरावांच्या परवानगीनेंच मन्या परगांवी गेला होता! त्याच्या मदतीच्या अभावामुळें भुजंगराव निराश झाले! गांवांतील लोक भीतीमुळें का म्हणाना, त्यांच्या मदतीस आले नाहींत!

वास्तविक त्या गांवांत भुजंगराव लोकप्रिय नव्हतेच मुळी. लोकांना पिळून आपली तुंबडी भरणारे असा त्यांचा तेथें लौकिक होता. मग अशा गृहस्थाच्या संकटकालीं लोक आपले जीव धोक्यांत घालतील कशाला?

भुजंगरावांजवळील नोटांचीं पुडकीं चोरांनीं लांबविलीं. रोकड पळ-विली. लोकांनीं लिहून दिलेल्या प्रॉमिसरी नोटा जाळण्यांत आल्या.

भुजंगरावांच्या तोंडाला गच्च काळें फडकें बांधून त्यांना बळकट डांबून ठेविलें होतें. त्यामुळें त्यांना ते लोक ओळखतां येणें शक्य नव्हतें! पण

त्यांत सावळ्या, बजा आणि खाशा हे असले पाहिजेत, हें त्यांच्या कानीं पडणाऱ्या तुटक तुटक शब्दांच्या आवाजावरून त्यांनीं निश्चित ताडलें !

मन्याला परगांवीं पाठविल्याचा पश्चात्ताप भुजंगरावांना त्या वेळी फार झाला.

मात्र गढीवर लोकांनीं हल्ला केला नाही, ह्यामुळें त्यांना पुष्कळसें बरें वाटलें. सोन्याचांदीचा सांठा गुप्तपणें त्यांनीं गढीतच पुरून ठेविला होता. आणि बहुमोल रत्नांनाही लाजविणारें रंगीसारखें रत्न पण त्या गढीतच होतें !

भुजंगरावांच्या वाड्यावरील हल्ल्यांत सावळ्या असला पाहिजे, हें रंगीनेंही ताडलें होतें. आतां तर भुजंगरावही राजरोसपणे तेंच म्हणूं लागले. त्यांनीं पानगांवास पोलिसचा बंदोबस्त चांगलाच करून घेतला. सावळ्या गढीवर हल्ला करण्यास चुकणार नाही, अशी अधिकाऱ्यांची त्यांनी खात्री करून दिली. त्यामुळे गढीच्या रक्षणार्थ सशस्त्र पोलिस येऊन राहिले !

रंगीचे सुमारे पंधरावीस दिवस तेथे कांहीसे आनंदांत गेले होते. तिची प्रकृतिही पुष्कळ सुधारली होती, पण पुन्हां पोलिसांचा त्रास व सावळ्याची काळजी ह्यामुळें तिला सुखाचा घासही गोड लागेना !

मन्या अद्यापि आला नव्हता. पोलिसांचा त्याच्याविषयींचा संशय दृढ झाला होता. भुजंगरावांना मात्र तसें वाटत नव्हतें.

ह्या गुंडांनीं साऱ्या तालुक्यांत गेले दहाबारा दिवस फारच गोंधळ माजविला होता, त्यामुळें श्रीमंताची तर पांचावर धारण बसली होती ! म्हणून आतां पोलिसांचा बंदोबस्त प्रत्येक गांवी अगदी कडक चालू झाला !

मन्याला प्रथम पकडलें, म्हणजे त्याच्या हाताखालच्या टोळीस पकडणें सोपें जाईल, असा पोलिसांचा विचार ठरला; आणि त्याच्या पाळतीवर गुप्त पोलिस राहिले.

पोलिसांप्रमाणेंच का म्हणाना, मन्याच्या पाठीमागे एकसारखें आणखी एक माणूस होतें. पण तें त्यास पकडण्याकरितां नव्हतें. त्यास सन्मार्गावर आणण्याकरितां होतें !

त्याची बायको सखी बहुतेक मन्याच्या मागें मागें असे. दारूच्या गुत्त्यांमध्यें ती नेहमीं त्याचा तपास करी !

भुजंगरावांच्या वाड्यावरील हल्ला मन्यानें करविला, त्याला आतां

पकडणार, अशी बोलवा तिच्या कानी पडल्याबरोबर ती त्याच्या तपासास आंबेगांव सोडून बाहेर पडली.

रंगीला सावळ्याकडून कांहीं निरोप कळण्याचा संभव आहे, असें वाटल्यामुळें ती एके दिवशीं रंगीकडे आली.

पण तशी कांहीं माहिती रंगीला नव्हती.

तेव्हां सखीनेंच मन्याच्या शोधाकरितां कशी खटपट केली, हें रंगीला बंगलीपुढील बागेंत एका बाजूस बसून हळुहळू सांगितलें.

ती म्हणाली—

"मी पानगांवला दोन चार दिवसांपूर्वी आलें होतें. मला मन्या संस्थानच्या हद्दीतील सोमगांवीं गेल्याचें कळलें. मी पण तुलाही न भेटतां तडक तिकडे गेलें. अगदीं सकाळीं मी तेथें पोहोंचलें. दारूच्या व्यसनामुळें त्याचा तपास गुत्त्यांत लागावयाचा, म्हणून मी तेथल्या गुत्त्यांत तपास करण्यास गेलें. पण तेथें संस्थानी पोलिस मन्याच्याच तपासास आले होते! तेव्हां माझी कंबरच खचली मुळीं!—"

"मग मन्याचा पत्ता त्यांना लागला का? सावळ्याही त्याच्याबरोबरच असेल कीं!—"

रगी माहिती काढण्याच्या दृष्टीनें घाबरेपणानें बोलली.

"सावळ्या त्यांच्याबरोबर असतो, हें खरं. पण तो कांहीं मन्यासारखा दारू पीत नाहीं! म्हणून तो सांपडायचा नाहीं!—"

सखीनें निश्चयपूर्वक सांगितलें.

"मग, मन्या सांपडेल म्हणतेस? लुच्चा आहे तो! तो कसचा सांपडतो! कोणाच्याही हातावर तुरी देऊन तेव्हांच निघून जाईल! रखमा मामींना ठाऊक आहेत त्याचे गुण—"

रंगीही निश्चितपणें म्हणाली.

"पण तो दारूच्या निशेंत नसेल तर? सोमगांवीं तो सांपडण्याच्या बेतांत होता, रंगे!—"

सखी काळजीच्या स्वरांत बोलली.

"तें कसं काय बाई!—" रंगीनें उत्सुकतेनें विचारलें.

त्यानंतर सखीनें तिला सविस्तर हकीकत सांगितली. ती म्हणाली—

" रात्रीं गुत्त्यांत त्यानं दारू ढोसली. ती फारच ढोसली ! गुत्तेवाल्याच्या अंगावर त्यानं दहा रुपयाच्या नोटीबरोबर आणखी एक पांचशें रुपयांची नोट फेंकली ! "

मन्याच्या टोळीला पकडण्याकरिता संस्थाननेंही बक्षिस लावलं होतें. पांचशें रुपयांच्या नोटीनें मन्या हा एक दगेखोरांपैकी असेल, असा त्या गुत्तेवाल्यास संशय आला. तो सरळ संस्थानच्या पोलिसाकडे गेला आणि त्यानें त्यांना ही बातमी दिली.

पण त्याच्यापूर्वीच मन्या कोठें तरी निघून गेला होता म्हणून तो सांपडला नाहीं. अस्तुरी आणि दारू ह्यामुळेच आमचे रामोशी सांपडतात रंगू !

तूं देखील सावळ्याला आपल्याकडे फारसा येऊं देऊं नकोस, नाहीं तर, तोही सांपडेल. इथं पोलिस त्याकरितांच टपून बसले आहेत."

सखीची माहिती संपली. दोघीही थोडा वेळ स्तब्ध होत्या; त्या वेळीं रंगी मनांत म्हणू लागली---

" आपल्यामुळें सावळ्या पकडला जाण्याचा संभव आहे, हें सखीचं म्हणणं खरं आहे. कुठं कां असेना, सावळ्या खुशाल असला म्हणजे झालें ! "

नंतर सावळ्याची आणखी माहिती समजावी म्हणून तिनें सखीला विचारलें---

" आतां सावळ्या, तुझा मन्या हे गेले आहेत तरी कोठें ? तुला कांहीं माहिती आहे का ?'

सखी हंसत हंसत म्हणाली---

" मला ग कसं कळणार ? आम्हांला माहिती समजली, तर ती गांवभर होण्याला वेळ लागत नाहीं. म्हणून मन्या तर मला चकार शब्द सांगत नाहीं ! मी पण त्याची पर्वा करीत नाही. त्यानं दारू सोडली, कीं त्याच्यासारखा माणूस नाहीं रंगू ! "

सखीचें नवऱ्यावरील प्रेम किती वरच्या दर्जाचें आहे, हें रंगीला कळून आलें. तिलाही धडा घेण्यासारखें त्यांत होतेंच. फक्त काळजी राहूं नये, म्हणून तिनें सखीला आणखी विचारलेंच.---

"पण आता मन्यानं काय ठरविलं आहे ? तुला कळलं असेल तें सांग की ग ! तुझ्या गळ्याशपथ मी कोणाशी बोलणार नाही तें––"

"रगे, तें मी तुला सांगतेच, म्हणजे तुझी काळजी पण कमी होईल––"

"सांग बाई, सांग लवकर––"

रंगी उतावीळपणानें म्हणाली

सखी सांगू लागली––

"मन्या भुजंगरावांजवळ होता, तेव्हां त्याला गुप्त बातमी कळत होती. ती तो आपल्या लोकांस कळवीत असे ! त्यामुळें सारे लोक तेव्हांच सावध होत असत ! आतां पोलिस त्याला पकडणार आहेत. चोहोंकडे कडेकोट बंदोबस्त फार आहे. म्हणून त्यांनी आतां लहान लहान टोळ्या केल्या आणि ते लोक फार दूर दूर गेले आहेत ! ..."

"आणि रगे आणखी सांगूंच का, सांगते बघ.––" सखी पुढे बोलूं लागली––

"मन्या, खाशा आणि सावळ्या ह्यांची एक टोळी फार दूर कोठेतरी गेली आहे ! ती सांपडावयाची नाही मुळीं ! तुला त्याची काळजीच नको."

# दोन नवरे

# १३

सखूवीचें माहेर आंबेगांवी असल्यामुळे तिला मावळ्या आणि रंगी ह्यांची लहानपणापासून माहिती होती. मावळ्याविषयीं तिला कमालीचा आदर वाटे; आणि रंगी तर साऱ्यांचीच आवडती होती. ह्या उभयतांवर कसलेंही संकट येऊं नये, असें तिला वाटे. म्हणूनच ती रंगीला गढीमध्यें भेटली.

परत जातांना सहाजिकच तिनें गौराबाईची विचारपूस केली. त्याही सखीशी अगदीं मनमोकळेपणानें बोलल्या––

"रंगीच्या प्रकृतीकरिता आपण पानगांवी आलों, हा आपला शाहाणपणा झाला. रंगीची प्रकृति चांगली सुधारत आहे. पावसाळा सुरू झाला कीं, आपण परत आंबेगावास जाऊं."

त्यांचें सारें लक्ष आंबेगांवीं आपल्या घराकडे लागलें होतें! त्या मनांत म्हणत होत्या––

"रखमा यजमानांना कांहीं कमी पडूं देणार नाही, हें खरें, पण आपल्या-पेक्षां यजमानांचें लक्ष तिच्यावर जास्त आहे. रखमा तशी खंबीर मनाची आहे. पण त्याचा काय नियम सांगावा, कोणाचें मन केव्हां कसें बदलेल तें!"

पण असें कांहीं उघड दिसूं न देतां त्यांनी सखीजवळ रखमाला सांगण्या-करितां पुढील निरोप सांगितला––

"गड्याला दोन वाट्या दिल्या आहेत, त्या मागून घ्या, भिंतीवर लावलेल्या गोवऱ्या घरांत रचून ठेवण्यास गड्याला लावा. तांकावर निघ-णाऱ्या लोण्याचें तूप करून मगनशेठकडे पाठवा. आणि येतील ते पैसे खिडकींत डबी आहे तिच्यांत ठेवा...."

सखीला आणि रंगीला देखील ह्या निरोपाचें मनांत हंसूं आलें !

आंबेगांवला आल्याबरोबर सखीनें पानगांवची सारी हकीकत रखमाला सांगितली. तिलाही थोडें बरें वाटलें.

रगी पानगांवला गेल्यापासून रखमाला करमत नसे. पण कामाच्या रगाड्यांतून तिला मुळी उसतच मिळत नसे. घरची आणि शेतचीं कामें करतां करतां तिच्या नाकीं नऊ येत. ती खंबीर मनाची आणि बळकट शरिराची बायको असल्यामुळें सर्व कामें जिवापाड श्रम घेऊन चोख उरकी !

पावसाळा सुरू झाला, तरी रंगी येण्याचें चिन्ह दिसेना.

शेताच्या पेरणीचीं कामें सुरू झालीं. सदोबा निरलसपणें शेतकाम करण्यांत पटाईत असत. रखमाही त्यांच्या तोडीस तोडच होती !

आबा मधून मधून परगांवीं जाऊन येत. परंतु अलीकडे ते घरांतच बरेच रेंगाळूं लागले होते. आपली प्रकृतिच बरोबर नाही, अशी त्यांची कुरकूर होती !

रगीला आणि गौराबाईना लवकर घरीं आणा, अशी रखमानें आबांच्या मागें किती तरी निकड लावली, पण तेथें पोरीची प्रकृति सुधारत आहे; नाहीं तर पोरीचें दुखणें क्षयावर गेलें असतें; भुजंगरावांनीं उत्तम डॉक्टरांचें औषध सुरू केलें आहे; असें ते नेहमीं रखमाला सांगत असत !

काय असेल तें असो, आबांचीं ही कामें करण्यांत रखमीला आनंद वाटत असे, हें खरें ! त्यांच्या घाऱ्या डोळ्याची दृष्टि तिच्याकडे गेली कीं, दोघेंही तोंडांतल्या तोंडांत हंसत.

त्यांच्या अंतःकरणांतील जुन्या सुप्त भावना जागृत होत असाव्या कीं काय, असें त्यामुळें वाटे !

आणि खरोखर आबांचें जुनें प्रेम जागृत होऊं लागल्याचीं चिन्हें पण दिसूं लागलीं होतीं !

रखमाच्या मनांत मात्र नवीन असा फरक नव्हता. सध्यां तिची जी मनःस्थिति होती, ती नेहमींचीच होती.

पण आबांच्या मनांत कांहीं तरी त्याच्यापुढचें नवें वारें खेळत आहे, हें रखमाच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं.

योग्य समय आल्याशिवाय आपणहून कांहीं करावयाचें नाहीं, असें तिनें आपल्या मनाशीं ठरविलें.

दुष्ट लोक तिच्या संबंधानें कुजबुजूंही लागले होते !

❀ ❀ ❀

तो श्रावण मासांतील नागपंचमीचा दिवस होता. तो मुख्यतः स्त्रियांचा सण असल्यामुळें रखमानें नीटनेटका पोशाक केला होता. त्यामुळें तिचें तारुण्य खुललें होतें.

त्या दिवशीं दिवसभर रखमाकडे आबा सारखे निरखून पाहात होते. तिला पण आजचें आबांचें चिन्ह ठीक दिसत नव्हतें. सदोबा मळ्यांत होते. आबांना रात्रीचें जेवण लवकर वाढून ती आपल्या घरीं झोंपण्यास जाणार होती. पण आबांनीं कांहीं ना कांहीं कारणानें जेवणास येण्यास उशीरच लावला !

जेवण चाललें असतां आबा रखमाकडे टक लावून पाहात होतेच. त्यांच्या डोळ्यांत त्या वेळीं मादकता भरली होती ! रखमाही वात्रटपणा करण्याच्या हेतूनें मुद्दामच हंसली !

त्यामुळें आबांना जोर चढला व ते म्हणाले,

"पांडवांची गोष्ट तुला माहीत आहे का ग, रखमा ?—"

"हो तर ! मला सारं माहीत आहे !" रखमानें मान वेळावून उत्तर दिलें.

"द्रौपदीला किती नवरे होते, सांग कीं !—"

आबांनीं तिच्याकडे तिरपी नजर लावून तिला विचारलें.

"पांच पांडव होते—"

तिनें सहजपणें म्हटलें. त्यानंतर आबा जरा घुटमळले. ते खालीं पाहून जेवूं लागले.

त्या रात्रीं पावसाची झिमझिम एकसारखी चालू होती. हवा पण कुंद होती. रानांत व रस्त्यांत फारच चिखल झाला होता. काम लवकर आटोपून रखमाला आपलें घर गांठावयाचें होतें.

थोड्या वेळानें आबांनीं वर मान केली व ते हंसले. आपल्या घाऱ्या डोळ्यांची टक त्यांनीं एकसारखी तिच्याकडे लाविली.

रखमाला आतां कांही तरी बोलून आबांना धडा द्यावा असें वाटले. ती म्हणाली--

"आज तुमच्या डोक्यांत काय आलं आहे, समजत नाही मला ! काहीं वेडेचार तर नाहीत ना ? --"

"तस काहीं नाहीं ! तसं कांही नाही ! मी म्हणणार होतों द्रौपदीला पांच नवरे होते, मग एकादीला दुसरा नवरा असला तर काय होईल ? --"

आबाच्या बोलण्याचा अर्थ उघड उघड होता. त्यांच्या मनांत असलें पाप आलें. त्यामुळे तिच्या अंगाचा तिळपापड होऊन गेला ! तिची वृत्ति बेफाट होती ! तिचा संताप तिला आवरत नसे ! त्यांच्या पापी वृत्तीचा तिला अत्यंत तिटकारा आला. ह्या गृहस्थाला असल्या दुष्ट विचाराबद्दल चागलेंच प्रायश्चित्त द्यावे, असे तिनें मनाशी ठरविलें.

आबा हात धुण्यास मोरीवर चालले. त्या वेळी तिनें चुलीतलें जळतें लांकूड बाहेर ओढलें. आबा हात धूत होते, इतक्यांत ती जलदीनें तें लांकूड घेऊन त्यांच्या मागें गेली !

तिनें त्या जळत्या लांकडाचा घाव आबांच्या डोक्यांत एकदम हाणला ! आबांच्या डोक्याला खोक पडली. ते तिरीमिरी येऊन खाली पडले ! तशाही स्थितीत रखमा म्हणाली--

"दोन नवरे ! हा बघ तिचा तडाखा ! जन्माची अद्दल घडवीन मी ! मला कोण समजलास ? लग्न एकदांच होत असतं, समजलं ?--"

ती तोंडानें सारखी गरजत होती. आणि बेफाट बडबड करीतच ती घरीं चालली !

गडीमाणसांनी रंग ओळखला आणि ते सारेजण स्वयंपाक घराकडे धांवत गेले.

इकडे तोंपर्यंत रखमानें घर गांठलें देखील !

  

रखमाला त्या रात्रीं कसली झोंप लागते ? झालेल्या गोष्टीचें भ्रमण पाहाटेपर्यंत एकसारखें तिच्या डोक्यांत चाललें होतें. पाहाटेस किंचित तिचा डोळा लागला.

थोडी झोंप लागते, तोंच तिला एक अतिशय वाईट स्वप्न पडलें--

"रंगी असहाय स्थितीत रडत आहे, 'रखमा मामी, मामी', असा ती टाहो फोडीत आहे, इतक्यांत रंगीच्या डोक्यांत कोणी तरी धोंडा घातला—"

स्वप्नांतील त्या धोंडयाच्या आवाजानें रखमा खाडकन जागी झाली आणि रडूं लागली. स्वप्नांतील तो सारा प्रकार तिला खराच वाटला!

पण थोडया वेळानें ती भानावर आली. तरीही रंगीला कांही वेडावाकडा त्रास होत असावा असेंच तिला वाटूं लागलें.

आणखी कांही वेळ गेला नाही, तोंच तिला दरवाजावर "रखमा मामी! रखमा मामी!" अशा कोणी तरी हाका मारीत असल्याचें ऐकूं आलें. तिला ही हाक कोणाची आहे हें प्रथम लक्षांत आलें नाही.

ती झटकन उठली. तिनें दरवाजा उघडला. बाहेर पाहिलें तों, सखी तिच्या पुढें उभी!

त्या वेळीं चक्क उजाडलें होतें, त्यामुळें सखीचा उदासवाणा भकास चेहरा एकदम रखमाच्या नजरेस आला.

गेला महिना दीड महिना सखी पानगावला गेली नव्हती. ती मन्याचा तपास दुसरीकडेच करीत होती. पण तिला मन्याची बातमी मुळीसुद्धां कळली नव्हती!

अलीकडे पोलिस दरोडेखोरांचा बंदोबस्त कडक उपाय योजून करीत होते. कित्येक वेळां त्यांना ह्या दरोडेखोरांवर गोळीबारही करावा लागला होता! तशा गोळीबारांत मन्या सांपडला, असेंही कोणी कोणी म्हणत होते! पानगावच्या रामोशी मंडळीकडून कांहींना कांही खरी हकीकत समजल्याशिवाय राहाणार नाही, असें वाटून सखी दोन तीन दिवसांपूर्वी पानगांवला गेली होती. तेथें तिला मन्या, सावळ्या ह्यांपैकीं कोणी गोळीबारांत सांपडले नाहींत, अशी पक्की माहिती मिळाली. त्यामुळें तिची काळजी जरा कमी झाली.

नंतर ती गढीत रंगी आणि गौराबाई ह्यांना भेटण्यास गेली. ती मन्याची बायको सर्वांच्या माहितीची असल्यामुळें तिला गढींत मज्जाव झाला नाही.

तेथें तिला रंगीसंबंधीं समजलेली अत्यंत करुणाजनक हकीकत सांगण्या-करितांच सखी रखमाकडे घाईघाईनें त्या वेळीं आली होती.

रखमाला पाहातांच सखीला बोलवेना. ती फक्त रडूं लागली !

"अग, बोल कीं काय ते ! अशी रडूं नकोस—"

रखमा सहानुभूतीच्या स्वरांत बोलली.

"काय सांगू तुम्हांला मामी—"

सखीला हुंदका आला.

रखमाला वाटलें, हिलाही कोणी तरी दुष्ट पुरुषानें त्रास दिला असेल, ह्यामुळें हिला वाईट वाटत असावें. म्हणून ती कठोर स्वरांत म्हणाली—

"सांग, सखे ! पुरुषजातच मेली दुष्ट ! पण आपण आपलंपण सोडतां कामा नये—"

"तसंच हो मामी—"

सखीला पुढें बोलवेना. तिच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु वाहात होते.

दोघी घरांत गेल्या. थोड्या वेळानें रगीविषयीं कळलेली सारी हकीकत सखीनें रखमाला सांगितली.

ती हकीकत ऐकून रखमाची कंबरच खचली. ती एकसारखी रडूं लागली !

पण थोड्या वेळांत ती धीरानें उठली ; आणि सखीबरोबर पानगांवला जाण्याच्या तयारीस लागली.

पानगांव केव्हां गांठीन असें तिला होऊन गेलें.

आबांचा दुष्टपणा तिला आता कळसास पोहोचलेला दिसत होता. अशा दुष्टाकडे लहानपणी आपण प्रेमानें पाहात होतो, ह्याचीच तिला आतां अत्यंत लाज वाटूं लागली !

तिसऱ्या प्रहराच्या सुमारास त्या दोघी पानगांवला जाऊन पोहोंचल्या. पावसाची बुरबूर चालूच होती.

गढीकडे जावयाच्या वाटेंत मांड्याइतकें गवत वाढलें होतें. गढीच्या सभोंवतीं पाण्याचीं डबकीं सांचलीं होतीं. गढीच्या आंतील बाजूच्या बागेंत तण माजलें होतें. गढीजवळून वाहात जाणाऱ्या नागमोडी नदीचा प्रवाह एका खडकावर आपटून उत्पन्न होणाऱ्या आवाजाचा भेसूर प्रतिध्वनि गढींत ऐकूं येत होता !

एका बाजूच्या खोलीत रंगीच्या उशालगत गौराबाई सचिंत बसल्या होत्या.

रखमाला पाहातांच गौराबाईनीं ओक्साबोक्शीं रडण्यास सुरुवात केली!

भुजंगरावांनीं गढीच्या बंदोबस्ताकरितां ठेवलेलीं माणसें लागलींच तेथें गोळा झालीं. गौराबाईनीं शाहाणपणानें आपलें दुःख दाबलें!

रखमाला तर रंगीची स्थिति पाहून झीटच आली! सखी गडी-माणसांच्या पुरी माहितीची होती. त्यामुळें ती आपापल्या कामाला निघून गेली.

रंगीला बोलवत नव्हतें. तिनें फक्त आपल्या कपाळास हात लावला. ती मुळूमुळू रडूं लागली. पण तिला इतका अशक्तपणा आला होता कीं, तिच्या डोळ्यांना देखील आतां पाणीच येईना!

गौराबाईनीं घडलेली ती भयंकर हकीकत रखमाला सांगण्यास सुरुवात केली, त्या म्हणाल्या--

"रंगीला ह्या ठिकाणी प्रथम चांगलं बरं वाटलं. मधून मधून इकडे रंगीच्या औषधपाण्याचा तपास करण्याकरितां भुजंगरावही येत. ते मजे-मजेनें गप्पागोष्टीही करीत! मेल्याच्या मनांत काय होतं, तें शेवटपर्यंत त्यानं आम्हांला कळूं दिलं नाहीं!--"

"ज्येष्ठ संपतां संपतां एक दिवस पांचसहा माणसं पुष्कळ सामान-सुमान घेऊन इथं आलीं. रंगीला बरं वाटलं, म्हणून सत्यनारायण करायचा आहे, असं त्यांनीं सांगितलं! सत्यनारायण रंगीनेंच करायचा आहे, म्हणून तयार राहाण्यास तिच्या चुलत्यानं तिला बजावलं!--"

आबांचें नांव निघाल्याबरोबर रखमाच्या कपाळास आठ्या पडल्या. तिचा चेहरा लाल झाला. पण ती कांहीं बोलली नाहीं. फक्त दांतओंठ खाऊं लागली.

गौराबाईनीं रखमाकडे पाहिलें. आपल्या यजमानांचें नांव निघाल्या-बरोबर तिच्या कपाळास आठ्या पडल्याचें पाहून त्यांना एकपरी बरेंच वाटलें. नंतर त्या पुढील हकीकत सांगूं लागल्या

"वाजंत्री पण आले! मेला गुंडभट आला! त्यानं आपल्याबरोबर दुसरा एक धोंडभट आणला होता! रंगीला सत्यनारायणाकरितां पाटावर

बसविलं ! रंगीच्या मागंपुढं पाहाग बसला ! तिच्या दंडाला कोणीसं धरलं आणि तिचं लग्न भुजगरावबारोबर लावलं की ग रखमा ! "

"रंगी ओरडू लागली. पण तिचं तोंडच कोणीसं दाबलं ! होम झाला, लग्न झटपट उरकलं ! माणस जिकडच्या तिकड निघून देखील गेली ! "

"मला पण दोन रट्ट मिळालं. मग मी काय करणार ? त्यांच्या हातास हात मला पण लावावा लागलाच ! —"

"त्यांचा आणि भुजंगरावांचा हा दुष्ट कावा मला थोडा तरी अगोदर कळता तर मी रंगीला घेऊन इथं आलेंच नसते मुळी ! सारा वाईटपणा माझ्यावर आला की ग रखमा ! —"

गौराबाईना हुंदका आला. तशाही स्थितीत त्या पुढं बोलू लागल्या.

"जरा सुटका झाल्याबरोबर रंगीन आपलं डोकं दगडावर आपटून घेतलं ! —"

"तिचा प्राणच जायचा. पण कशी तरी वांचली ! तेव्हापासून आंथरूण धरूनच आहे ही ..."

"तिला ध्यानी मनी मावळ्याशिवाय कांही दिसत नाही. तिच्या पोटांत अन्न जात नाही. मावळ्याकरितां कुडीत प्राण ठेवून आहे ही ! तो भेटला की, मी मरेन म्हणते ही !"

"मला पण इथ डांबून ठेविली आहे त्यांनी. कुठ्ठ कुठ्ठ हालता येत नाही मला !"

"गुडभटाकडून कुणाला काही सांगायचं नाही, म्हणून शपथ घ्यायला लावली आहे त्यांनी ! तेही पण आंबेगांवला एकदां गेलेत, ते पुन्हा इकडे येतच नाहीत !"

"रंगीच्या डोळ्यांबरोबर माझे डोळे मिटावे, असंच मी देवाजवळ मागणं मागतें रखमा ! —"

ह्या वेळी रंगी, रखमा आणि गौराबाई ह्या तिघीच्या अंतःकरणात होत असलेली कालवाकालव लेखणीनें येथे कशी लिहितां येणार ?

## रामलिंगाच्या डोंगरांत

## १४

ज्याचा ध्यास रंगीला इतका लागला होता, तो सावळ्या कोठे आहे, हें आंबेगाव किंवा पानगाव ह्या बाजूच्या लोकांना कळणे शक्य नव्हतें, इतका तो दूरच्या ठिकाणी होता. मन्या, खाशा आणि सावळ्या ह्यांची ती छोटी टोळी बार्शी जवळच्या रामलिंग डोंगरांत लपून छपून होती !

रामलिंगचा डोंगराळ भाग मोंगलाई आणि आंग्लाई यांच्या सरहद्दीवर असल्यामुळे मन्याने आपल्या धंद्याला तें ठिकाण पसंत केलें होतें. शिवाय तें ठिकाणही पवित्र आणि रमणीय असल्यामुळें तेथें राहाणाऱ्या माणसांना शांतपणें विचार करितां येत असे.

त्या वर्षी त्या भागांत पाऊस चांगला पडला होता. तो श्रावण महिना चालू होता. त्या वेळी रामलिंगाजवळ निरनिराळ्या बाजूंनी आलेले स्वच्छ पाण्याचे जलप्रवाह झुळूझुळू वाहात होते.

सभोंवतालच्या टेकड्यांनीं आणि दऱ्याखोऱ्यांनी हिरव्या गार शाली अंगावर घेतलेल्या होत्या. त्या शालींत मधून मधून पिवळी, तांबडी आणि पांढरी वेलबुट्टी काढल्याचा भास संकेश्वर, चाफा आणि इतर रानवेली यांच्या फुलांच्या भरगच्च बहारामुळे होत होता.

त्या वेळीं त्या ठिकाणची हवा पण सुंदर होती. त्यामुळे जवळपासच्या गांवच्या लोकांचें तें फिरावयास येण्याचें ठिकाण झालें होतें. तेथ सोमवारी येणाऱ्या यात्रेकरूंमुळें तर त्या दिवशीं त्या ठिकाणास जिवंतपणाच प्राप्त होत असे.

साधु, बैरागी किंवा एकदोन पुजारी ह्यांखेरीज तेथें रात्रीं कोणीं राहात नसत. बैराग्यांकरितां रामलिंगाच्या जवळपासच्या बाजूस झोंपडीवजा लहान लहान धर्मशाळा श्रद्धाळू लोकांनी बांधून ठेवल्या होत्या.

अशाच एका मोठ्या झोंपडीची दुरुस्ती करून तेथे मन्याच्या टोळीनें आपलें आसन ठोकलें होतें.

अंगांत पिवळी कफनी परिधान करून, कपाळास यथेच्छ भस्म फासून, खांद्यावर झोळी आणि हातांत चिमटा घेऊन, हे त्रिवर्ग भिक्षेच्या मिषानें दिवसभर हिंडत. त्या वेळी ठिकठिकाणी पाळत ठेवीत. आणि रात्री कोणा तरी श्रीमंताच्या घरावर वेष बदलून धाड घालीत ! हाती लागलेल्या संपत्ती-पैकीं पुष्कळशी गोरगरिबांना वांटून टाकीत ! त्यांतील जरूरीपुरते पैसे ते आपल्याकरितां ठेवीत !

त्यांनी आपल्याजवळ खर्चाकरितां राखून ठेविलेले पुष्कळसे पैसे मद्याच्या खरेदीकरितांच खर्च होत !

त्या तिघांत मन्याचें मद्याचें व्यसन पराकोटीला गेलें होतें. खाशानें नुकताच त्याचा गुरूपदेश घेतला होता. सावळ्या मात्र पूर्ण मद्यद्वेषी होता.

दिवसेंदिवस सावळ्याला असल्या ब्रंडखोरीचा तिटकारा वाटूं लागला. अशा कृत्यांत धाडस असलें, तरी त्याचा शेवट बरा होणार नाहीं; महायुद्धाच्या धामधुमींत प्रथम प्रथम आपला हात चालत असला, तरी पुढें सरकार आपला पिच्छा पुरविल्याशिवाय राहाणार नाही; अशी त्याची पक्की समजूत झाली. त्यामुळे त्याची वृत्ति उदासवाणी बनूं लागली.

मन्या आणि खाशा यांनीं पुढे काय होईल, याचा विशेषसा विचारच केला नव्हता. त्यांना चाललेले दिवस ठीक चालले आहेत, असेंच वाटत होतें !

श्रावण महिन्यांतील अमावास्येच्या रात्रीं एका दूरच्या झोंपडींत मन्या आणि खाशा रात्रींचे धुमी पेटवून बसले होते. त्या बाजूस वाघाची भीति असल्यामुळें दुसरे कोणी बैरागी तिकडे रात्रीं राहात नसत ! मन्यानें चिल-मीचा मोठा झुरका मारून ती चिलीम खाशाच्या हातीं दिली आणि तो झोळींतील दारूच्या बाटल्या काढून आणण्यास गेला.

बाहेर काळाकुट्ट अंधार पडला होता. फक्त वन्य श्वापदें भक्ष्याच्या शोधार्थ हिंडत होतीं. वेलीदेखील भीतीमुळें वृक्षांना घट्ट चिकटून राहिल्या

होत्या. अशा स्थितींत निर्भयपणें त्या ठिकाणापासून कांहीं अंतरावर सावळ्या मृगचर्म आंथरून त्यावर सचिंत बसला होता !

त्याला पुष्कळ दिवसांत आंबेगांवाकडील बातमी कळली नव्हती. रंगीकडे गेल्यास आपल्या पायांत कैदेचा खोडा पडल्याशिवाय राहाणार नाहीं, ह्याची त्याला खात्री होती. मन्याच्या नादानें कुठून ह्या फंदांत पडलों, असें त्याला होऊन गेलें होतें. आतां ह्यापुढे काय करावें, कसें वागावें, याचा निर्णय त्याला कांहींच करतां येत नव्हता !

सावळ्या त्या झोंपडीत बराच वेळ नसल्यामुळें मन्यानें त्याला हाका मारण्यास सुरुवात केली. खाशानें बाहेर जाऊन त्याला शोधून काढलें. त्याला ओढीत ओढीत झोंपडीत आणले. सावळ्या अगदीं रडकुंडीस येऊन गेला होता. दारूची बाटली सावळ्याच्या पुढे करून मन्या म्हणाला,

" सावळ्या लेका, जरा ह्यांतला अमृताचा घुटका घे ! सारी काळजी दूर होईल. उगीच कां कष्टी होतोस ?—"

" मन्या, तुझ्या सगतीला लागलों, चुकलों मी ! " सावळ्या बोलूं लागला, " घरादाराला पारखा झालों आणि अरण्यांत येऊन पडलों. केव्हां काय होईल, ह्याचा नेम नाहीं. कसलं आयुष्य हें !—"

" सावळ्या, ह्यांतच शूरपणा आहे आपला " मन्या उत्तर देऊं लागला, " ह्यापेक्षां शौर्य दाखविण्याची संधि मिळते कुठें आपल्याला ? श्रीमंत लोक कसे चळचळ कांपतात आपल्यापुढं ! खंडणी द्या, म्हटलं कीं खुशीनं देतात ते ! आपण काय, तो पैसा भुकेलेल्या कंगाल लोकांनाच वांटतो. ह्यांत खरा परोपकार होतो. आमचे बापजादे असें करीत नसत. मुद्देमाल आपल्याजवळ ठेवीत; म्हणून ते गुन्ह्यांत सांपडत. आपलं तसं नाहीं ! ..."

" अरे, हें खरं, पण आपल्याला पैशाचा उपयोग नाहींच. आपण जर पैसा सांठवला, तर त्याचा उपयोग मुलांबाळांना तरी नाहीं का होणार ?"

मध्येंच खाशा बोलला.

" मुलाबाळांची काळजी कोणाला ? चालला दिवस तो ठीक ! आपल्याला पकडण्याकरितां आलेल्यांच्या हातांवर तुरी देण्यांत खरी मौज वाटते, मला तर खाशा !—"

मन्या हंसत हंसत म्हणाला. आणि त्यानें बाटली फोडली.

मन्याने पेला भरून खाशाला दिला आणि दुसरा पेला तो आपल्या तोंडास लावणार, इतक्यांत सावळ्याने त्या दोघांच्या पेल्यांवर सोटे मारले !

पेल्यांचे तुकडे तुकडे झाले ! दोघेजण सावळ्याकडे आश्चर्यानें पाहूं लागले ! त्यांना सावळ्या बोलला—

" लेकांनो, किती सांगतों तुम्हांला, दारू पिऊं नका म्हणून ! दारू आणि बायका ह्याच तुमच्या ह्या धंद्याचा घात करतील ! ..."

" सावळ्या, मी तर बायकोच्या देखील नादी नाहीं ! " मन्या म्हणाला, " मखीनं मला सोडलं आहे. तूंही लेका दारू पी, म्हणजे रंगी तुला सोडील ! मग बायकांची तर कटकट नाही ! दारू काय, आपल्याला केव्हांही सोडतां येईल ! "

मन्यानें सबधच्या सबंध दारूची बाटली तोंडाला लाविली, ती हिसकावून घेऊन दूर फेकीत, सावळ्या म्हणाला—

" मन्या, दारू सोडशील, तर मी तुमच्यांत राहीन. नाहींतर कुठंही जाईन ! —"

" पण आतां जाणार कुठं ? कुठंही गेलास, तरी तुझ्या मागं पोलिस हात धुवून लागलंय ! मग जाणार कुठं, भागानगराला ?" मन्या म्हणाला.

" हो ! हो ! कुठंही जाईन मी ! कामधंदा करीन, पोटाला मिळवीन. मला असला धंदा नको ! असला पैसा नको ! तूंही नकोस आणि तुझी दारू तर नकोच नको ! ..." सावळ्या म्हणाला.

" बघ खाशा, " मन्या म्हणाला, " वेडपटासारखा कसा बरळतोय सावळ्या ! —"

" अरे असलं कांहीं कळत नाही मला ! " खाशा मनापासून बोलूं लागला, " आपला देश स्वतंत्र करावा; सावळ्यांसारखा आपण पराक्रम गाजवावा; म्हणून मी तर ह्या धंद्यांत पडलों. तें राहिलं दूर ! साधे पोलिसच आपल्याला पिळीत चालले आहेत कीं ! —"

" अरे, अशानें का देश स्वतंत्र होतो ? वेडे कुठले ? " सावळ्या म्हणाला.

" हें सगळं खरं पण सावळ्या, आज मला दारू पिऊं दे ! सडकून पिऊं दे ! मग उद्यांपासून सोडीन मी ! ..."

मन्या काकुळतीस येऊन बोलला.

"दारू पाहिजे तर खुशाल पी! पण मी मात्र तुमच्या संगतीत राहाणार नाही--"

सावळ्या निश्चयपूर्वक बोलला.

"जा! जा! वाटेल तिकडे जा! रंगीकडे जा, पाहिजे तर! लेका, आज तरी मी दारू पिणारच! खाशा, काढ दुसरी बाटली! --"

मन्या अगदी घायकुतीस येऊन बोलला.

ह्या मंडळीशी हुजत घालण्यात अर्थ नाहीं, असें सावळ्यास वाटलें. तो एका कोपऱ्यांत डोळे मिटून स्वस्थ पडला.

त्याच्या डोळ्यांपुढे गतस्थितीची चित्रे येऊं लागलीं. गळ्यात माळ घालीत असलेल्या रंगीचें चित्र प्रथम त्याच्या डोळ्यांपुढें आलें. आपण शीळ घातल्याबरोबर रंगी आपल्याकडे धांवत कशी येई, हें दुसरें चित्र डोळ्यांपुढें तर एकसारखें नाचू लागलें. त्यात तो कांही वेळ रंगून गेला.

जवळच मन्या आणि खाशा यांचा गोंधळ चालला होता. त्यामुळें मध्येच त्यांचीच चित्रे त्याच्या डोळ्यांपुढे उभी राहिली.

शेवटीं, त्याच्या मनापुढें भुजंगराव आले. ह्याच इसमाच्या कारस्थाना-मुळें आपल्यास पकडण्याकरितां पोलिसांनी वारंट आणलें. तें चुकविण्याकरितां प्रथम आपण मन्याच्या टोळीत शिरलों, त्यांत सामील झालों, आणि अनेक मोठमोठे गुन्हे केले. इत्यादि साऱ्या गोष्टी त्याच्या डोळ्यांपुढे नाचूं लागल्या. आतां रंगीला तोंड दाखविण्यासही आपल्याला खुला मार्ग नाहीं. तेव्हां काय करावें, हें त्याला सुचेना. त्यामुळें त्याच्या जिवाची एकसारखी तगमग होऊं लागली!

मन्या आणि खाशा यांची बडबड तर आतां कळसास पोहोंचली होती. त्यामुळें ह्यांना सोडून जावें, मग काय होईल तें होईल, असा त्याच्या मनाचा पक्का निश्चय झाला.

थोड्या वेळानें त्याचा डोळा लागला.

सावळ्या भल्या पहाटेस जागा झाला. त्यानें आपलें सामानसुमान आवरण्यास सुरुवात केली. त्यानें पोलिसांचा गणवेष धारण केला. चोरी करून

मिळविलेलीं दोन पिस्तुलें खिशांत घातलीं. गुप्त जागीं ठेवलेली बरीचशी रोकडही त्यानें आपल्या बरोबर घेतली.

रामलिंगाचें दर्शन घेऊन वाट फुटेल तिकड तो चालू लागला !

त्या रात्री मन्या आणि खाशा यांनीं बेसुमार दारू झोकली होती ! त्यांची बडबड रात्रभर चालली होती ! ठिकठिकाणीं घातलेल्या दरवडयाच्या गोष्टीही त्यांच्या तोंडून बाहेर पडत होत्या !

ही त्यांची मोठयानें चाललेली बडबड रामलिंगच्या पुजाऱ्याच्या कानीं गेली. त्यांच्याजवळ येऊन त्यानें ती चांगली ऐकली. बक्षिसाच्या आशेनें रात्रींच तो पोलिस ठाण्यावर वर्दी देण्यास गेला !

उजाडण्याच्या सुमारास थंडगार वाऱ्याच्या झुळकीनें मन्याचें डोकें शांत झालें. तो जागा झाला. सावळ्या पळून गेल्याचें त्याच्या लक्षांत आलें. त्यानें लष्करी वेष चढविला. खाशाला तो उठवूं लागला.

चक्क उजाडण्याच्या सुमारास बरेच पोलिस दबत दबत धर्मशाळेकडे येऊं लागले. मन्याच्या तीक्ष्ण नजरेंत ती गोष्ट आली. तो खाशास एकसारखा इशारा देत होता. झटकन पोलिसांनी धर्मशाळेवर छापा घातला !

मन्या चटकन निसटला. बंदुकीच्या फैरी झाडीत झाडीत तो दऱ्याखोऱ्यांत अदृश्य झाला !

खाशा पोलिसांच्या हातीं लागला !

पोलिसांनी धर्मशाळेची झडती घेतली. झोळींतील दारूच्या बाटल्यांखेरीज दुसरा महत्त्वाचा मुद्देमाल त्यांना सांपडला नाहीं !

## सूड घेतला !

## १५

रंगी बेसुमार आजारी असल्यामुळें गढींतील लोकच काय, पण भुजंगराव देखील अतिशय त्रासून गेले होते !

तिच्या आततातईपणाच्या वर्तनानें भुजंगरावांच्या आशेच्या चिंधड्या चिंधड्या उडून गेल्या होत्या ! तिची कशीही आणि कोणत्याही प्रकारें शुश्रूषा केली, तरी तिची प्रकृति सुधारणार नाहीं, आणि तिचें मन तर मुळींच ताळ्यावर येणार नाहीं, अशी त्यांची पुरेपूर खात्री झाली होती. ह्यापुढें काय करावें, कसें वागावें, हें त्यांना मुळीं सुचेनासें झालें होतें !

आबांच्या नादानें आपण भलतेंच करून बसलों; जुलूम जबरदस्तीनें प्रेम संपादन होत नसतें, ही जाणीव त्यांना फार उशीरा झाली !

आतां ह्या पेंचांतून आपली सुटका कशी करून घ्यावी, ह्याचा मार्ग ते शोधीत होते. कांहीं तरी भयंकर उपाय योजून ह्या कटकटींतून त्यांना मुक्तही होतां आलें असतें, पण इतकें दुष्ट अंतःकरण त्यांचें नव्हतें.

रंगीच्या डोळ्यांतील निळसर तेजाची त्यांच्या मनावर पडलेली छाप अद्यापि अजिबात नाहींशी झाली नव्हती ! रंगीविषयींची करुणा त्यांच्या मनांत वास करीत होती. त्यामुळें रखमानें तिला आंबेगांवला नेण्याची गोष्ट काढतांच भुजंगरावांच्याच काय, पण गढींत तिच्या दिमतीस असलेल्या सार्‍यांच्याच डोक्यांवरील ओझें हलकें झालें !

रखमानें रंगीला आंबेगांवीं आणिलें आणि मोकळ्या हवेंतील सावळ्याच्या मळ्यांतील झोंपडींत ठेवलें. त्या झोंपडींत राहिल्यानें आपण आपल्या घरींच आहोंत, असें समाधान रंगीला लाभलें. आणि त्यामुळें तिच्या तोंडावर थोडी टवटवी दिसूं लागली !

रंगीसंबंधानें आबांना खरी कल्पना आली नव्हती, त्यामुळें ते मनांत म्हणत, " चार दिवस पोर रुसेल, रडेल, नतर आपोआपच वळणावर येईल ! सावळ्यानें केलेले इतके अपराध पोलिसांच्या दप्तरांत दाखल आहेत की, फांशीची नाहीं तर जन्मठेपेची तरी शिक्षा त्याला झाल्याशिवाय राहणार नाहीं ! "

"साखरगोटी आपलीच म्हणून सावळ्या बडबडत होता. भुजंगरावांच्या अंगावरही त्यानं हात टाकला होता. आतां बघ म्हणावं सावळ्या, तुझी साखरगोटी गेली ! रंगीही पण गेली ! आणि तुझं लेका सर्वस्व गेलं ! कुणाशीं द्वेष चालविला होतास, ह्याची तुला कल्पना नव्हती ! कालच्या पोरा, उगीच तुझा तूंच सत्यानाश करून घेतलास--"

पण आबांनीं रंगीची झालेली अवस्था समक्ष पाहिली असती, तर तिच्याविषयीं त्यांच्या अंतःकरणास थोडा तरी पाझर फुटला असता. निदान त्यांना तिची दया तरी आली असती. गौराबाईनीं कितीदां तरी रंगीचा समाचार घेऊन येण्यास त्यांना सांगितलें होतें--नव्हे, विनविलें होतें--पण त्यांनीं तसें केलें नाहीं.

रंगीला आपलें तोंड दाखविण्यास आबांना आतां लाज वाटत असावी. आपणच त्या खेळकर पोरीचा एक प्रकारें खून केला, असेंही तिच्या प्रकृतीची चिंताजनक स्थिति ऐकून त्यांना वाटत असावें. म्हणून ती जवळ असूनही आबांना तिच्याकडे जाण्याचें धैर्य होत नव्हतें !

रंगीकडे जाण्याचा लकडा गौराबाईनीं अतिशयच लावला, तर आबांना तिच्याकडे एकादे वेळीं जावेंसेंही वाटे. पण ती रखमाच्या येथें आहे, एवढ्याच गोष्टीनें त्यांच्या अंगाचा थरकांप होई ! रखमाची भीति त्यांना रात्रंदिवस वाटे. तिनें मारलेल्या जळत्या लांकडानें आबांच्या डोक्याला झालेली जखम हळुहळू भरूं लागली असली, तरी त्यांच्या मस्तकांत–मनांत–रखमानें केलेली जखम कधींही भरून येणारी नव्हती !

म्हणून तर सावळ्याच्या झोंपडीकडे रंगीच्या समाचाराला आबा गेले नाहींत. रंगीलाही पण त्यांचें दर्शन नको होतें !

आणि रखमाच्या मनांत तर आबांचें भूत त्यांच्या दोन नवऱ्यांच्य

वलगनेपासून एकसारखें जळत होतें. त्या आगींत त्यांनीं केलेल्या रंगीच्या विटंबनेचें तेल पडून आतां तर काय, त्या आगीचा डोंब झाला होता!

गांवांत देखील आबांना बाहेर तोंड काढणें कठीण झालें होतें. रखमाचे आणि त्यांचें भांडण झालें; रखमानें आबांना चांगलाच प्रसाद दिला; ही हकीकत गांवभर होण्यास वेळ लागला नाही. त्यामुळें गांवांतही आबांची छी: थू: झाल्याशिवाय राहिली नाही.

खेडयापाडयांत असल्या गोष्टीचा बभ्रा होण्यास फार वेळ लागतच नाहीं मुळीं!

आबांनीं भुजंगरावांशीं रंगीचें लग्न सक्तीनें लावलें, त्यांना गुंडभटानें मदत केली, ही बातमी इतके दिवस गुप्त राहिली असली, तरी रखमानें रंगीला आंबेगांवीं आणल्याबरोबर ह्या बातमीचा एकदम स्फोट झाला! आणि जो तो रंगीविषयीं हळहळूं लागला. आबांना लोकांचे आणखी शिव्याशाप बसूं लागले!

ते शिव्याशाप देण्यांत आतां मगनशेठही भाग घेऊं लागले होते. त्यांनाही पूर्वीइतका आबांचा वचक सध्यां वाटेनासा झाला होता! भुजंगराव आणि आबा यांनीं रोकड सांठवून ठेवण्याच्या भानगडींत मगनशेठना चांगलेंच पिळून काढलें होतें! त्यामुळें त्यांना फार मोठा चट्टा बसला होता! त्याचा सूड कांहीं तरी घ्यावा, अशी मगनशेठची आंतून आंतून फार इच्छा होती!

तशी संधि आतां आली आहे, असें मगनशेठना वाटलें. रखमाला चिथावून आबांना कोर्टापुढें खेंचावें, असा त्यांनीं बेत ठरविला!

रखमा मगनशेठच्या दुकानी रंगीच्या औषधपाण्याच्या जिनसांकरितां नेहमीं जात असे. मगनशेठ त्या वेळीं रंगीच्या प्रकृतीची पूसतपास करीत आणि तिच्याविषयीं आपली सहानुभूति दाखवीत.

सारा गांव आबा आणि भुजंगराव यांना दोष देत आहे; आणि रंगी-सावळ्याचें गांधी पद्धतीनें झालेलें लग्नच खरें लग्न आहे; असें लोक म्हणतात हें ते रखमाला वरचेवर सांगत.

रखमालाही त्यामुळें बरें वाटे.

शेतकऱ्यांची सुगी संपली, म्हणजे त्यांना मोकळेपणा असतो. आणि

दोन पैसेही त्यांच्या हातांत खेळत असतात. अशा वेळीं तुंबलेल्या फिर्यादी-अर्यादींना सुरुवात होते.

म्हणून सुगी खलास झाल्यावरच रखमानें तशी फिर्याद रंगीकडून आबा, भुजंगराव ह्यांच्यावर करावी; म्हणजे पहिलें लग्न खरें ठरेल; आणि आबा, भुजंगराव यांची नाचक्की होऊन त्यांना शिक्षाही पण होईल; असा सल्ला मगनशेठनीं रखमाला दिला !

रखमाला असें कांहीं तरी पाहिजेच होतें. त्याशिवाय आबा व भुजंगराव ह्या दुष्टांची खोड मोडणार नाहीं, असें तिला वाटत होतें !

अशी फिर्याद सावळ्यानें, नाहीं तर रंगीनें करावयास पाहिजे, असा तपास मगनशेठनीं तऱ्हेगांवास जाऊन करून आणला. त्यामुळें रखमाला ही गोष्ट रंगीच्या कानांवर घालणें भाग पडलें !

रंगीची प्रकृति खालावत होती. तिला आतां कशाची आशा वाटत नव्हती, ती रखमाला म्हणत असे—

" डोळे मिटले कीं, कृष्णासारखा वेणू वाजवीत असलेला सावळ्या मला दिसतो की ग मामी ! तो भेटला कीं मी जाणार !—"

मामीच्या फिर्यादीच्या कल्पनेलाही रंगीनें उत्तर दिलें होतें—

" मामी, देवानंच माझं सावळ्याशीं लग्न लावलं आहे. दुसऱ्या कोणाशीं नाहीं ! खरं खोटं कोण ठरविणार हें ! सरकार ठरविणार म्हणतेस ? सरकार कांहीं देव नाहीं ! हीं माणसंच—पुरुषच—कीं ! आणि देवासारखे पुरुष थोडेच ! माझा सावळ्या ! तुझा सदूकाका ! सखीचा मन्यादेखील ! हे मला देव वाटतात ! बाकी जो बघावा तो दुष्ट ! मामी, सारे दुष्टच ! मग न्यायाधीश पुरुष असेल, तर तोही दुष्ट नसेल कशावरून ? मामी, नको ही कटकट— "

रंगीनें कानांत बोटें घालून डोळे मिटून घेतलें.

त्यानतर सदोबाचा विचार रखमा घेऊं लागली, तेव्हां ते म्हणाले,

" रंगीला विठोबान सावळ्या दिला आहे. तोच तिचा खरा नवरा ! साहेबांच्या कोर्टाला धर्म कसला कळतोय ! लग्न हें धर्मांतील कृत्य आहे. तुकाराम महाराज म्हणतात,

*" धर्म रक्षावयासाठीं । करणें आटी आम्हांसी ।"*

अग, धर्म राखण्याचं काम साधूकड असतं. कोर्टाचं नसतं !—"

रखमासारख्या वीर स्त्रीला असला वेदांत कसा पटणार ? तिनें फिर्याद करण्याचें ठरविलें. तऱ्हेगांवच्या वकिलांनीं योग्य सल्ला दिला. मगनशेठनीं फार मेहनत घेतली. मात्र फौजदारी फिर्याद आंगलट येईल कीं काय, अशी भीति वाटून दिवाणी फिर्याद तऱ्हेगांव कोर्टांत गुदरण्यांत आली.

ही फिर्याद कोणी केली; ती कोर्टानें कशी घेतली; वगैरे गोष्टींची चर्चा येथें करावयास हें कांहीं कोर्ट नव्हे.

ह्या फिर्यादीनें साऱ्या तालुक्यांत खळबळ उडून गेली ! भुजंगराव, आबा, गुंडभट ह्यांना धास्ती वाटूं लागली !

मगनशेठ सदोबांना त्यांच्या शेताच्या तारणावर पैसे देत होते. सदोबा ते पैसे त्यांना पसंत पडलेल्या वारकरी सांप्रदायांतील चकणे वकिलांच्या पदरांत नेऊन ओतीत होते ! ते चकणे वकील ही सारी दादा महाराजांची कृपा म्हणून ते पैसे घेत होते !

सदोबा सारखे भोळें कूळ त्यांच्याकडे येणें हा त्यांच्या गुरूच्या कृपेनें आलेला दैवयोगच होय, असे तऱ्हेगांवचे वकीलही बाररूममध्यें बोलत होते !

भुजंगराव आणि आबा यांनीं सातारच्या प्रख्यात फसवे वकिलांना आपलें वकीलपत्र दिलें होतें.

नोटिसा, साक्षीसमन्स करितां करितां एक वर्ष निघून गेलें !

हा खटला पुष्कळ दिवस तऱ्हेगांव कोर्टांत चालला होता. तऱ्हेगांवच्या "संभ्रम" ह्या साप्ताहिकांत ह्या खटल्याची सविस्तर हकीकत येत असे. पुण्या मुंबईच्या वर्तमानपत्रांचे बातमीदारही मधून मधून ह्या केसची हकीकत आपापल्या पत्रांत देत असत. परंतु जास्त विश्वसनीय माहिती स्थानिक पत्रांत येणें संभवनीय असल्यामुळें त्या संभ्रम वर्तमानपत्रांत वेळोवेळीं सविस्तर आलेल्या रिपोर्टांतील कांहीं उतारे, वाचकांच्या माहितीकरितां पुढें दिले आहेत. सारीच हकीकत द्यावयाची म्हटली, म्हणजे तो एक ग्रंथच होईल. म्हणून त्रोटक उतारे दिले आहेत.

  

रंगीसंबंधीं संभ्रम पत्रांत पुढील मजकूर आला होता.

"रंगीला तऱ्हेगांव कोर्टांत आणिलें, तेव्हां तिचा नुसता अस्थिपंजर राहिला होता. न्यायाधिशांनाच काय, पण कोर्टांतील सर्वांना तिची ती स्थिति पाहून करुणा आली. तिच्या डोळ्यांतील निळसर तेजामुळें सर्वांचें लक्ष तिच्याकडे वेधलें. तिनें तुटक तुटक शब्दांत आपली करुण कहाणी न्यायाधीशांना सांगितली, तिचा सारांश असा :—

"सावळ्या आणि मी लहानपणापासून एके ठिकाणीं खेळलों. आम्ही शेतांतून एके ठिकाणीं कामं केलीं. आमची जोडी लहानपणा पासूनच ठरली होती. माझ्या थोरल्या भावावर सावळ्याच्या बापाचा खून करण्याचा आळ आला. तो कुठं गेला त्याचा पत्ता नाहीं. माझा चुलता आबा ह्यानं मला सांभाळलं. मला भुजंग-रावाला द्यावी, असं चुलत्याला वाटत होतं. मग आमचं आम्हींच लग्न ठरविलं. एकमेकांच्या गळ्यांत माळा घालून आमचं लग्न झालं. माझा पति सावळ्याच ! त्याची मी वाट पाहातें, तो आला कीं मी प्राण सोडणार, साहेब !—"

तिच्या जबानीनें कोर्टांतील सर्वांचीं हृदयें हलून गेलीं !

  

भुजंगरावाच्या बाजूनें सहाजिकच गुंडभटाची साक्ष झाली. तिचा मतलब असा—

"मींच भुजंगरावांचें लग्न रंगीबरोबर वैदिक पद्धतीनें लावलें. मीच आबासाहेब मोरे यांचा अनेक पिढ्यांचा उपाध्या आहें. माझ्या जोडीला भुजंगरावांचे उपाध्ये धोंडभट होते. आबासाहेबांनीं शास्त्रोक्त कन्यादान केलें. रंगी आणि भुजंगराव यांचें लग्न एका दिवसांत नवीन पद्धतीनें आटोपलें. हें लग्न भुजंगरावांच्या गढींतील बंगल्यांत झालें —"

मध्येंच गुंडभटाला न्यायाधीशांनीं विचारलें—

"क्षत्रियांच्या लग्नाच्या पद्धतीप्रमाणं दोन तीन दिवस विवाह-समारंभ चालतोना ? तर मग हा लग्नाचा विधि तुम्ही अगदीं झटपट कां आवरला ?—"

गुंडभटांनीं उत्तर दिलें,

"साहेब, नवीन धर्मनिर्णय मंडळाच्या विधीप्रमाणें हें लग्न आम्ही झटपट आवरलं. आणि साहेब, आतां लोकांत मोठा समारंभ करायला त्राण राहिलाय कुठं ? आणि आम्हांला हो काय ! थोड्या वेळांत पुष्कळ प्राप्ति झालेली बरीच की !--

भटजी सर्वांकडे पाहून गालांतल्या गालांत हसले. त्यांना वाटलें, न्यायाधिशांना आपण चोख उत्तर दिलें !

पण उलटतपासणींत त्यांची उडालेली त्रेधा फार मजेची होती ! ती आम्ही पुढील अंकीं देणार आहोंत."

❀ ❀ ❀

गुंडभटाच्या जबानीचा संभ्रम पत्रांतील उतारा वर दिला आहे. त्याच्या जोडीला त्याच पत्राच्या एका अंकांतील रखमाच्या जबानीचा 'संभ्रम' पत्रानें दिलेला रिपोर्ट वाचकांची करमणूक केल्याशिवाय राहाणार नाही. संभ्रमकार म्हणतात–

"रखमाच्या साक्षींत तिनें पुष्कळ नव्या नव्या गोष्टी सांगितल्या. तिला भुजंगरावांच्या फसवे वकिलांनीं पुष्कळ अडविलें. तेव्हां भर कोर्टांत वादीच्या बाजूच्या चकणे वकिलांचे आणि प्रतिवादीच्या बाजूच्या फसवे वकिलांचे एकसारखे खटके उडत ! त्यामुळें न्यायाधिशांना देखील हंसूं येई, मग इतरांची कथा काय ?

रखमा आपल्या साक्षींत म्हणाली–

"सावळ्याचं आणि रंगीचं झालेलं लग्न मी पाहिलं आहे. एकमेकांच्या गळ्यांत माळा घालून तें लग्न खाशा या मराठा भटानं लावलं. तो कुठं गेला माहीत नाहीं आम्हांला !

"भुजंगरावाचं लग्न आम्हांला ठाऊक नाहीं. आमच्यांत लग्न एकदांच होतं. गुंडभट म्हणतो, तें साफ खोटं आहे, साहेब ! त्यांच्यांत दोन लग्न होत असतील ! त्याची बायको अलीकडे उठून गेली आहे, साहेब ! अशीच कोणाजवळ स्वयंपाक करण्यास राहाते ती ! लोक सांगतात, तो तिचा दुसरा नवरा आहे !—"

ह्या वेळीं गुंडभट काळाठिक्कर पडला. त्याच्या बाजूच्या फसवे

वकिलांनीं तिला अडविण्याचा प्रयत्न चालविला. चकणे वकिलांनीं तिची साक्ष मुद्याला धरून चालली आहे, असें जोरानें सांगितलें. न्यायाधिशांनी हरकत जुमानली नाहीं. त्यांनीं रखमाची जबानी पुढें चालू करण्यास फर्माविलें.

रखमा मुळींच न घाबरतां साक्ष देऊं लागली, ती म्हणाली—

"आबा फार खोटा माणूस आहे! त्यानंच सावळ्याच्या बापाचा खून केला. मला पक्कं माहीत आहे हें! रंगीचा भाऊ हिंमतराव ह्यावर आबांच्या सांगण्यानं म्यांच आळ आणला! म्यां खोटी साक्ष दिली साहेब! आबांसारखा दुष्ट माणूस नाहीं! त्याच्यामुळं भुजंग्या फसला! त्यानं ठार मारलं रंगीला! साखर-गोटीचं भांडण असं पेटलं आणि त्यानंच रंगीला जाळलं साहेब! याला आबांचाच दुष्टावा कारण साहेब!—"

आणि काय सांगावें, रखमाला त्यानंतर आलेलें रडूं आवरेना. तिनें पुष्कळ प्रयत्न केला, पण तिला एकसारखे हुंदके येऊं लागले. पुढें ती भर कोर्टांत आबांच्या नांवानें बोटें मोडीत रडू लागली!

कोर्टानें तेथेंच तिची साक्ष पुरी केली. सर्वांची दृष्टि त्या वेळीं आबा मोरे यांचेकडे गेली! ते खालीं मान घालून कोर्टांत बसले होते. त्यांना वर दृष्टि करून लोकांकडे पाहाण्याचें धैर्य होत नव्हतें. मग रखमाकडे त्यांना नुसती नजर फेकणेंही शक्य नव्हतें!

आबा, भुजंगराव, सदोबा, गौराबाई वगैरेंच्या जबान्या आणि त्यांच्या उलटतपासण्या यांची हकीकत संभ्रम पत्रांत केव्हां येते, इकडे लोकांचें लक्ष लागून राहात असे. सध्यांच्या झटपट लग्नाच्या पद्धतीवरही लोक साधक बाधक चर्चा करीत. हिंदूंतील विवाहविधीची पद्धति सर्वत्र एक असावी, असें ह्या केसकडे दुरून दुरूनच पाहाणारे लोकही म्हणूं लागले!

ही दिवाणी केस न्यायालयापुढें सुमारें दोन वर्षें चालली होती. ह्या केसमध्यें रखमाचे सर्व दागिने खलास झाले! आबांचा खर्च भुजंगरावांनीं चालविला होता. वास्तविक कांटेकोर पद्धतीनें विचार केल्यास त्यांची स्वतःची स्थावर जंगम मिळकत होती तरी कोठें?

ह्याच खटल्याच्या निकालांचा सारांश 'संभ्रम' पत्रांत प्रसिद्ध झाला.

न्यायाधीशांनीं आपला निर्णय विस्तृत दिला होता. पण येथें फक्त 'संभ्रम' पत्रांतील उतारा दिला आहे.

संभ्रमकार म्हणतात—

"दोनदां लग्न झाल्याची ही आंबेगांवची केस बरीच गाजली आहे. ह्या केसचा निकाल मात्र अपेक्षित असाच लागला. आणि रखमासारखी जहांबाज स्त्री कोर्टांत कांहींही बरळली, तरी न्यायाधीशांनीं त्यांतील नेमकें सत्य शोधून निःपक्षपातानें हा निर्णय दिलेला आहे. ह्याबद्दल आपल्या तऱ्हेगांवचे विद्वान् न्यायाधीश स्तुतीस पात्र आहेत.—"

न्यायाधीशांनीं दिलेल्या निर्णयाचा सारांश आम्ही पुढें देत आहों—

"सावळ्या आणि रंगी यांचें पवित्र प्रेम लहानपणापासूनच वाढीस लागलेलें होतें. एकमेकांनीं एकमेकांच्या गळ्यांत माळा घालून विवाहविधि केल्याचा कोर्टापुढें पुरावा आलेला आहे. तो पुरावा कितपत विश्वसनीय आहे, हें पाहाण्यापूर्वीं एवढ्या विधीनेंच लग्न-विधी पुरा होतो काय, हाही प्रश्न विचारांत घेतला पाहिजे. मोरे आणि देशमुख ह्या क्षत्रिय घराण्यांतील लग्नविधीप्रमाणें हा विवाह झाला आहे, असें वादीच्या विद्वान् वकीलांनाही पुरेसें सिद्ध करितां आलें नाहीं. जर ह्या मुकदम्यांत सावळ्याची जबानी झाली असती, तर वादीच्या बाजूला कदाचित् अधिक बळकटी आली असती !"

"सावळ्या आणि रंगी ह्यांचें लग्न रजिस्टर पद्धतीनें झालें असतें, तर लग्नाच्या कायदेशीरपणाचा प्रश्नच नव्हता—"

"उलटपक्षीं भुजंगरावांशी विवाह झालाच नाहीं, असा पुरावा पुढें आलेला नाहीं. तो विवाह जबरदस्तीनें झाला, असें म्हणण्यास पुरेसा पुरावा नाहीं. वधूच्या मेंदूंत विकृति झाल्याची साक्ष सरकारी डॉक्टरांची असल्यामुळें वधूची कोणालाही करुणा येत असली, तरी तिचा कायद्याच्या दृष्टीनें उपयोग नाहीं."

"आबा आणि गौराबाई शपथेवर कन्यादान केल्याचें सांगतात. भुजंगराव तर म्हणतात, वधूनें आनंदानें आपल्या गळ्यांत माळ घातली !—"

"गुंडभटाच्या चारित्र्याशीं आम्हांला येथें सध्यां कर्तव्य नाहीं. ते

आणि धोंडभट ह्यांनीं दोन्ही घराण्यांत परंपरेनें चालत आलेल्या वैदिक पद्धतीनें पण नव्या धर्मनिर्णय मंडळाच्या योजनेप्रमाणें हा विवाह झटपट उरकला असें सांगितलें........"

"खुद्द फिर्यादीच्या बाजूचे सदोबाच नुसत्या माळा घालून लग्न लावण्याची आमच्यांत चाल नाही, असें सांगतात......"

"ह्या सर्व पुराव्याचा विचार करितां मी रंगीचा भुजंगरावाशी झालेला विवाह कायदेशीर ठरवितों."

"पण ह्या वेळी मला माझें विचारपूर्वक बनलेलें मत नमूद करून ठेवणें इष्ट वाटतें, तें असें कीं---

"पूर्वी दोन तीन दिवस विवाहसमारंभ चालत असल्यामुळें त्याचा गाजावाजा भरपूर होऊन, असें लग्न जगजाहीर होत असे. सध्यांच्या कोणत्याही स्वरूपाच्या झटपट विवाहपद्धतीमुळें लग्न जगजाहीर होण्यास अवसरच मिळत नाही. त्यामुळें सध्यांच्या केसेससारख्या केसेस कोर्टापुढें येण्याचा जास्त संभव आहे---"

"म्हणून कोणाचेंही लग्न झालें की, त्याची नोंद लागलींच सरकारदप्तरीं होण्याची कांहीं तरी योजना कायद्यानें ठरविण्यांत आली पाहिजे. तसें झाल्यास पुराव्याच्या दृष्टीनें तें हितकारी होईल ---"

ह्या खटल्याचा निकाल पुण्यामुंबईच्या वर्तमानपत्रांत फार गाजला. कारण ह्या खटल्यांत गुप्तपणें गुन्हे करणाऱ्या टोळींतील तरुणांचा संबंध असल्यामुळें ह्याला त्या वर्तमानपत्रांनीं महत्त्व दिलें. नाहीं तर खेड्यापाड्यांतील लोकांच्या जीवनांत घडून येणाऱ्या क्रांतिकारक प्रकारांचाही उल्लेख करणें ह्या संपादकांच्या जिवावर येत असे!

ह्या खटल्याचा संभ्रम पत्रांत आलेला निकाल लोकांना वाचून दाखवीत असतांना मगनशेठ म्हणाले---

"जरा आणखी थोडे रुपये रखमानें खर्च केले असते, तर आपल्यासारखा निकाल झाला असता! आतां अपिलांत काय करायचें तें पाहूं ---"

मगनशेठच्या मनांत रखमाला आणखी भरीस घालून तिला किती बुडवावयाचें होतें कोणास ठाऊक? भांडवलशाही मनोवृत्तीचा खेड्यांपाड्यांतील मासला हा असा दिसून येतो खरा! •

मुंबईच्या एका क्रांतिवादी पत्राला तर हा खटला म्हणजे भांडवल-शाहीनें सामाजिक बाबतीतही खेड्यापाड्यांत घातलेला धुमाकूळच होय असें वाटलें. त्या पत्रानें आणखी असेंही म्हटलें होतें कीं,

"सावळ्यासारख्या क्रांतिवादी तरुणाला भांडवलशाहीनें उघड उघड दिलेलें हें आव्हानच होय —"

वास्तविक ह्या खटल्याच्या मुळाशीं क्रांति वगैरे कांहीं नव्हतें. साखर-गोटीच्या क्षुल्लक वादांतून निर्माण झालेलें, रंगीच्या आयुष्याचा सत्यानाश करणारें हें एक जहरी विष होतें.

तें विष रंगीचा आणि सावळ्याचा दोघांचाही एकदम नाश करीत होतें. रंगी तर शय्येवर खितपत पडली होतीच. सावळ्या मोकळा होता ! तऱ्हेगांव भागांतील दंगेधोपे चाललेच होते ! दूरदूरच्या ठिकाणीं तर गुंडांनीं फार धुमाकूळ घातला होता ! पानगांव येथील पोलिस ठाण्यामुळें भुजंगराव निर्धास्त होते. अशा स्थितीत पुण्याच्या एका लोकप्रिय दैनिक वर्तमानपत्रांत खटल्याच्या निकालानंतर सुमारें आठ दिवसांनीं पुढील हकीकत प्रसिद्ध झाली. त्यामुळें सावळ्यावरील संकट मात्र वाढलें !

## सूड घेतला !

आंबेगांवच्या रंगी आणि सावळ्या यांच्या लग्नाच्या केसची कुतुहल-जनक हकीकत देऊन थोडेच दिवस झाले. त्यानंतर एके दिवशीं रात्रीं आंबेगांवीं एक भयंकर कृत्य घडून आलें. त्याची बातमी आमच्या बातमी-दारानें पाठविली आहे. ती जशीच्या तशीच पुढें दिली आहे—

"लग्नाचा मुकदमा जिंकल्यामुळें भुजंगरावांना आनंद होणें सहाजिक होतें. त्याबद्दल त्यांचा सत्कारही त्यांच्या चहात्यांनीं कांहीं ठिकाणीं केला. त्यांना मेजवानीकरितां दोन दिवसांपूर्वी आबा मोरे यांनीं आंबेगांवीं मुद्दाम बोलाविलें होतें."

"रात्रीं बारा वाजल्यानंतर आबा, गुंडभट आणि भुजंगराव हे त्रिवर्ग आबांच्या घरीं सुंदर मद्याचा आस्वाद घेत मजेंत बसले होते !"

"इतक्यांत गांवांत चोहोंकडे दगडांचा वर्षाव सुरू झाला ! बंदुकींच्या फैरी झडूं लागल्या ! आबा मोरे यांच्या घरावर गुंडांनीं हल्ला

केला ! त्या गुंडांनीं कांहीं पदार्थ सक्तीनें हुंगावयास लावून, ह्या त्रिवर्गांना बेशुद्ध केलें ! "

"भर चांदण्या रात्रीं त्यांना गांवापासून दूर अंतरावरील माळरानांत नेलें. तेथें त्यांना खरपूस मुका मार दिला आणि त्यांचीं नाकें कापून घेतलीं !"

"ह्या भयंकर कृत्यामुळें आंबेगांवच्या बाजूचे लोक हवालदिल होऊन गेले आहेत ! —"

"हा सूड सावळ्यानेंच घेतला असला पाहिजे, असें लोक बोलत आहेत ! "

  

सावळ्याचा तपास आतां पोलिस अत्यंत चिकाटीनें आणि सावधपणें करूं लागले. रंगी, रखमा नि सदोबा ह्यांना ते सारखे सतावीत होते !

रंगी डोळे मिटून घेऊन परमेश्वराला आळवीत असे—

"देवा, अशा यातना तूं किती दिवस देणार ? कसंही करून सावळ्याचं मला एकदां दर्शन करून दे, मग ह्या अभागी मुलीचे डोळे मिटीव —"

## भयंकर बातमी !　　१६

रंगी देवाची प्रार्थना करीत होती. जिवाला कंटाळल्यानें तिची ती निर्वाणीची प्रार्थना होती. कोर्टकचेऱ्यांतून झालेल्या विटंबनेमुळें ती जिवाला अत्यंत कंटाळली होती !

तिच्यासारखी खेळकर आणि आनंदी पोर उभ्या आंबेगांवांत तर नव्हतीच, पण जवळपासच्या पांच पन्नास गांवांत तशी आढळेल, अशी कोणाला खात्री देतां आली नसती.

पण लहानपणापासूनच तिच्यावर एकामागून एक सारख्या आपत्ति येण्यास सुरुवात झाली होती !

तिचे आईबाप तिच्या बालपणांतच वारले होते, त्यामुळें त्यांची आठवण तिला झाली, तरी ते तिच्या डोळयांपुढें उभे राहात नव्हते ! तीच गोष्ट तिचे वडील बंधु हिंमतराव यांची. ती वयानें चार पांच वर्षांची होती, त्या वेळेपासूनच त्यांचा पत्ता नव्हता ! अशा प्रकारें अगदीं लहान वयांतच खऱ्या प्रेमाच्या माणसांना ती पारखी झाली होती !

लहानपणापासून रंगीचा बराच वेळ मळयांत जात असे. तेथें सावळयाची मामी रखमा हिच्या मागें मागें ती नेहमीं असे. रखमा ही रंगीवर अगदीं आपल्या मुलीप्रमाणें प्रेम करी !

सावळया तर रंगीचा लहानपणापासूनचा खेळगडी होता. त्या दोघांचें रूप आणि स्वभाव ह्याचा मेळ उत्कृष्ट बसला होता, म्हणून तर त्यांचें पुढें प्रेमही जमलें !

रंगी आणि सावळया ह्यांचें हें प्रेम अगदीं स्वाभाविक होतें. त्यांत कसलाही कृत्रिमपणा नव्हता !

रंगीला असल्या दुःखद स्थितींतही गतकालाची वरचेवर आठवण होई, निदान सावळ्याची अखेरची भेट झाल्याशिवाय आपला प्राण जाऊं नये, असें तिला वाटे ! एके दिवशीं मोठ्या पाहाटेस ती जागी झाली. त्यानंतर तिला कांहीं केल्या झोंप येईना. त्या वेळीं तिच्या मनःचक्षूंपुढें किती तरी गतकालची चित्रें येऊं लागलीं !

"एकदां सावळ्या मोट हाणीत होता, उंसाला पाणी पाजावयाचें होतें. पण त्याला चावडींत बोलावणें आलें. तो गेल्यावर आपण त्याची मोट चालविली व रखमानें उंसास पाणी लावलें. तो परत आल्यावर आपल्या पाठीवर चापटी मारून त्यानें आपण केलेल्या कामाबद्दल आपलें कौतुक केल्याची तिला आठवण झाली."

त्या वेळीं तिचें अंग थरारलें !

"ज्वारीची खुरपणी दोघे जोडीजोडीनें करीत असतां, आपल्या हातांतील बोटांत कांटा बोंचला. सावळ्यानें तो झटकन् ओढून काढला ! बोटांतून भळभळ रक्त येऊं लागलें ! पण तें थांबविण्याकरितां नको नको म्हणत असतां तें माझें बोटच त्यानें तोंडांत घातलें."

ही आठवण झाल्याबरोबर तिचे डोळे भरून आले.

"सावळ्या आपली झोंपडी बांधीत असतां आपण त्याला मदत करीत होतों. त्याच्या पायाला कुऱ्हाड लागून रक्त येऊं लागलें. आपण आपल्या लुगड्याचा पदर झटकन फाडून त्याच्या पायास बांधला. त्या वेळीं त्यानें लाडक्या रागानें आपल्याकडे पाहिल्याची गोड आठवण तिला झाली—"

"तो पदर फाडल्याबद्दल आबा आपणास नाहीं नाही, तें बोलले ! तेव्हां मळ्यांत आल्यावर माझ्याकडे पाहून सावळ्या म्हणाला—

"कशी एका माणसाची खोड मोडली —"

माझा चेहरा उतरला. त्याबरोबर सावळ्यानें आपल्याला जवळ ओढून घेऊन आपल्या तोंडावरून हात फिरवीत म्हटलें होतें—

"रंगे, हेही दिवस जातील ! वाईट वाटून घेऊं नकोस ! अग, तुला असली छप्पन लुगडीं घेईन मी ! —"

ही आठवण झाल्याबरोबर एकदम तिचें हृदय भरून आलें; आणि

ती 'सावळ्या ! सावळ्या !' असें तोंडानें पुटपुटूं लागली. तो भेटावा, अशी तिला फारच उत्कंठा लागून राहिली !

पुन्हा सावळ्याकरितां ती ईश्वराची प्रार्थना करूं लागली. ईश्वराचे भक्त कांहीं म्हणोत, पण सगळ्याच प्रार्थना कांहीं त्याच्या कानांवर जात नसाव्यात, असें तिला वाटूं लागलें. कारण आपल्यासारख्या अनाथ अबलेच्या हाका त्याला ऐकूं जात नाहींत.

मग आपल्यापेक्षां दुःखी हृदयाचे कोणी असतील, त्यांच्याकडे कदाचित् त्याला जावें लागलें असेल. तेव्हां आपल्या दुःखांत आणखी जर भर पडली, तर परमेश्वराचें चित्त आपल्याकडे वेधेल, असेंही तिला त्या वेळीं वाटलें, खरें !

पुढें जें कांहीं घडून येतें, त्याचीं पूर्वचिन्हें मनापुढे अंधुक अंधुक येऊं लागतात, अशीच स्थिति तर रंगीच्या मनाची झाली नसेल ना !

अद्यापि सूर्योदय होण्यास अवकाश होता. म्हणून ती पुन्हा बिछान्यावर कलंडली.

रंगी चांगली आठ वाजण्याच्या सुमारास जागी झाली. तों तिला आकाशांत सकाळींच गडगडाट होत असल्याचें ऐकूं आलें ! अशी स्थिति फार क्वचित् होते. पण त्या दिवशीं आंबेगांवीं घडून आली खरी !

रखमा व सदोबा शेतकामाला लागले होते. रंगी हलकेंच झोंपडी बाहेर येऊन तोंड धूत होती.

इतक्यांत भुजंगराव, आबा आणि इतर दोघे तिघे तेथें अकस्मात आले !

रंगी झटकन झोंपडींत जाऊन खाटेवर पडली आणि तिनें डोक्यावर पांघरूण ओढून घेतलें.

भुजंगराव व आबा हे दोघे त्यांच्यावर गुंडांनीं हल्ला केल्यापासून अत्यंत चिडले होते. त्यांनीं मिरजेच्या दवाखान्यांतून आपलीं नाकें जुजबी नवीं बनवून घेतलीं असलीं, तरी झालेला अपमान त्यांना असह्य होऊन गेला होता ! लग्नाच्या दाव्यांत आपण विजयी झाल्यानें हा आपला सूड साव-ळ्यानेंच घेतला असला पाहिजे, अशी त्यांची खात्री झाली होती !

लोकही काय, सावळ्या, मन्या, खाशा वगैरेंना आपण डोळ्यांनीं पाहिल्याची गुप्त वर्दी भुजंगरावांच्या कानांवर घालीतच असत !

अर्थात् सावळ्याचा सूड घेण्याकरितां वाटेल तें करण्याचें भुजंगरावांनीं ठरविलें असल्यास त्यांत नवल नाहीं !

आणि खरोखर गुंडांच्या चळवळीसही पुन्हा जोर चढला होता ! आतां कित्येक ठिकाणीं बंडखोरांना वचक बसावा, म्हणून गोळीबारही होत होता ! पण सावळ्या किंवा त्याच्या टोळीपैकीं प्रमुख माणूस अद्यापि सांपडला नव्हता !

सावळ्यास पकडून देणारास एक हजार रुपयांचें बक्षिसही सरकारनें लावलें होतें ! त्या बक्षिसांत भुजंगरावांनीं स्वतःच्या आणखी हजार रुप-यांची भर घालून बक्षिसाची रक्कम दोन हजारांपर्यंत वाढवून घेतली होती !

तरीही पण सावळ्याचा पत्ता लागत नव्हता !

रंगी आंबेगांवीं असल्यानें सावळ्या तिच्याकडे येण्याचा संभव आहे, म्हणून तिला पोलिस मधून मधून छेडीत, पण त्यांत त्यांची निराशा होई !

भुजंगरावांना वाटलें, रंगीला अशी मोकळी ठेवण्यापेक्षां जर पानगांवीं डांबून ठेवली, तर तिकडे कदाचित् सावळ्या तिला सोडविण्याकरितां येईल. मग तेथें अगदीं बिनतोड रचून ठेवलेल्या जाळ्यांत त्यास पकडतां येईल !

म्हणून भुजंगराव रंगीला पानगांवीं नेण्याकरितां त्या दिवशीं सावळ्याच्या झोंपडीकडे आले होते.

लग्नाच्या दाव्याचा निकाल भुजंगरावांसारखा झाल्यानें त्यांच्या आतांच्या विचारास कोणाला विरोध करितां येण्यासारखा नव्हता !

आबा हे रंगीचे कायदेशीर पालक होतेच. म्हणून त्यांना घेऊन भुजंगराव तेथें आले होते.

भुजंगराव तेथें आले नाहींत, तोंच रंगीच्या प्रवासाची सारी जय्यत तयारी तेथें येऊन दाखल झाली !

भुजंगरावांचा तेथें येण्याचा उद्देश आबांनीं रंगीच्या कानांवर घातला.

लग्न झालेल्या मुलीनें सासरीं गेलें पाहिजे, असेंही आबांनीं तिला फर्माविलें !

रंगीचें शरीर धास्तीनें खालीं वर होऊं लागलें ! तिचा प्राण कंठाशीं आला !

कोणाच्याही बोलण्यास रंगी हूं का चूं करीना. मग तिच्या तोंडून उत्तर कसलें निघतें ?

हें पाहून भुजंगराव चिडले आणि म्हणाले—

"पूर्वी तुम्ही रखमाबरोबर पळून आला. मी तुमची गय केली त्या वेळीं ! पण आतां मात्र मी कोणाचं कांही एकणार नाहीं ! माझी बायको अशा वनवासांत मी राहूं देणार नाहीं ! मला तिला पानगांवीं नेलीच पाहिजे !"

आतां मात्र रंगीला राहावेना. ती अत्यंत क्रुद्ध झाली. तशाही अशक्त स्थितींत ती ताडकन उठून बसली. तिचे डोळे खदिरांगारासारखे लाल दिसत होते ! तिचे अस्ताव्यस्त केस तिच्या चेहऱ्याला भेसूरपणा आणीत होते ! मात्र तिची रुक्ष, रोडकी शरीरयष्टी कित्येक दिवस निरशन करून तपश्चर्या करणाऱ्या योगिनीप्रमाणें भासत होती !

अशा योगिनीच्या तोंडून शापवाणी बाहेर पडावी, त्याप्रमाणें ती त्वेषानें उद्गारली !

"माझ्या ह्या जागेत कोण आलं आहे, मला माहीत नाहीं ! हें माझं घर आहे ! सावळ्याचं घर आहे ! करा तोंड काळं येथून !—"

"तू कोणाशीं बोलत आहेस समजलीस ? मी हक्कानं तुला येथून उचलून नेणार ! कोण मला आडवितो, तें पाहूं !—"

भुजंगराव गरजले.

"मी येथून जिवंत घराबाहेर पडणार नाहीं ! जीभ हासडून प्राण देईन मी !—"

रंगीनें अत्यंत त्वेषानें हे शब्द उच्चारले. तिला त्यामुळें भयंकर थकवा आला. आणि ती धाडकन बिछान्यावर पडली !

आबांचेंही धाबें दणाणलें. त्यांनी भुजंगरावांना मागें ओढलें. तेथें आबा आणि भुजंगराव यांच्या बाजूचे पुष्कळ लोकही जमले. रखमा तेथें नव्हती. ती शेतांत काम करीत होती. इतके लोक आपल्या घराकडे जमले आहेत, हें तिच्या नजरेस दुरून आल्याबरोबर ती धांवतच तेथें आली !

तिला प्रथम झोंपडीबाहेर उभे असलेले आबाच दिसले ! तिनें त्यांच्या-कडे भेदक नजरेनें पाहिलें आणि बिकट हास्य केलें !

त्या वेळीं आबांनीं खालीं मान घातली.

रखमाला तेथील तंटयाचें स्वरूप अजमाविण्यास वेळ लागला नाही. ती त्या लोकांच्या घोळक्यांतून झटक्यानें झोंपडींत शिरली. रंगीच्या खाटे-जवळ उभी राहिली आणि जहरी नजरेनें भुजंगरावांकडे पाहात बोलली——

" कोण हिला नेतय बघूं या ! मी खरी नागीण आहे, हें त्यानं जाणून असावं ! विषाची परीक्षा आणखी पाहूं नये !——"

ह्या जहांबाज स्त्रीच्या तोंडीं लागण्यांत अर्थ नाहीं, असें भुजंगरावांना प्रथम वाटलें खरें. पण त्यांच्या समजुतीप्रमाणे त्यांच्यावर सावळचानें जो वर्मी घाव घातला होता, त्यामुळे त्यांच्या अत्यत भडकलेल्या क्रोधापुढें विचाराचें कांहीं चालेना. ते रखमास कुत्सित स्वरांत म्हणाले,

" रखमे, मी उगीच बसलों म्हणून इतकी बहकूं नकोस तूं ! पान-गांवाहून नूं हिला चोरून आणलीस ! केवढा गुन्हा केला होतास, ठाऊक आहे ?"

ह्या भुजंगरावांच्या बोलण्यानें चिडून रखमा दांतओठ खात म्हणाली,

" तू चोर का मी चोर हे जग सांगेल ! रगीला तूच ठार केलीस ! तुला अन्नूचीही किमत नाही ! धडच्या पायानं निघून जा कसा !——"

रखमाच्या ह्या बोलण्यानें भुजगराव वरमले. आवांनी केव्हांच मागें पाय घेतला होता. इतक्या थराला ही गोष्ट यायला नको होती, असें त्यांना वाटलें.

आतां ह्या पेचांतून कसें बाहेर पडावें, ह्याचा जो तो विचार करूं लागला.

इतक्यांत तेथें आलेल्या मगनशेठच्या डोक्यांत एक कल्पना आली आणि ते म्हणाले——

" भुजंगराव, सातारा कोर्टांत अपील चाललें आहे रंगीच्या लग्नाच्या दाव्याचें ! त्याचा निकाल लागल्यावर मग काय करायचं तें तुम्ही करा ! आजच कां वाद घालतां ? ——"

आतां भुजंगरावांच्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला. तरी ह्या वादांत आपण अगदीच हरलों नाही, हे दाखविण्याकरितां भुजंगराव म्हणाले,

" बरं बरं ! ह्या घरांत तुम्ही कसं राहातां, हें पाहून घेईन मी !"

ह्या बोलण्यामुळें तेथें आपलें हातचें काम टाकून आलेल्या सदोबांनाही [illegible] वाटलें आणि ते म्हणाले——

" सावळ्याची जमीन मी केली आहे. त्यानं मला ती लागणीस दिली आहे. माझ्या ताब्यांत झोंपडी आहे ही —"

त्याला हिणविण्याच्या हेतूनें भुजंगराव जातां जातां वांकडी मान करून म्हणाले—

" बरं, बरं, वारकऱ्या ! तुला काय कळतंय ; तूं तर बाईल बुद्धीचा खरा ! —"

सदोबाला राग कसला तो माहीत नव्हता, तरीही ते थोडे रागावले; आणि त्यांनी तुकारामाच्या अभंगाचा एक चरण भुजंगराव व आबा यांच्याकडे पाहात पाहात म्हटला.

*भुंकती तीं द्यावीं भुंकों ।*
*आपण त्याचे नये शिकों ॥*

✽ ✽ ✽

ह्यानंतर एक आठवडा गेला नाहीं, तोंच सावळ्याचा जमीनजुमला, घरदार, सारें कांहीं सरकारनें जप्त केल्याची दवंडी गांवकामगारांनी गांवभर पिटविली. त्यामुळें साऱ्या आंबेगांवावर विलक्षण दरारा बसला ! भुजंगरावांच्या खटपटीनें ही गोष्ट घडून आली असावी, असें जो तो म्हणूं लागला.

लोक इतके भयभीत होऊन गेले कीं, सावळ्याशीं आपला दूरचा कसला का संबंध आहे, असें सरकारच्या कानी गेलें, तर आपलीही तीच गत होईल; आपला जमीनजुमला जप्त होईल; आपली अन्नान्न दशा होईल. म्हणून जो तो रंगी, रखमा आणि सदोबा यांच्यापासून चार चार पावलें दूर राहूं लागला.

लोकांना माणुसकीपेक्षां वित्ताचें महत्त्व कांहीं कांही वेळां अधिक वाटतें. ह्याचें कारण तें असलें, तरच दुपारची वेळ निभावते. तें नसेल तर जीव देखील जगूं शकत नाहीं !

सावळ्याच्या घरांतील सर्व चीजवस्त जप्त झाली ! त्याच्या मळ्यांतील झोंपडींत असलेल्या वस्तूंचीही तीच गत झाली !

आपल्याला आपल्या घरांत देखील कोणीं सुखानें मरूं देत नाहीं. ह्याचें रंगीला अतिशय वाईट वाटलें. पण करते काय बिचारी !

तिचीं भांडींकुंडीं गेलीं ! सामानसुमान गेलें ! तिच्या खाटेवर देखील जप्त होण्याची पाळी आली ! आतां मात्र तिच्यावर संकटांचा कहर झाला !

ती अतिशय विचारी होती. पण आतां तिच्या मेंदूचा तोल सुटूं लागला ! ती हट्टास पेटली ! ती खाटेवरून उठेना ! आपलें घर ती सोडीना ! आपल्याला फरफटत बाहेर ओढून काढावें, आपलें प्रेतच बाहेर न्यावें, असा तिनें अखेरचा आग्रह धरिला ! ती घट्ट डोळे मिटून पडली !

रखमानें पुष्कळ सांगितलें, सदोबानेंही तिला पुष्कळ विनविलें, पण तिचा हट्ट कमी होईना !

आसुरी मार्ग योजावे लागले, तरी हरकत नाही; कायद्याचा मान राखला गेलाच पाहिजे, असें जप्तीस आलेल्या अधिकाऱ्याचें मत होतें. त्यांनीं त्या आग्रही स्त्रीच्या वाटेस न जातां दुसराच निर्वाणीचा मार्ग चोखाळ-ण्यास सुरुवात केली !

त्यांनीं ती झोंपडी म्हणा किंवा तें घर म्हणा उध्वस्त करण्याचें ठरविलें. घराचें छप्पर उघडें झालें. भिंती पडल्या. आतां मात्र रखमास राहावेना.

तिनें रंगीस उचललें. तिच्या विरोधास न जुमानतां तिनें तिला आपल्या पाठकुळीस बांधलें.

रखमानें जवळच असलेल्या आपल्या शेतातील झोंपडींत तिला नेलें. तेथें तिला खाटेवर निजविलें.

सावळयाच्या झोंपडींतच—त्याच्या घरांतच—आपला प्राण गेला पाहिजे, अशी रंगीची इच्छा अशा प्रकारें रसातळास गेली !

तिनें दोन दिवस डोळे उघडले नाहींत ! अन्नास स्पर्श केला नाही ! ती सावळयाचें चिंतन करीत होती ! मृत्यूची वाट पाहात होती !

पण मरण येणें ही गोष्ट कोणाच्या हातची थोडीच आहे ? दोन दिव-सांनीं रखमानें प्रेमानें पाजलेला गाईच्या दुधाचा घोट तिला घ्यावाच लागला !

त्या वेळीं ती रखमाच्या मांडीवर लहान बालकाप्रमाणें किती वेळ तरी पडून होती.

तिच्या मस्तकावर रखमाचा अश्रूंचा अभिषेक चालला होता.

संकटें किंवा दुःखें येऊं लागलीं कीं, त्यांची एकामागून एक रांगच लागते ! रंगीच्या पाठीमागे दुःख हात धुवून लागलें होतें !

रखमाच्या झोंपडींत तिला कांहीं दिवसांनीं थोडें बरें वाटूं लागलें. सदोबांनीं आपली झोंपडी घरासारखी मोठी केली. त्यांनीं गांवांतील आपला सारा पसारा तेथेंच आणला. जनावरांचा मोठा गोठा तेथेंच बांधला.

त्यांनाही पण त्या ठिकाणीं बरें वाटूं लागलें. आपलें शेतकाम आणि भजन ह्याच्यात त्यांचा सगळा वेळ जाई. रंगीला भजन ऐकविण्यांत आपण पुण्यकृत्य करीत आहोंत, असें त्यांना वाटे. ते मोकळ्या वेळांत रंगीच्या संनिधच असत.

रखमा ही बाजारहाट, येणेंदेणें, औषधपाणी वगैरेचा व्याप पार पाडी. सदोबाला तें कांही करावें लागत नसे !

अशा स्थितींत त्यांचा काळ बरा चालला असतां, त्यांच्यापुढें एक भयंकर बातमी वाट चालून आली !

एके दिवशी भर दुपारच्या वेळीं सखी धांवत धांवतच सदोबांच्या झोंपडीकडे आली.

तिचें मुख म्लान झालें होतें. तिनें सारखा डोळ्यास पदर लावला होता !

झोंपडीत येतांच ती रखमाच्या जवळ गेली.

तिची रडवी मुद्रा पाहून रखमा म्हणाली—

"सखे, काय झालें ? रडतीस कां अशी ?"

सखीच्या तोंडांतून शब्द निघेना.

रखमा अधिक कावरीबावरी झाली, आणि अगदी त्रासल्यासारखी बोलली,

'बोल बाई, सखे कांहींही सांग ! आतां वाईट ऐकण्याचं राह्यलंय तरी काय असं ! सगळे धिंडवडे निघाले ! —"

सखीला आतां बोलल्याशिवाय गत्यंतर नव्हतें. ती अडखळत आणि रडत रडत म्हणाली—

"काल पानगांव जवळच्या डोंगरांत गोळीबार झाला म्हणतात ! पुष्कळ लोकांना गोळ्या लागल्या ! —"

सखी थांबली. तेव्हां रागानें रखमानें तिच्याकडे पाहिलें आणि ती म्हणाली--,

" सांग बाई काय वाईट सांगायचं तें लवकर सांगून टाक कशी !--"

" सावळयाला गोळी लागली म्हणतात ! त्याचं प्रेत दंगेखोरांनी उचलून नेलं म्हणतात ! कोणाच्या हातीं तें लागलं नाहीं ! भुजंगरावानं त्याकरितां पुष्कळ खटपट केली म्हणतात--"

रखमाला ही बातमी खरी वाटली. तिला मागचापुढचा विचार कांहीं राहिला नाहीं. तिनें सावळ्याकरितां आकांत सुरू केला.

रगीच्या कानांवरही ही हकीकत गेलीच ! तिच्या शोकास पारावार राहिला नाहीं !

मात्र सदोबा तसेच निश्चल होते. ते विचारपूर्वक मनांत ह्या बातमीची छाननी करीत होते. त्यांची शांत वृत्ति अद्यापि ढळली नव्हती !

* * *

इतक्यांत सोसाट्याचे वारे सुटले. बागेंतील झाडांच्या फांद्या कटाकट मोडूं लागल्या. मोठमोठे वृक्ष मुळासकट हलूं लागले !

ह्या सोसाट्याच्या वाऱ्यास पुढें भयंकर वादळाचें रूप आलें. गांवांतील घरांवरील पत्रे दूर दूर उडून जाऊं लागले ! पुष्कळ वृक्ष उमळून पडले !

गुरें, माणसें ह्याचें जीवित धोक्यांत आलें ! आपलीही झोंपडी उडून जाते की काय, अशी धास्ती सदोबांना वाटू लागली !

त्यांनीं फक्त मनानें देवाचा धांवा चालविला होता !

चमत्कार म्हणा, नाही तर दुसरें कांहीं म्हणा, हे वादळी वारे सदोबांच्या झोंपडीच्या बाजूनें आले नाहींत. ते गांवाच्या बाजूचा आणि त्याच्या सभोंवतालच्या भागाचा अनर्थ उडवून थोड्या वेळांत पार निघून गेले !

सदोबा भानावर येऊन म्हणाले,

" अग, ए ! सावळ्या गोळीबारांत मेला नाही खास ! मी सांगतों, ऐक माझं ! वादळांतून आपण वांचलों, तसा तो गोळीबारांतून वांचलाच असला पाहिजे !--"

## आफ्रिकेंतील वादळ !  १७

आंबेगांवीं जो भयंकर अत्याचार अचानक घडून आला, त्याच्या मुळाशीं सावळ्याच असला पाहिजे, अशी लोकांत भूमका उठलेली होती खरी. पण तींत सत्यता कितीशी आहे, ह्याचा विचार कोणींच करीत नव्हते.

खेड्यापाड्यातील लोकांच्या तोंडी असल्या भुमका किंवा कंड्या पसरल्या, म्हणजे वाघ्याचें भूत होण्यास वेळ लागत नाही ! त्यांना आपापल्या जवळपासच्या गांवातील लोकाव्यतिरीज इतरांची फारशी कल्पना नसते. मुंबईंत कांहीजण मजुरीकरितां जात असले, तरी तें काम करीत असलेली गिरणी किंवा गोदी यांच्या बाहेर त्यांची दृष्टि फारशी जात नसते. मात्र हे लोक परत गांवीं आले, म्हणजे तिकडील माहितीच्या अशा कांही गप्पा सांगत असतात की, लोकांनी त्या ऐकतांना अगदीं गुग होऊन जावें !

महायुद्धाच्या बातम्यांच्या कंड्याही अशाच चमत्कारिक पद्धतीनें पसरतात !

सावळ्याच्या पराक्रमाच्या कथा मुंबईकडे जाणाऱ्या लोकांनीं तिकडे अशाच बेफाट पसरविल्या होत्या ! त्यांत मन्या, खाशा, बजा वगैरेच्या नांवाचा उल्लेख येत असेच !

लोकांच्या ह्या संकुचित वळणास चालू महायुद्धापासून कांहींशी कलटी मिळाल्याचें कांहीं कांहीं ठिकाणीं दिसून येऊं लागलें आहे, खरें !

सैन्यांत शिरलेल्या कित्येक लोकांनीं साता समुद्रापलीकडील देश

पायाखालीं तुडविले आहेत. त्यांना जगाचा नवा नवा अनुभव आला आहे कांहींना फरान्सची रणभूमि पाहातां आली. वैमानिक युद्धाचे नवे अनुभव कांहींच्या डोळ्यांखालून गेले. आणि नवी नवीं शस्त्रास्त्रें, युद्धांतील नवे नवे अजब शोध ह्यांकडे त्यांची दृष्टि आपोआपच जाऊं लागली.

ह्या सैन्यांतील जे लोक परत रजेवर आले, त्यांनीं सांगितलेल्या अद्‌भुतरम्य कथांनीं लोक भारून गेले. युद्धांतील संकटांकडे दुर्लक्ष होऊन वीरांच्या गुणांचें कौतुक होऊं लागलें ! अशा प्रकारें खेड्यांतील खेडवळ लोकही जगाकडे कुतूहलपूर्वक पाहूं लागले.

रोज रोज युद्धाच्या ताज्या ताज्या बातम्या ऐकण्यास मिळाव्या, म्हणून लोकांची एकसारखी धडपड चाललेली असते. कसल्याही फाटक्या तुटक्या वर्तमानपत्राचा युद्धाची बातमी असलेला कपटा त्यांना बहुमोलाचा वाटतो !

अशा वर्तमानपत्रांतील मराठा सैन्यानेंही मोठमोठे पराक्रम गाजविल्याचीं वर्णनें आतां लोकांच्या कानावर जाऊं लागली आहेत. हे पराक्रम बहुधा आफ्रिकेंत चाललेल्या युद्धांतील होत.

पण युद्धांतील सर्वच वर्णनें वर्तमानपत्रांत प्रसिद्ध होत असतात असें नाहीं. पुढें वर्णिलेला प्रसंग अशाचपैकी आहे. हा प्रसंग चिकित्सक लोक काल्पनिक आहे, असें म्हणतील देखील ! पण लोक कांहींही म्हणेनात, ही हकीकतच अशी आहे कीं, ती कोणाच्याही मनास चटका लावून सोडल्याशिवाय राहणार नाहीं !

उत्तर आफ्रिकेंतील समरभूमीवरील हा प्रसंग आहे. दोस्तांचें सैन्य तोब्रूक जिंकून ट्यूनिशियाच्या वाटेवर असतांना घडून आलेली गोष्ट आहे ही !

आफ्रिकेंतील लिबियाचा हा दक्षिण भाग म्हणजे अफाट असा वाळवंटाचा सागरच आहे. त्यांत मधून मधून कांहीं उंचवटे आढळतात, पण ते देखील वाळूच्या टेकड्यांचे होत ! ह्या प्रदेशाच्या दक्षिण भागीं तर प्रचंड महासागराप्रमाणें सहाराचें वाळवंट पसरलें आहे ! ह्या रखरखीत वाळवंटांतून उन्हाळ्यांत दिवसां होणारा प्रवास म्हणजे तापलेल्या तव्यावरून चालून जावयाचें दिव्यच होय !

वाटेंत कोठेंही मनुष्य आढळावयाचें नाहीं. जनावराचेंही नांव नको. पाण्याचा शोध करावा, तर मृगजळाचा होणारा भास तेवढा दृष्टीपुढें

यावयाचा ! असा हा प्रदेश म्हणजे दुष्ट माणसाच्या करुणारहित रखरखीत अंतःकरणाचा नमुना होय ! मात्र अशाही दुष्टांच्या हृदयांच्या कोणत्या तरी कानाकोपऱ्यांत कोमल भावनेचा अल्पसा ओलावा आढळतो, त्याप्रमाणें ह्या वाळवंटांतून उंटावरून प्रवास करणाऱ्या अरबांच्या व्यापारी टोळ्या क्वचित् आढळतात ! आणि त्याहीपेक्षां नवलाची विशेष गोष्ट म्हटली म्हणजे, कोठें कोठें अत्यल्प प्रमाणांत अगदी छोटचा क्षेत्राचे ओलाव्याचे प्रदेशही दिसून येतात !

त्या प्रदेशांत खोलखोल कां होईना, विहिरी, बुटकीशीं खजुरीचीं झाडें आणि थोडी मनुष्यवस्ती आढळते !

अशा रणभूमीवरून शेंकडों मैलांचा प्रवास करून दोस्तांना ट्यूनिशियाची हद्द गांठावयाची होती. ह्याच युद्धांत मराठा सैन्य मोठ्या मर्दुमकीनें लढत होतें.

ह्या वाळवंटांतून बहुधा दिवसां सैन्य कूच करीत नसे. त्यांचा प्रवास रात्रीच्या थंडगार वेळी होई.

अशी यांत्रिक दलाची एक तुकडी तोब्रुकच्या दक्षिणेच्या वाळवंटांतून चांदण्या रात्रीं कूच करीत होती.

त्या तुकडीतील सैनिकांत मुख्य भरणा मराठा सैनिकांचा होता. सुमारें अर्ध्या अर्ध्या मैलांच्या अंतरावरून आघाडीच्या चार पांच मोटारी चाललेल्या होत्या. त्या पथकाबरोबरच्या सरदार कर्तारसिंग नांवाच्या हिंदी अधिकाऱ्याची छोटी मोटार पुढं चालली होती.

रात्रीच्या प्रशांत वेळीं आकाशांतील चंद्र आणि चांदण्या ह्यांच्या-खेरीज ह्या सैन्याकडे कोणीही दृष्टिक्षेप करीत नव्हता ! शत्रूची वैमानिक हालचाल तर त्यावेळीं मुळींच नव्हती. सैनिकांजवळ खाद्यपेयांची रेलचेल होती. हवेंतील गारठा सौम्य होता. सैनिक मोठ्या आनंदांत होते. हंसत खेळत गप्पा मारीत ते कूच करीत होते.

एका मोटारींत सारे मराठा सैनिक होते. त्यांतील एक सैनिक नुकताच रजेवरून परत आला होता. तो तऱ्हेगांव भागाचा होता. तो त्या बाजूच्या गंमती गंमती आपल्या बरोबरच्या सैनिकांना सांगत होता. पुढच्या बाजूस बसलेला जमादार राणोजी शिर्के हाही त्या गोष्टी लक्षपूर्वक ऐकत होता.

त्या सैनिकानें सर्वांनाच कुतुहल वाटेल, अशी एक गोष्ट सांगितली त्यांतच भुजंगराव देशमुखांचा संबंध आला !

एका सदगुणी मुलीचें नव्या पद्धतीनें एका शूर मराठ्याशीं लग्न झालें असतां, ह्याच भुजंगरावानें तिच्या रूपास भुलून पुन्हा तिच्याशी लग्न लाविलें, ही ती गोष्ट होय.

त्याच्या दृष्टीनें घडून आलेली ही वाईट हकीकत सांगून तो म्हणाला--

"पाहा बरं, किती दुष्ट माणूस हा ! --"

सर्व सैनिकांना आश्चर्य वाटलें ! जमादार राणोजी शिर्के ह्याच वेळीं झीट येऊन खालीं पडला. त्यामुळें एकदम मोटार थांबवावी लागली.

जमादार उमदा गोड तरुण होता. त्याच्यावर साऱ्यांचें प्रेम होतें. त्याची शुश्रूषा जो तो करूं लागला.

पाहाटेची वाऱ्याची झुळूक सुरू झाल्याबरोबर जमादार सावध झाला.

सर्व कांहीं ठीक आहे, अशी खात्री झाल्यावर ती मोटार पुढें चालू झाली. मध्यंतरीं गेलेल्या वेळामुळें मोटारीचा वेगही वाढविण्यांत आला.

त्यामुळे मोटारीच्या दोन्ही बाजूंस जोरानें धूळ उडूं लागली. मोटारीच्या मागील बाजूस तर वादळासारख्या धुळीचा लोट उत्पन्न होत असलेला त्या चंद्रप्रकाशांत अंधुक अंधुक का होईना, मागे पाहाणाराच्या नजरेस येत होता !

आमचा जमादार शुद्धीवर आला, तरी त्याच्या मनांत अशीच मागील कालाच्या विचारांची वावटळ जोराने उठली होती. त्या शिपायाने सांगितलेली हकीकत पुन्हा मनांत आल्याबरोबर त्या वावटळीचें भयंकर वादळच त्याच्या अंतःकरणांत उत्पन्न झालें !

त्यामुळें तो मधून मधून दांतओठ खाऊं लागला ! हातपाय आपटूं लागला ! त्याच्या कपाळास पडलेल्या आठ्या अगदी भुवयास चिकटेपर्यंत ताणल्या गेल्या !

त्याची ही विलक्षण अवस्था पाहून जवळच्या लोकांना त्याला वाताचा झटका आला आहे, असेंच वाटलें !

आतां अगदीं उजाडण्याची वेळ आली होती. आणखी तीस पसतीस

मैल अंतर तोडलें, की तेथें गरमगरम चहा आणि गोड गोड बिस्किटें त्या सैनिकांना मिळावयाचीं होतीं. मोटार जलदीनें चालली होती.

शत्रुसैन्याशी झटापट करण्यास सारे सैनिक उत्सुक झाले होते.

पण त्या ओसाड वाळवंटांत शत्रूचें सैन्य समोरासमोर लढण्यास येतें कशाला ? शस्त्रास्त्रांच्या जोरावर त्याचे डावपेंच दुरूनच चाललेलें असावयाचे !

जमादाराच्या मनांत असल्याच विचारांचें थैमान चाललेलें होतें, तो मनांत म्हणू लागला—

" भुजंगरावांचे भयंकर डावपेंच जर्मन शत्रूप्रमाणेच झाले तर ! पण रंगी देखील अशी बेइमान कशी व्हावी ?—"

बिचाऱ्या रंगीच्या असहाय स्थितीची कल्पना आमच्या जमादाराला हजारों मैल दूर अंतरावर कशी येणार ?

इतक्यांत शत्रूची विमानें आकाशांत दिसूं लागलीं. त्यांची संख्या वाढूं लागली. सर्व प्रदेश त्यांनी घेरला. खालपर्यंत येऊन यांत्रिक दलाच्या तुकड्यांवर हीं विमानें बॉबचा वर्षाव करूं लागलीं ! त्यांच्याशीं सामना देण्याकरितां टेहळणीवर असलेलीं शाही विमानेंही आलीं. पण तीं संख्येनें त्या वेळीं फार अल्प असल्यामुळे त्यांचा धुव्वा उडाला ! शत्रुविमानांचा एक भयंकर बॉंब जमादाराच्या मोटारीवर पडला ! तिचा चक्काचूर झाला. पण जमादार त्या झटक्यानें दूर फेंकला गेल्यामुळें तो फक्त वांचला !

जमादाराला वाटलें—

" आपल्यावरच बॉंब पडून आपण मेलों असतों तर, ह्या मानसिक यातनांतून तरी सुटलों असतो !—"

जमादारानें वाळूत एका बाजूस पडलेल्या आपल्या मोटारीकडे पाहिलें, तिच्या चिंधड्या उडालेल्या त्याला दिसत होत्या.

तींतील लोकांपैकीं कांहीं ठार झाले होते. पण कांही अखेरच्या यम-यातनेंतून अद्यापि पूर्ण सुटले नव्हते. जमादारास कर्तव्यजागृति झाली. त्या लोकांच्या दुःखापुढें तो आपलें दुःख विसरला आणि जखमी लोकांच्या मदतीस धांवला.

शत्रूनें केलेल्या हल्ल्याचा भयंकर निर्दयपणा त्याच्या डोळ्यांपुढें होता.

वाळवंटांतील उजाड प्रदेशाकरितांच हें युद्ध चाललें आहे ना ? ही जीवित-हानी त्याकरितांच ना ? स्वार्थाच्या मुशींतून निघालेल्या तप्तरसानेंच सैनिकांची ही अखेर होत आहे ना ? असे किती तरी प्रश्न त्याच्या डोळ्यांपुढें उभे राहात होते !

आणि आपली देखील आजची दुःखद स्थिति यःकश्चित साखरगोटीच्या क्षुल्लक तंटयामुळेंच झाली ना ? असाही प्रश्न त्याच्या मनापुढें उभा राहिला.

नंतर तो मनांत म्हणाला––

"मोठा असो किंवा छोटा असो तंटा उत्पन्न होण्याचें मूळ कारण स्वार्थ होय ?"

जमादारापासून जरा दूर अंतरावर असलेले सुभेदार मेजर कर्तारसिंग ह्याची अशीच दुर्दशा झाली होती. तो सुदैवानें वांचला होता. त्याची मोटार नादुरुस्त झाल्यामुळें तो मदतीची वाट पाहात होता.

दुपारचे बारा वाजून गेले, तरी मदत आली नव्हती. जमादार आपलें कर्तव्य करीतच होता.

दोन तीन वाजण्याच्या सुमारास वाळू भयंकर तापली. तहानेनें शोष पडू लागला. जखमी लोकांच्या तोंडांत पाणी घालतां घालतां जमादाराच्या नाकीं नऊ आले !

त्या वेळीं आणखी एक भयंकर आपत्ति वाट चालून पुढें येत होती !

सुभेदार मेजर कर्तारसिंग ह्याच्या लक्षांत ती गोष्ट आली. ते शक्य तितकें निशाण उंच करून जिवंत असतील, त्यांना इशारा देत होते.

तो वरचेवर दुर्बिणीनें दक्षिणेकडे पाहात होता. देशावर पावसा-ळ्यांत जशा दिशा धुंद झालेल्या दिसतात, तशी स्थिति दक्षिणेच्या बाजूस दिसूं लागली. पाऊस जसा जोरानें पुढें सरकत येत असतो, तसाच कांहींसा प्रकार अगदीं दूरदूर दिसत होता !

पण तो पाऊस नव्हता ! तें वाळूचें वादळ होतें ! सुभेदार मेजरनीं इशारा दिला, त्यास अनुसरून जमादार जलदीनें त्यांच्याकडे गेला. सुभेदार मेजर वादळाच्या प्रतिबंधक साधनानिशीं सिद्ध होते. झटकन दोघांनीं तोंडावरून आवरण घेतलें. ते योग्य जागीं खालीं पडून राहिले.

वादळ फक्त पांच दहा मिनिटेंच होतें. पण त्यांनीं जेव्हां वर तोंड

उचलून मागे वळून पाहिलें. तेव्हां त्यांना तेथे वाळूची लहानशी टेकडी झाल्याचें दिसून आलें !

तीं प्रेतें व जखमी लोक त्या ढिगाऱ्याखालीं गडप झाले होते !

सुभेदार मेजर आणि जमादार यांना तें वादळ फक्त चाटून गेलें. ते दोघे जिवंत राहिले, हाही विलक्षण योगायोगच होय !

## वैमानिक मदत

## १८

लिबियाच्या वाळवंटामध्ये संकटांत सांपडलेले जमादार म्हणजे तो सावळयाच्च होय, हें आतां निराळे सांगण्याची जरूरी नाहीं. मात्र त्याचे सैन्यांतील नांव राणोजी शिर्के असें होते.

राणोजी शिर्के आणि सुभेदार मेजर सरदार कर्तारसिंग हे दोघे त्या वाळूच्या समुद्रांत मदतीची वाट अत्यंत आतुरतेनें पाहात होते. त्यांना त्या दिवशीं मदत येऊन पोहोंचली नाही. कारण, सबंध दिवसभर जिकडे तिकडे वाळूंतील वादळानें कहर उडवून दिला होता !

आणखी एक दिवस असाच काळजीत गेला. असे दोन दिवस सरदार कर्तारसिंग आणि राणोजी ह्या दोघांचा रात्रदिवस एकत्र सहवास झाल्यामुळें त्यांना एकमेकांबद्दल चांगला आपलेपणा वाटू लागला.

रात्रीच्या वेळीं ते दोघे आकाशाकडे पाहात पडले होते. त्या दिवशी पिठासारखें शुभ्र चांदणें पण होतें. दिवसाचा उष्मा कमी होऊन हवेंत व वाळूंत छानसा गारवा आला होता.

सरदारांना आकाशांतील ताऱ्यांची चांगली माहिती होती. त्यांनी राणोजीस उत्तरेच्या बाजूस बराच वर दिसणारा ध्रुवाचा तारा दाखविला. सप्तर्षि दाखवून त्यांचीही माहिती दिली. वसिष्ठाच्या ठळक ताऱ्याजवळचा अंधुकसा दिसणारा अरुंधतीचाही तारा त्यांनी त्यास दाखविला. त्याबरोबर सावळयाला रंगीची एकदम आठवण झाली !

आपल्या बोलण्याकडे राणोजीचें लक्ष नाहीं, ही गोष्ट सरदारांच्या तेव्हांच लक्षांत आली, म्हणून ते हंसत हंसत म्हणाले—

"काय! जमादारसाहेब! तुम्हांला घरच्या मंडळीची आठवण झाली वाटतं? लग्न होऊन किती दिवस झालेत?"

ह्याही प्रश्नाकडे राणोजीचें लक्ष गेलें नाही. तो आपल्याच दुःखी विचारांत मग्न होता. म्हणून सरदारांनी राणोजीच्या खांद्यावर हात ठेवून सहानुभूतीच्या स्वरांत म्हटलें--

"सैन्यांत घरच्या आठवणी काढून चालत नाही, राणोजीराव! तशा आठवणी झाल्या की, जिवाजी भीति वाटूं लागते. सडे फाटगाला तसली भीति वाटत नाही! माझंच पहाना, मी चौदा पंधरा वर्षे सैन्यांत आहे, पण सडाफटिंग असल्यामुळे मी अगदी निर्भय आहे! म्हणूनच तर सैन्यांत भराभर वरच्या जागा मिळवीत चाललों आहे!"

सरदारसाहेब शीख असून ते मराठीही चांगले बोलतात, ह्याचें नवल वाटून राणोजी त्यांना म्हणाला--

"सरदारसाहेब, आपण पंजाबातले ना? मग तुम्ही मराठी बोलण्यास केव्हां शिकलां?"

सरदारसाहेबांचें उत्तर अगदी तयार होतें. ते म्हणाले--

"आमची वस्ती मोंगलाईतील नांदेड, परभणी ह्या बाजूस बरीच आहे. आमची तिकडे धार्मिक पवित्र स्थानें आहेत. आमच्या पुष्कळ पिढ्या तिकडे गेल्या आहेत. आमच्यांपैकीं कांहीची मातृभाषा देखील मराठी आहे. राणोजीराव तुम्ही तिकडचे शिर्के ना? निदान तुम्ही त्या बाजूचे म्हणून सैन्यांत नांव दाखल केले आहे! मग तुम्हाला आमची ही माहिती ठाऊक असावयास पाहिजे की!--"

राणोजी जरा गोंधळला आणि काहीं तरी उत्तर दिलें पाहिजे, म्हणून म्हणाला--

"सरदारसाहेब! मला कांही तितकीशी माहिती नाहीं तिकडची!-"

"मग तुम्ही मूळचे मोंगलाईतील नाहीत तर! मला वाटलंच होतं तसं!--"

ह्या वेळीं सरदारांच्या आवाजांत जारत मृदुपणा आला. त्यांना अधिक बोलवेना. थोडा वेळ ते थांबले. नंतर म्हणाले--

"घाबरण्याचं कारण नाहीं, राणोजीराव! तुमच्यासारखे नांव

बदलून पुष्कळ लोक सैन्यांत शिरले आहेत ! कांहीं काळजी करूं नका. माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत तुम्हांस भिण्याचें कारण नाहीं ! —"

आणि सरदारसाहेब राणोजीकडे बारकाईनें पाहूं लागले. बऱ्याच वेळानें ते मृदु शब्दांत बोलले —

" मग तर, तुमची खरी हकीकत सांगतां का मला ? मुळी भिऊं नका—"

राणोजी थोडा वेळ घुटमळला; नंतर उसना आव आणून धिटाईनें बोलूं लागला—

"आपला गैरसमज झाला आहे, सरदारसाहेब ! मी मूळचा नळदुर्गचा ! पण नांदेडच्या बाजूस आमचे आप्त आहेत, तिकडे सहज गेलों होतों ! तेथेंच दोन अडीच वर्षांपूर्वीं केलं नांव दाखल सैन्यभरतींत झालं ! —"

सावळ्याच्या बोलण्यांतील लटपट सरदारसाहेबांच्या लक्षांत चांगली आली. राणोजीरावाची मुद्रा ते दिवसभर न्याहाळीत होते. त्यांना कसला तरी दाट संशय आला होता. त्यांना महाराष्ट्रांतील पुष्कळ ठिकाणांची माहिती होती. राणोजी सांगत आहे ती हकीकत त्यांची खात्री पटवीत नव्हती. दुसऱ्या कोणत्या तरी भागाचा राणोजी असावा, असें त्यांना वाटत होतें.

सरदारसाहेब उठून बसले आणि ते राणोजीकडे सहानुभूतीनें पाहूं लागले. त्याबरोबर राणोजीही चटकन उठला आणि तो सरदारांच्याकडे काकुळत्या मुद्रेनें पाहूं लागला !

उभयतांच्या मुखांवरील भाव एकमेकांना चांगलेसे दिसत नसले, तरी त्यांचीं स्नेहानें ओथंबलेलीं अंतःकरणें बोलकीं झालीं होतीं. सरदार-साहेबांना आपली खरी हकीकत सांगितली, तर ते आपल्या सुटकेचा मार्ग देखील दाखवितील, असें वाटल्यामुळें राणोजी बोलण्यास आरंभ करणार, तोंच सरदारसाहेबच म्हणाले—

" तुम्ही आंबेगांवच्या साळुंख्यांच्या घराण्यांतील आहांत का ?—"

सरदारांच्या ह्या प्रश्नामुळें त्यांना आपल्याविषयीं पूर्ण माहिती कळली आहे, असें राणोजीस वाटलें. इतक्यांत सरदार म्हणाले,

" राणोजीराव आतां सांगा बरें तुमची सारी हकीकत ! —"

त्या वेळीं सावळ्याचें अंतःकरण भरून आलें. त्याला सरदारांविषयीं

विलक्षण आदर वाटू लागला. आणि तो आपली हकीकत कसलेही आढेवेढे न घेतां मनमोकळेपणानें सरदारांना सांगू लागला.

त्यानें लहानपणची स्वतःची हकीकत सरदारांना प्रथम सांगितली. नंतर क्रमाक्रमानें साखरगोटीच्या तंटयाची, रंगीच्या प्रेमाची, पोलिसांच्या वॉरंटाची, मन्याच्या टोळीत प्रवेश झाल्याची आणि अनेक गुन्हे केल्याची जुजबी हकीकत सांगून रामलिंगच्या धर्मशाळेंतून निसटून गेल्यानंतरची हकीकत जरा विस्ताराने सांगण्यास सुरुवात केली. तो म्हणाला—

"मी रामलिंग सोडून मोंगलाईत प्रवेश करीपर्यंत माझ्या अंगावर पोलिसाचा वेष होता. नंतर मी गोसाव्याच्या वेषानें मोंगलाईतून कांही दिवस हिंडलों.

माझा पहिला विचार असा होता कीं, प्रथम तुळजापूरच्या देवीचें दर्शन घ्यावें आणि गुप्तपणे आंबेगांवचा मार्ग धरावा. तेथें रंगीला भेटावें आणि तिला गुपचूप बरोबर घेऊन पुन्हां मोंगलाईत आणावें. नंतर नांव बदलून मोंगलाईतच उद्योगधंदा करून सुखानें राहावें.

पण तसें मला सुखाने राहूं देण्याचें देवीच्याच मनांत नव्हतें, सरदारसाहेब ! —"

"देवीनें प्रसाद उलटा दिला कीं काय राणोजीराव ?"

सरदारांनी मध्येच दुःखपूर्ण स्वरांत विचारलें.

"देवीच्या प्रसादाचा येथें कांहीं संबंध नाही सरदारसाहेब," राणोजीराव आपली पुढची हकीकत सांगूं लागला. "मी तुळजापूरच्या देवीचें दर्शन घेतलें. तिची मनोभावें प्रार्थना केली आणि देवळाबाहेर पडलों.

मी कांहीं दारोदार भिक्षा मागत नसे. माझ्याजवळ भरपूर पैसा होता. मी धर्मशाळेंतील एक बंदिस्त खोली रखवालदारास पैसे देऊन मिळविली होती. माझ्या इतमामाच्या राहाणीमुळे माझ्या हालचालीवर चारचक्षूंची नजर सुरू झाली ! ही गोष्ट मला लवकर समजली नाहीं ! माझ्याबरोबर मन्या असता, तर त्यानें तें तेव्हांच ताडलें असतें !

एके दिवशी एक मुसलमान पोलिस अधिकारी रात्रीं मला पकडण्याकरितां त्या धर्मशाळेंत आला. मी इंदूरकडील एका श्रीमंत गोसाव्याचा चेला आहे, मला गुरूच्या आज्ञेनेंच एक वर्षभर असेंच क्षेत्रोक्षेत्रीं फिरावयाचें

आहे, अशी मी त्याच्याजवळ पुष्कळ बनावणी केली ! पण त्या अधिकाऱ्याचें त्यामुळें समाधान होईना !

माझ्यावर कोणता आरोप आहे, हेही त्या अधिकाऱ्यास सांगतां येईना. म्हणून मी त्या अधिकाऱ्याशी दोन हात करून निसटून जाण्याचा विचार मनाशी पक्का ठरविला !

माझ्याजवळ दोन पिस्तुलें जय्यत होतीच. त्यांपैकी एक पिस्तुल अत्यंत चलाखीने मी झाडलें आणि वायुवेगानें तेथून निसटलों !

पुन्हा वेष पालटला. पहिला ब्रेन बदलला आणि थेट सिकंदराबादेस येऊन सैन्यभरतीत ' गणोजी शिर्के ' अशा नांवाने शिरलों, सरदारसाहेब––"

" पण अद्याप तुम्ही आपलें खरें नांव सांगितलें नाही, आम्हांला––"

सरदारसाहेब गोड भाषेत बोलले.

" आतां कळेलच कीं ते सरदारसाहेब आपल्याला ! माझ्या सुटकेची आपण खटपट कराल, तेव्हां माझं खरं नांव मला कसं चोरून ठेवितां येईल ?––"

गणोजी हंसूं लागला आणि सरदारसाहेबही मनापासून हंसले.

त्या वेळी अगदी उजाडण्याची वेळ येऊन ठेपली. पूर्व दिशा गुलाबी वस्त्र नेसली होती. तिचें स्वागत करावयास तेथे कोंबडे आरवण्यास नव्हते; पक्षीही पण नव्हते; भूपाळ्या किंवा प्रार्थना म्हणणारे त्या दोन व्यक्तीखेरीज दुसरें कोणीदेखील नव्हतें !

पण थोड्याच वेळांत आकाशांत विमानें हिंडूं लागली. प्रथम त्या विमानांची त्यांना शंका आली. पण जसजसा प्रकाश वाढूं लागला, त्या-बरोबर तीं आपलीच शाही विमाने होत, अशी त्या उभयतांची खात्री झाली !

ही वैमानिक मदत आल्यामुळें त्यांची हृदयें आनंदानें फुलून गेलीं !

सरदारांनी वैमानिकांना समजेल अशा खुणा केल्या. त्यापैकी कांहीं विमानें वाळवंटांत उतरलीं. त्या ठिकाणची झालेली दुरवस्था त्यांच्या लक्षांत आणून देण्यांत आली. जे काय करावयाचें तें विमानांतून उतरलेले सैनिक झटपट उरकूं लागले !

सरदार आणि जमादार ह्यांनी आपला सैन्याचा तळ गांठण्याकरितां विमानमार्गे प्रवासास सुरुवात केली.

आदले रात्री त्यानी मनानें आपल्या मायभूमीत म्हणजे हिंदुस्थानांत संचार केला होता. तो मनाचा वेग कसाही झाला तरी शाही विमानांच्या वेगापेक्षां किती तरी पटीनें अधिक होता, हे भर वेगानें विमान चाललें असताही त्या उभयतांच्या लक्षांत आल्याशिवाय राहिलें नाहीं !

## विमानांतून कराचीस

## ११

सरदार कर्तारसिंग आणि राणोजी यांचा लोभ एकसारखा वाढतच गेला. सरदारांनीं राणोजीची शिफारस सैन्यांतील वरिष्ठ अधिकाऱ्याजवळ केली. आणि पुढील टयूनिशियाच्या चढाईत त्याला आपल्या टेहळणीच्या पथकांत मुद्दाम मागून घेतलें.

सरदारांच्या गोड स्वभावानें राणोजीस तर मोहिनीच घातली होती. त्यांच्या निळसर नेत्रांची छाप राणोजीवर पुरी पडली होती. त्यांच्या आज्ञा सैन्यांतील शिस्त म्हणून नव्हे, तर भक्तियुक्त श्रद्धेनें तो पाळीत असे. त्यांचा प्रत्येक शब्द तो प्रेमानें झेलीत असे. त्यांच्या मनांत चाललेले विचार तो त्यांच्याशीं तद्रूप झाल्यामुळें तेव्हांच ताडी. सारांश, सरदार आणि राणोजी हे दोघे जण निकटचे स्नेही किंवा प्रेमाचे आप्त असल्याप्रमाणें वागूं लागले. शीख आणि मराठा ह्यांचा हा ऋणानुबंध हिंदी राष्ट्रीयत्वाचा उत्कृष्ट नमुना आहे, असें उदार मनाचे कांहीं ब्रिटिश अधिकारीही म्हणूं लागले !

त्या वेळीं लिबीयांतून जर्मन व इतालियन सैन्य जलदीनें माघार घेत होतें. आतां ब्रिटिश विमानांची मदत भरपूर प्रमाणांत होत असल्यामुळें ब्रिटिश व हिंदी सैन्यांच्या तुकडया शत्रूचा पाठलाग जलदीनें करीत होत्या. त्यामुळें शत्रुसैन्यास पळतां भुई थोडी होऊन गेली होती !

थोडयाच दिवसांत त्यांनीं टयुनिशियाची सरहद्द गांठली. त्यानंतर त्या देशाचा दक्षिणेकडील वाळवंटाचा खोलगट भाग मागें टाकून सरदारांची मराठा पलटण डाव्या बाजूच्या उंचवटयाच्या भागांत शिरली !

अद्यापि टयुनिशियांत लढणारें जर्मन सैन्य त्यांच्या नजरेस पडलें नव्हतें !

सरदार कर्तारसिंग ह्यांच्याकडे मुख्यतः आपल्या सैन्याच्या पुढील अज्ञात भागाचें टेहळणीचें काम असे! शत्रूच्या कडेकोट बंदोबस्तांतील प्रदेशांत युक्तीनें प्रवेश करून बित्तंबातमी काढण्याचें काम केव्हांही जिवावरचें असतें. आणि त्यांतले त्यांत गैरमाहित प्रदेशांत हें काम करणें अत्यंत दुर्घट होऊन जातें.

तें काम अचूक आणि जलद करण्याची त्या वेळीं अत्यंत जरूरी होती. कारण, टचुनिशियाच्या उजव्या बाजूच्या समुद्रकाठानें हिंदी सैन्यानें बरीच पुढे मुसंडी मारलेली होती. आणि डाव्या बाजूच्या डोंगराळ भागींही हिंदीच सैन्यानें बरीच प्रगति केली होती. यामुळें कोंडींत सांपडून होणारी कत्तल वाचविण्यासाठी शत्रूचें सैन्य एकसारखी माघार घेत होतें! आणि त्यांचाच तर ब्रिटिशांना धुव्वा उडवावयाचा होता!

ज्या प्रदेशांत सरदारांच्या बरोबरीचे बिनीचे टेहळे सैन्य पुढें पाऊल टाकीत होतें, तो प्रदेशही वैराणच होता, त्यांत उंच उंच डोंगर आढळत, पण ते वनस्पतिसृष्टीनें उपेक्षा केलेले असे एकाकी भटक्या गोसाव्यासारखे दिसत! कांहीं ठिकाणीं खुरटचा खजुरी नजरेस पडत, पण त्यांच्याभोंवतीं बहुधा अरब तरुणीच्या बुरख्याप्रमाणें मळकट कांटेरी वृक्षांची जाळी असत!

त्या प्रदेशांत माणसाची वस्ती अगदी तुरळक होती. आणि जे लोक मधून मधून दिसत, ते आपल्याकडील रानटी लोकांची आठवण करून देत!

त्या देशांत प्रथम मूळच्या बर्बर लोकांवर अरबांनीं आक्रमण केलें. नंतर अरब आणि बर्बर त्या दोहोंच्या मिश्रणानें त्या डोंगराळ प्रदेशांत बिनसुधारलेल्या स्थितींत असलेली हल्लींची रानटी प्रजा निर्माण झाली! युरोपच्या संनिध असूनही सुधारणेचा गंध त्यांच्यांत दिसत नव्हता! त्यांचा जुनाच रानटी वेष आणि त्यांची रानटी राहाणी पाहून कोणालाही त्यांची कींवच येई. अत्यंत दारिद्र्यांत पिचत असलेले ते लोक रानटी तरस, चित्ते इत्यादि प्राण्यांची शिकार करून आपला उदरनिर्वाह चालवितात. कांहीं लोक मेंढ्या पाळूनही कशीबशी आपली गुजराण करितात!

ह्या तद्देशीय रानटी लोकांना खाण्याचे पदार्थ भरपूर देऊन त्यांच्याकडून शत्रुसैन्याच्या हालचालीची माहिती सरदार आणि राणोजी मिळवीत! तेही लोक त्यांचें पोटाचें दैवत शांत होत असल्यामुळें वाटेल तें साहस करून

त्यांना बातम्या पुरवीत ! त्यांतील खऱ्याखोटयाची निवड सरदार करीत आणि तावडतोब त्या बातम्या आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांच्या कानांवर घालीत. ह्या कामात सरदारांना होणारी राणोजीची मदत म्हणजे पुराणकाली रामाला मिळणाऱ्या मारुतीच्या मदतीच्या योग्यतेची होती, असेही म्हणता येईल !

एके दिवशी त्या खडकाळ उंचवटयाच्या भागांत सरदार व राणोजी टेहळणी करीत असता बरेच पुढे गेले. वाटेत त्याना शत्रुसैन्याने ठिकठिकाणी बॉंब पुरून ठेवल्याचे नजरेस आले. त्या धोक्याच्या जागा चुकवीत चुकवीत आपल्या बरोबरच्या निवडक लोकांसह लपत छपत ते पुढे चालले होते. त्या वेळी त्याना समोरील टेकडीच्या माथ्यावर कांही जर्मन सैनिक असल्याचें दिसलें.

ती वेळ सायंकाळची होती. ते जर्मन सैनिक मजेने बीर पीत होते !

त्या वेळी जवळपास कोणी शत्रुसैनिक असतील, अशी त्यांना कल्पनाही नव्हती !

सरदारांनी त्या जर्मनांना दुर्बिणीने पाहिले आणि सरदार व राणोजी यानी एका लहानशा उंचवटयाच्या आड खंदकासारखी आपली सोय करून घेतली. त्यांच्या बरोबरच्या सैनिकासही तसेंच करण्याचा सरदारांनी इशारा दिला !

ही हालचाल जर्मन सैनिकांच्या लक्षात येण्यास वेळ लागला नाही ! त्यांनी मशीनगनचा मारा ह्या दबा धरून बसलेल्या लोकांवर तावडतोब सुरू केला ! सरदाराच्या हिंदी लढवय्यांवर त्या गोळ्यांचा नुसता पाऊस पडू लागला ! त्यांचे बहुतेक मदतनीस त्या गोळ्यांच्या टप्प्यांत सांपडून पटापट मरूं लागले ! शत्रुसैन्याच्या प्रखर रणसामुग्रीची कल्पना त्या वेळी सरदाराना चांगली आली !

सरदार आणि राणोजी ह्यांच्यापुढें लहानशी दगडी दरड होती. तिच्याच पायथ्याच्या खंदकांत अगदीं अंग चोरून ते दोघे दबून पडलेले होते ! त्यामुळे ते गोळीबाराच्या टप्प्यांत सांपडले नाहीत. त्यांच्या दिशेनें आलेल्या गोळ्या त्या दगडी दरडीवर आदळून फुटत ! त्या दोघांचा प्राण त्या दगडी दरडीनें वांचविला ! टेहळणीची जागा निवडण्यांतील सरदाराच्या कौशल्यानेंच त्या उभयताचे प्राण वांचले !

मशीनगनचा मारा बंद झाल्यावर सरदार आणि राणोजी यानी त्याच्या हातीं असलेल्या उत्कृष्ट रायफलचा मारा दुस्मनच त्या शत्रुसैनिकावर केला. तो इतका अचूक ठरला की, ते दहा बारा गोरे जर्मन सैनिक तावडतोब जाया झाले! त्यांपैकी कांहीं तात्काळ मरण पावले! असला प्रखर अचूक मार येऊन आपली अशी दुर्दशा होईल, अशी यत्किंचितही कल्पना शत्रूला नव्हती!

त्यानंतर राणोजी आणि सरदार धैर्याने पण सावधपणें पुढें निघाले!

त्यांनी ती शत्रुसैन्याची जागा गाठली आपल्या जवळच्या टॉर्चने त्या रणभूमीची स्थिति त्यांनी नजरेखाली घातली! ते सर्व सैनिक एके ठिकाणीं असल्यामुळे रायफलच्या माऱ्यात ते एकदम सापडले होते! त्यांपैकी कांहीं मेले होते! कांहींच्या अगांत धुगधुगी होती! कांहींना फक्त जखमा झाल्या होत्या!

प्रत्यक्ष हातघाईच्या युद्धांत सरदारांनी हा अपूर्व विजय मिळविला होता!

आपल्या मुख्य सैन्यास योग्य त्या खुणांनी सरदारांनी ती हकीकत कानावर घातली आणि ते दोघे मदतीची वाट पाहात तेथें बसले.

त्या लालबुंद सतेज जर्मन सैनिकांपैकी कांहींच्या अंतकालच्या यातना पाहून दोघांचीं हृदयें हलून गेलीं! सरदारसाहेबांना असले देखावे पाहाण्याचे पुष्कळ प्रसंग आले होते. राणोजीस हा नवीनच प्रसंग होता. तो सरदार-साहेबांना म्हणाला,

"ह्या लोकांची बायकामुलें घरीं तळमळत असतील, नाहीं? अशा निर्जन ओसाड प्रदेशांत येऊन ह्यांनी आपला जीव असा धोक्यांत कां घातला बरें?—"

"ह्याचें कारण यांची महत्त्वाकांक्षा!—" सरदारसाहेब उत्तर देऊं लागले, "त्याला साम्राज्य-तृष्णा म्हणा! पाहिजे तर साम्राज्यशाहीचा लोभ म्हणा! शेकडो मैलांवरून हे लोक ह्या असल्या ओसाड प्रदेशासाठीही झगडण्यास येतात, तें ह्यामुळेच!—"

"पण हा देश तरी कोणाचा? सरदारसाहेब?—"

राणोजीनें उत्सुकतेनें विचारलें.

"हा देश मूळचा येथल्या लोकांचा. नंतर अरबांच्या टोळ्यांनी तो

काबीज केला. फार प्राचीन इतिहास आहे हा. ह्या देशाचा सध्यांचा अरबाचा मुलतान ट्यूनिसला असतोच कीं ! त्याच्यावर ताबा फरेंचांनीं बसविला ! तेच मालक झाले ह्या देशाचे ! आतां नुकतेच जर्मन, इतालियन ह्या देशांत घुसले आहेत ! पुढें ब्रिटिश आणि अमेरिकन ह्या देशावर आपला ताबा बसविणार आहेत ! एवढ्या छोट्या प्रदेशासाठी किती गुतागुत ही ! —"

"लहान किंवा मोठ्या प्रदेशाचा ताबा मिळविण्याच्या स्वार्थाचीं ह्या गोऱ्या लोकांचीं ही भांडणें चालू आहेत !" राणोजी गंभीरपणें बोलूं लागला. "आम्ही क्षुद्र माणसें लहानशा शेतासाठी भांडतो ! एकाद्या झाडासाठीं पण भांडतो ! त्याकरितां एकमेकांचा भयंकर द्वेष पण करतों ! आमच्या गांवी साखरगोटीचं भांडण असंच दोन पिढ्या चाललं आहे, सरदारसाहेब ! —"

तो सरदारांकडे पाहात होता. सरदार त्याची नजर चुकवीत होते. ते एका बाजूस तोंड करून सहज म्हणाले— "सांगा ना का तुमचं कसलं भांडण तें ! मदत येईपर्यंत वेळ तरी गेला पाहिजेच की ! —"

राणोजीनें साखरगोटीच्या तंट्याची सरदारांना अगदीं सविस्तर माहिती सांगितली. ती ऐकून सरदारसाहेबांच्या अंगावर काटा उभा राहिला ! त्यांना तो विषय अप्रिय वाटत असावा, असें दिसत होतें. पण राणोजीला आपलें दुःख ओकण्यानें समाधान वाटत होते. म्हणून तो विस्तारानें बोलत होता. विषय बदलण्याच्या हेतूनें सरदारसाहेब मध्येंच म्हणाले—

"मग तुमचं खरं नांव सावळाराम तर ! आज समजलं आम्हाला ! सावळाराम, जाऊं दे रे तुझ्या साखरगोटीचं भांडण ! कशाला काढतोस तिचं नांव इथं. अरे, 'बळी तो कानपिळी' हा जगांतला न्याय ! ज्याच्या हातीं सत्ता तोच जगाचा मालक ! जगांत खरा न्याय नाही ! सत्य नाही ! कांहीं नाही ! दुर्बळाचा वाली कोणी नाही ! मनगटाच्या सामर्थ्यावर सर्व जग नाचतें आहे, सावळ्या ! —"

सावळ्या शब्द उच्चारतांना सरदारांच्या स्वरांत कंप उत्पन्न झाला होता. शिवाय सावळ्या ह्या शब्दाचा सरदारांनीं केलेला उच्चार त्यास अगदी आपलेपणाचा वाटला. त्या आवाजानें सहजच त्याच्या मनांत एक सुखदायक संवेदना उत्पन्न झाली !

इतक्यांत मदतीकरितां खुद्द ब्रिटिश सैनिकच आले. सरदार आणि

सावळ्या ह्यांनीं गाजविलेल्या पराक्रमाबद्दल त्यांची त्यांनीं फार तारीफ केली. त्या सैन्यविभागाच्या मुख्य सेनापतींची भेट झाल्यानंतर त्यांनी त्या उभयतांशी हस्तांदोलन करून त्यांचा मोठा गौरव केला.

  

ट्यूनिशियांतील पुढील युद्धात तर सरदारसाहेब आणि सावळ्या ह्यांनी आपल्या पराक्रमाची शर्थ केली! जर्मन सैन्याला कोंडींत पकडण्याऱ्या हिंदी सैन्याचें पुढारीपण सरदारसाहेब यांच्याकडे आले होतें. त्यांनी ती कामगिरी जिवावर उदार होऊन पार पाडली! शत्रुसैन्याच्या काही सेनापतींना कैद करून अखेरचा ट्युनिशियाच्या युद्धातील निर्णायक विजय सरदारांच्या सैन्याच्या तुकडीनें प्रामुख्यानें संपादन केला!

शत्रूकडील कित्ती तरी गोरे सैनिक कैद झाले. ह्या गोऱ्यांना पकडून कैदेंत डांबण्याचा पुष्कळसा मान सरदार कर्नारीसग ह्यांना मिळाला. त्यामुळें त्यांना विशेष धन्यता वाटली!

शत्रूच्या सैन्याचा पूर्ण बंदोबस्त करून मित्रराष्ट्रांचें सैन्य ट्युनिशियाच्या "ट्युनिस" ह्या राजधानीत शिरलें. त्यांत सरदार आणि राणोजी हे मोठ्या मानाच्या स्थानी होते. विशेषत. अमेरिकन बातमीदारांनीं ह्यांचे फोटो घेतले. ते आपापल्या वर्तमानपत्रात प्रसिद्धीकरितां पाठविले. त्यांच्या पराक्रमाची कौतुकपूर्ण वर्णनेंही आपापल्या पत्रांत केली.

सरदार व राणोजी जेव्हां ट्युनिसच्या आजूबाजूचा प्रदेश पाहूं लागले तेव्हां त्यांना त्या राजधानीभोंवतालच्या लहानशा खोऱ्यांतील प्रदेश सृष्टि-सौंदर्यानें बहरलेला असावा, असे दिसत होतें. ऑलिव्हच्या, द्राक्षांच्या आणि दुसऱ्या गोड फळांच्या बागा उध्वस्त झाल्या होत्या! सुवासिक पुष्पांच्या बागांचा पत्ता राहिला नव्हता!

शेतकऱ्यांची घरें, झोपड्या, जनावरें तोफांच्या तडाख्यांत सापडून त्या युद्धाच्या धुमाळींत त्यांचा पुरा हैदोसधुल्ला झाला होता! प्रत्यक्ष युद्धापेक्षां युद्धानंतर होणारे परिणाम लोकांना फार जाणवतात. समुद्राच्या भरतीची एकादीच प्रचंड लाट किनारा साफ धुवून नेते. त्या ठिकाणी पूर्वी

काय होतें, ह्याचा मागमूसही तो राहूं देत नाही! त्यापेक्षा किती तरी भयकर परिणाम युद्धाच्या ह्या लाटेने ट्युनिशियात झाले होते!

ट्युनिशियाच्या समुद्रकिनाऱ्यालगतच्या सुपीक आणि सुंदर प्रदेशाची कित्येक वर्षांत भरून येणार नाही, इतकी भयंकर हानि ह्या अल्प काळच्या युद्धानें केली!

मात्र ह्या युद्धांत थोडाबहुत चमत्कार घडून आला तो असा कीं, काळा व गोरा हा भेदभाव पूर्वीइतका दिसत नव्हता. सरदार आणि राणोजी ह्यांचा थाट तेथे युरोपियनांच्या बरोबरीचा होता! बादशहांच्या हस्तें त्यांचा मोठा गौरव व्हावयाचा होता. म्हणूनच त्यांचा मुक्काम काही दिवस त्या राजधानीत पडला होता!

बादशहांनी समक्ष ट्यूनिशियांत येऊन पराक्रमी वीरांचा सन्मान केला! त्यांना पदकें दिलीं! बक्षिसेंही वांटलीं! त्यांत सरदार कर्तारसिंग आणि राणोजी शिर्के यांचा गौरव फार मोठ्या प्रमाणात झाला! त्यामुळे त्यांची कीर्ति जगभर दुमदुमली!

ट्यूनिशियांतूनच सरदारसाहेबांनी आपल्या सेनापतीमार्फत मुंबई सरकारशी गुप्त पत्रव्यवहार सुरू केला होता. तो वैमानिक टपालानें चाले उत्तरें प्रत्युत्तरें बरीच होत होत, शेवटीं सरदारांच्या अपेक्षेप्रमाणे त्यांनी उत्पन्न केलेल्या मुद्यांचा अनुकूल निकाल लागला! त्यामुळे सरदारांना अत्यंत समाधान वाटलें.

गेल्या चौदा पंधरा वर्षांत त्यांनी रजा मुळीच घेतली नव्हती. राणोजीनेंही तर सैन्यांत दाखल झाल्यापासून रजाच घ्यावयाची नाही, असें ठरविलें होतें. त्यानें गेली दोन तीन वर्षे आपलें पूर्ण लक्ष सैन्यांतील शिक्षणाकडेच दिलें होतें. त्याला त्या मुदतीत जितकें शिकता येईल, तितकें तो शिकला होता. क्रमाक्रमाने त्याचे अधिकारही वाढले होते. सर्व अधिकाऱ्यांची त्याच्यावर मर्जी बसली होती!

आतां मात्र सरदारांच्या आग्रहानें त्यानें रजेचा अर्ज केला. सरदारांना व त्याला तीन महिन्यांची रजाही पण ताबडतोब मिळाली.

आपल्याला घरी जाता न आलें, तरी सरदारांबरोबर पंजाबांत जाना

येईल. त्यानंतर महाराष्ट्रांत गुप्तरूपानें हिंडून सर्वांची भेट घेता येईल रंगील्या तर आपण भेटूच भेटू, असें सावळ्या मनाशीं ठरवीत होता

ते दोघे विमानानें हिंदुस्थानांत येण्यास निघाले आपल्या मातृभूमीस परत येण्याचे भाग्य आपल्यास लाभत आहे, ह्याच विचारामुळें त्यांची मनें आनंदानें ओतप्रोत भरून गेलीं.

कराचीस विमानांतून उतरल्याबरोबर मात्र आतां काय करावें. कोठें जावें, अशी काळजीची छटा राणोजीच्या मुखावर दिसूं लागली ! ती पाहा-ताच सरदार त्याला म्हणाले,

" सावळाराम. तुला आतां राजरोस आपल्या घरी जातां येईल, बरं ! मी त्याची तजवीज सरकारकडून अगोदर करून आणली आहे ! "

किती वेळ तरी सावळ्या सरदारांच्या तोंडाकडे नुसता पाहातच होता ! त्याचे डोळे अश्रूंनी डबडबले होते.

सरदारही कांहीं तरी निमित्त करून दुसऱ्या बाजूस पाहूं लागले. त्यांनीही नंतर आपल्या डोळ्यांस हातरुमाल लावला !

## खळवळीची सभा

## २०

राणोजीला आपण जे सांगितलें, त्यामुळें तो अत्यंत आश्चर्यचकित होईल, हें सरदार जाणून होते. ती वेळही तशी जास्त बोलण्याची नव्हती. म्हणून ते तडक मोटारीनें कराचीच्या एका शिखांनीं चालविलेल्या हॉटेलमध्यें उतरण्यास गेले.

त्या दिवशीं सरदार बहुतेक झोंपूनच होते. रणभूमीवरील श्रमानें त्यांच्या शरिरास आलेल्या थकव्यामुळे ते अशी विश्रांति घेत असावेत, असें राणोजीस वाटलें.

पण त्यांच्या शरिराला तशा विश्रांतीची आवश्यकता नव्हती. नाना विचारांनी गोंधळलेल्या त्यांच्या मनाला विश्रांति पाहिजे होती.

त्यांचे गतआयुष्य अशाच कांही विविध घटनानी भरून गेलें होतें. त्याना आई, बाप, बंधु, कोणी नव्हते. राणोजीप्रमाणें त्यांच्यामागे प्रेमपाशही नव्हता.

त्यामुळे त्यांना जगाची फिकीरच वाटत नव्हती. पण राणोजीच्या भेटीमुळे त्यांच्या कठोर स्वरस्वीन अंतःकरणात थोडा ओलावा दिसू लागला !

राणोजी आतां कांही काळ का होईना, आपल्यापासून दूर जाणार. तो आपल्या माणसात जाऊन मिसळणार; त्याच्यावर प्रेम करणाऱ्या माणसांना तो भेटणार; ह्या कल्पनेनें देखील सरदारांना आनंद वाटत होता. त्यांचें हृदय भरून येत होतें. त्यामुळे त्यांना राणोजीशी बोलवत नव्हतें !

आपल्या मनःस्थितीची त्याला कल्पना येऊं नये, आणि त्याचा प्रेमळ सहवास आणखी एकादा दिवस वाढावा, म्हणून सरदार डोळे मिटून पडलेले होते.

शूरांचीं अंतःकरणे रणांगणांत वज्राप्रमाणे कठोर दिसत असली, तरी आपल्यावर प्रेम करणाराविषयीं तीं अत्यंत सुकुमार असतात हेही खरे !

दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं सरदारांनी लवकर उठून स्नान केलें आणि सर्व कराची शहर हिंडून राणोजीस दाखविले.

राणोजी सरदारांच्या बरोबर अगदी यंत्राप्रमाणे चालत होता. सरदारांचा सहवास सोडू नये, असें त्याच्या मनाला वाटे. पण लगेच त्याला एकदम वाटे कीं, आपण आंबेगांवास केव्हां जाऊं आणि रंगीची भेट घेऊं !

पण ह्याच वेळी त्याच्या मनांत झटकन दुसरा विचारही येई; आणि तो त्याला अत्यंत दुःख देई ! रंगीचा विवाह पुन्हा भुजंगरावाशी झाला आहे, त्या ऐकलेल्या वार्तेच्या विचारामुळे त्याच्या मनाच्या शतशः चिंधड्या उडत !

पण तो आपल्या मनाला एक पक्की खूणगांठ बांधून होता कीं, रंगी प्राण देईल, पण बिकट परिस्थितीतील कसल्याही संकटांत ती आपल्याशीं बेइमानी होणार नाही ! आपल्यास जे कांही कळलें, तें अपुरे होतें. पत्र पाठवून त्याचा खुलासा करवून घेण्याच्या स्थितीत आपण नव्हतों. आतां आपली पुरी सुटका सरदारजींच्या कृपेनें झाली आहे. तेव्हां काय घडलें आहे तें आपणास समक्षच दिसेल !

अशा मनःस्थितीत ते दोघे कराचीच्या रेल्वे स्टेशनजवळ आले होते. आगगाडीच्या हालचालीकडे पाहात पाहात फर्स्ट क्लासच्या वेटिंग-रूममध्यें ते शिरले आणि तेथें कांही वेळ विश्रांति घेत बसले.

मुंबईकडे जाणाऱ्या गाडीचें तिकीट राणोजीस काढून द्यावें, असा विचार सरदारजींच्या मनांत घोळत होता. इतक्यांत ते राणोजीस म्हणाले—

"राणोजी, जातो आतां मी अमृतसरला ! माझे आप्त इष्ट मला तेथें भेटतील ! तूं जा आतां थेट आंबेगांवी ! रंगूताईचा जीव तुझ्याकरितां तीळतीळ तुटत असेल, नाही ?—"

रंगीचें भुजंगरावाशी पुन्हा लग्न झालें आहे, ही बाजारगप्प राणोजीनें सरदारांना सांगितली नव्हती ! म्हणून ते अगदी सरळपणें बोलले. आणि राणोजीकडे एकसारखे पाहूं पण लागले ! लगेच त्यांनीं डोळ्याला हातरुमाल लावून आपलें तोंड फिरविलें !

राणोजीस वाटलें, आपल्यावरील प्रेमामुळे सरदारजींचें अंतःकरण भरून आलें आहे.

ते दोघे कांही वेळ बोललेच नाहीत. सरदारजींनी मागविलेले सोडा लेमनचे पेले त्यांच्यापुढे आल्यावर ते भानावर आले. त्या वेळीं राणोजी म्हणाला——

"सरदारसाहेब! प्रथम तुम्ही आमच्या आंबेगांवला चला! रंगीला पहा तरी एकदां! काय सांगूं सरदारसाहेब! तिचे डोळे पण अगदी तुमच्याचसारखे आहेत!——"

सावळ्याच्या ह्या साध्या बोलण्याने सरदाराच्या मनात गडबड उडाली. ती दिसू नये, म्हणून हातांतील पेला टेबलावर ठेवून ते उठले आणि राणोजीच्या खुर्चीजवळ जाऊन उभे राहिले. त्याच्या पाठीवरून हात फिरवीत ते प्रेमळपणें राणोजीस म्हणाले,

"सावळाराम, मग माझ्या डोळ्याकडे पाहून तुला रंगीची आठवण होत होती म्हणायची! तुला मी म्हणजे रंगीच वाटलों, नाही?——"

सरदारसाहेब मोठ्यानें हंसले. राणोजी शरमून गेला, तो नम्रपणें म्हणाला——

"तसें नव्हं सरदारसाहेब! चुकलों मी! मला दिसलं तसं मी बोललो! मी काय मराठा गडी! तसला पाचपेच आम्हां मराठ्यांना नसतो! राग येऊं देऊं नका सरदारसाहेब!——"

"राग येऊं देऊं नका म्हणतोस सावळाराम मला? पण मला राग येणारच!" सरदार हंसत हंसत बोलू लागले. "पण तुझा नाही बरं का? माझा राग माझ्या डोळ्यावरच! हेच निळे डोळे तुला रंगीची आठवण करून देत होते! तुला दुःख देत होते! त्याच डोळ्यांना मी आतां ह्या नव्या काळ्या चष्म्यानं झाकून टाकतों. आतां हा चष्मा मी नेहमी वापरणार, मग तर तुला रंगीची आठवण होणार नाहीं ना?——"

—आणि खरोखरच सरदारांनी त्या वेळेपासून सुंदर फरेम असलेला काळा चष्मा सतत वापरण्यास सुरुवात केली! त्यांचे ते डोक्यावरचे वाढलेले काळेभोर केस, वाढलेली दाढी दोन्ही बाजूंस वळवून घेण्याची पद्धत, भरदार मिशा, रुंद तेजस्वी कपाळ, रेखीव भुवया, जवळजवळ पुरी सहा फूट उंची,

आणि भरदार व दणकट शरीरयष्टि ह्यांना त्या काळ्या चष्म्यानें विशेष गंभीरता आणली ! त्यामुळें सरदारसाहेब अगदी अनोळखी शिखाप्रमाणें राणोजीमही भासले !

इतक्यांत दुसरे शिखी गृहस्थ त्या वेटिंगरूममध्ये आले. सरदारांनीं आपल्या हातावरील घड्याळाकडे पाहिलें, तों बारा वाजून गेले होते. त्यामुळें ते दोघे लष्करी पोशाखांतील ऑफिसर लगेच वेटिंगरूमच्या बाहेर पडले. त्यांच्या खाड खाड बुटांच्या आवाजामुळें आणि पाय टाकण्याच्या युरोपीयन ढबीमुळें प्लॅटफॉर्मवरील सर्वांचें लक्ष त्यांच्याकडे वेधून गेलें असल्यास नवल नाही !

  

राणोजीच्या चिकाटीच्या आणि प्रेमाच्या विनंतीवरून सरदारांनीं प्रथम पंजाबांत न जाता आंबेगावी चलण्याचें कबूल केलें. इतकेंच नव्हे तर, राणोजीनें परवानगी दिली, म्हणजेच आंबेगांव सोडावयाचें, असेही त्यांनीं ठरविलें ! सरदारांचा हा निश्चय कळल्याबरोबर राणोजीला अत्यंत आनंद झाला.

देवाजवळ एक डोळा मागावयास गेलेल्या अंधाला देवानें प्रसन्न होऊन जर दोन डोळे दिले, तर त्या अंधाला होणाऱ्या आनंदाच्या तोडीचा तो राणोजीचा आनंद होता !

सरदार आणि राणोजी कराचीहून थेट विमानानेंच मुंबईस येऊन दाखल झाले. तेथे त्यांनी मोठमोठ्या सरकारी अधिकाऱ्यांच्या भेटीही घेतल्या. राणोजीसही कांही निवडक अधिकाऱ्यांना भेटण्याची संधि मिळाली. गमत अशी की, त्या अधिकाऱ्यांजवळ राणोजीचे लहान लहान फोटो होते. व त्या फोटोशी ते अधिकारी राणोजीचा चेहरा पडताळून पाहात. नंतर त्यांच्याशी हस्तांदोलन करीत !

सरदार आणि राणोजी ह्यांनी ट्यूनिशियाच्या युद्धांत पराक्रम गाजविल्याची वार्ता सर्वत्र कळली होती. हे उभयता वीर तऱ्हेगांवाहून पुढें एका खेड्यांत जाणार आहेत, तेव्हां तऱ्हेगांवी त्यांचा सन्मान व्हावा, असे गुप्त हुकूम तऱ्हेगांवच्या सरकारी अधिकाऱ्यांना गेले होते. त्याप्रमाणें त्यांच्या सत्काराची जय्यत तयारी तेथें सुरू झाली होती !

राणोजी शिर्के ह्या मराठा तरुणाचा सत्कार होणार असल्यामुळे भुजंगरावांनीं तालुक्यांतून दौरा काढून ह्या समारंभाची मोठ्या उत्साहानें तयारी चालविली ! शीख आणि मराठा ह्यांची वीरवृत्ति राष्ट्राला स्वातंत्र्य मिळवून दिल्याशिवाय राहाणार नाहीं, हें भुजंगराव लोकांना पटवीत होते !

गेले कांहीं महिने दंगेखोरांची पाळेंमुळें खणून काढण्याकरितां सरकारनें चालविलेल्या प्रयत्नांस भुजंगरावांची फार मोठी मदत होती. बहुतेक ठिकाणचे दंगेखोर म्हणून मानलेले गुंड पकडण्यांत आले होते. कित्येक ठिकाणीं त्यांना पकडण्याकरितां गोळीबारापर्यंत मजल आली होती. त्यांतील मृत झालेले कांहीं गुंड सरकारच्या हातीं लागले होते. कांहीं प्रमुख पुढाऱ्यांचीं प्रेतें दंगेखोरांनी सरकारच्या हातीं लागूं न देतां ती त्यांनी पळवून नेलीं, असाही बोभाटा होता !

पानगांवची खिंड आणि आजूबाजूचे डोंगर ह्यांतील गुंडांच्या दडण्याच्या जागा भुजंगरावांच्या मदतीनें पोलिसांनी शोधून काढल्या. गुंडांची गुप्त ठिकाणची हत्यारेंपात्यारें जप्त केली. अशा प्रकारें गुंडगिरीचा पक्का बंदोबस्त झाला. भुजंगराव, आबा इत्यादि लोकांच्या मदतीचें सरकारनें कौतुकही पण केलें.

भुजंगरावांना वाटलें, आपलें नाक जाऊन आपल्याला अपशकून तर झाला नाहींच, उलट फायदाच झाला ! आपली कीर्ति वाढली. सैन्यभरतीच्या कार्यक्रमास जोरही आला. गुलाब छाटल्यानें त्याला पुढें फुलांचा चांगला बहर येतो. एक प्रकारें तशीच स्थिति भुजंगरावांची झाली म्हणाना ! त्यांची कीर्ति व मानमरातब पूर्वीपेक्षांही वाढला !

पण अद्यापि त्यांच्या मनांत एक शल्य बोंचत होतें. तें म्हणजे सावळ्या सांपडला नव्हता, हें होय. त्यानेंच आपल्यावर हल्ला केला, त्यानेंच आपलीं नाकें छाटलीं आणि वेळप्रसंग साधून तोच आपल्याला यमसदनीं देखील पाठवील, अशी त्यांना मनांतून अद्यापि धास्ती वाटत होती. निरपराधी रंगीचा जो आपण त्याच्या द्वेषामुळें छळ केला, मरणाच्या दारीं असलेल्या त्या सरळ आणि भाबड्या पोरीच्या मनाला भयंकर यातना होतील, अशीं जीं आपण निंद्य कृत्यें केली, त्यामुळें सावळ्या जर जिवंत असेल, तर तो आपला

सूड घेतल्याशिवाय खास राहाणार नाही, अशी धास्ती रात्रंदिवस त्यांना वाटत होती !

त्यांतल्या त्यांत समाधान वाटण्याजोगी अलीकडे त्यांच्या कानी एक वार्ता आली होती, ती ही की, एका ठिकाणच्या गोळीबारांत सावळ्या गोळी लागून मेला आणि त्याच्या साथीदारांनी त्याचें प्रेत पळवून नेलें ! ही बातमी भुजंगरावांच्या मनाला किडून पोखरून गेलेल्या वृक्षाला नवीन पालवी फुटावी, अशी वाटली !

अशा मनःस्थितीतच वीरांचा गौरव करण्याची सुसंधि भुजंगरावांना प्राप्त झाली. ह्या संधीचा उपयोग सैन्यभरतीच्या कामास उपकारक होईल, असेंही त्यांना वाटत होतें. त्या भागांतील भुजंगरावांचे बहुतेक सहाय्यक तऱ्हेगांवी सरदारजींचा सन्मान करण्यास येणार होते. फक्त आबा जरूरीच्या कामाकरितां साताऱ्यास गेले होते आणि तेथेंच आजारी पडल्यामुळें ते तेवढे ह्या सभेस उपस्थित राहूं शकत नव्हते !

सरदार आणि राणोजी मुंबईहून निघाले. प्रथम उभयतांनीं तऱ्हेगांवीं जावें, नंतर राणोजीनें मानसन्मानानें आंबेगांवी प्रवेश करावा, असें सरदारांना वाटत होतें. पण राणोजीस तें पटेना. त्याला आपण आंबेगांवीं केव्हां जाऊं, असें होऊन गेलें होतें !

तेव्हां उभयतांच्या विचारानें असें ठरलें की, राणोजीनें प्रथम आंबेगांवी जावें आणि रंगूला घेऊन त्यानें समारंभाच्या वेळीं तऱ्हेगांवला यावें. नंतर सर्वांनीं आंबेगांवास जावें.

ठरल्याप्रमाणें राणोजी तडक आंबेगांवाकडे निघाला. सरदार तऱ्हेगांवच्या वाटेस लागले.

तऱ्हेगांवीं सरदारांचा सत्कार पुष्कळांनीं केला. दुसऱ्या दिवशीं जंगी जाहीर सभा भरणार होती. सरदार आणि राणोजी ह्यांना त्या भागांतील मराठा मंडळानें मानपत्र देण्याचें ठरविलें होतें. तें मानपत्र भुजंगरावच वाचणार होते !

समारंभाच्या वेळेपर्यंत राणोजी अगदीं बिनचूक येईल, असें सरदारांना वाटत होतें. भुजंगराव वगैरेंना तसें त्यांनीं नक्की सांगितलेही होतें. पण शेवटच्या घटकेपर्यंत राणोजी आला नाहीं. त्यामुळें सरदारसाहेबांना

खिन्नता वाटली ! भुजंगरावांना राणोजी शिर्के यांच्या अनुपस्थितीनें निरुत्साह वाटला ! पण ठरल्याप्रमाणे समारंभ पार पाडणे जरूर होतें.

ह्या सभेची हकीकत 'संभ्रम' पत्रांत विस्तारानें आलेली आहे. त्यांतील कांही भाग पुढें दिला आहे.

## अभूतपूर्व प्रचंड सभा

"ह्या सत्कारसमारंभाचा थाट अपूर्व असा होता. सरकारी कचेरीपुढील पटांगणांत भव्य असा मंडप घातलेला होता. तो लता-पल्लवांनीं शृंगारलेला होता. गांवोगांवचे प्रमुख लोक त्या मंडपांत उपस्थित होते. राणोजीराव शिर्के यांची वाट शेवटच्या घटकेपर्यंत लोक पाहात होते. त्यांची माहिती कोणासच नव्हती, त्यामुळें भुजंग-रावांनीं वाचलेल्या मानपत्रांत त्यांच्या नांवाचा "विजयी वीर राणोजी-राव शिर्के, एवढाच उल्लेख होता !"

❀ ❀ ❀

"ह्या सत्कारसमारंभास आरंभ श्री. चकणे वकिलांच्या भाषणानें झाला. त्यांचें भाषण सुरू झालें, तेव्हां सभेंत सर्वत्र गंभीरता पसरली. ते आवेशांत आले, तेव्हां त्यांनी दोन तीनदां मिशांवरून हात फिरविला. पण मिशा जाग्यावर नसल्याची आठवण तेथेंच श्री. फसवे वकिलांनीं त्यांना करून दिली ! त्या वेळीं सभेंत हशाच हंशा पिकला ! श्री. चकणे वकील सर्वांकडे आपली तिरळी नजर फिरवून म्हणाले,

"सरदार कर्नालसिंग आणि राणोजीराव शिर्के यांचा सत्कार करण्याकरितां वास्तविक आम्ही येथे आलों आहोंत. वास्तविक मी कॉंग्रेसच्या मताचा आहें. ('मग कैदेंत कां गेला नाहींत?' असा एक आवाज !) सैन्यांत शिरण्यानें हिंसेच्या संनिध आपण जातों, हें खरें ! तेव्हां एकाद्या सैनिकाचा सन्मान करण्यानें मी हिंसेचें समर्थन करीत आहे, असा जर कोणाचा समज होत असेल, तर तो त्यांनीं होऊं देऊं नये ! (येथें आपल्या नाकावर बसलेला एक डांस हाताच्या चापटीनें मारतात. तेव्हां हशाच हंशा पिकतो !) आम्ही सरदारांच्या वीरत्वाचा सन्मान

करीत आहोंत ! आमच्या बांधवांपैकी लढवय्या समाजांतील एका शीख सरदारांचा आम्ही सन्मान करीत आहोत ! ह्या योगानें आपण आपलें स्वातंत्र्य जवळ आणीत आहोंत ! —"

"चकणे वकील सर्वांकडे पाहूं लागले. त्यांना वाटले, आपलें भाषण छान झालें ! ते आपल्या भाषणात ओढून ताणून स्वातंत्र्य शब्द कोठेंही आणतात! त्यायोगें तरी लोक आपल्यास देशाभिमानी म्हणतील असें त्यांना वाटत असतें !"

त्यानंतर भुजंगरावांच्या मुद्दाम निमंत्रणावरून आलेले श्री. फसवे वकील मोठ्या आवेशानें बोलले, जणू काय ते कोर्टांतीलच चकणे वकिलांच्या भाषणाला उत्तर देत असल्यासारखे हातवारे करीत होते. ते म्हणाले—

"सभ्य स्त्रीपुरुषहो ! (तेथें फक्त मामलेदारसाहेबांची एक नऊ दहा वर्षांची कन्या हजर होती. ती मात्र मोठ्याने हंसली ! ) माझे मित्र श्री. चकणे यांना युद्धांतील हिंसा पसत नाही, मग ते ह्या अभिनंदनाच्या सभेंत कसे भाग घेतात, हे मला तर समजत नाही ! सरदार साहेबांनीं शेंकडों शत्रुसैनिकांना कंठस्नान घातलें, म्हणून तर त्यांचा हा गौरव चालला आहे ! सरदार साहेबांनी आपल्या देशाचें नांव उज्ज्वल केलें आहे. त्यामुळे आता आपलें स्वातंत्र्य दूर नाही. तें आपल्यांतील एकीवर अवलबून आहे. . . . . ."

"आपल्यांतीलच तंट्याबखेड्यांनी आपलें स्वातंत्र्य दूर जात आहे. रा. ब. भुजंगराव यांच्यासारखे मराठा प्रमुख स्वातंत्र्यप्राप्तीचा सैन्यभरतीचा राजरोस मार्ग चोखाळीत असता त्यांच्यावर सावळ्यासारख्या यःकश्चित मराठा तरुणानें हल्ला करावा, हें देशाचें दुर्दैव होय ! भुजंगरावांच्या हातूनच मराठा वीर राणोजीराव शिर्के यांचा आज सन्मान व्हावयाचा होता, पण ते कोठें गेले आहेत, ह्याची माहितीही कोणास कळली नाहीं ! ह्याबद्दल साऱ्या सभेस वाईट वाटत आहे—"

"सरदारसाहेबांकडे आणि जवळच बसलेल्या भुजंगरावाकडे पाहून फसवे वकीलांनीं भाषण संपविलें व ते खुर्चीवर बसले."

"त्यानंतर रा. ब. भुजंगराव देशमुख हे अखिल भारतीय मराठा मंडळातर्फे मानपत्र वाचून दाखविण्यास उभे राहिले."

" त्यांचा पेहराव लष्करी थाटाचा होता. फक्त डोक्यास तेवढा गुलाबी फेटा होता. त्यांनी सोनेरी फ्रेमचा चष्मा वापरलेला होता. त्यामुळें नासिक छेदनाची खूण झाकली जाऊन त्यांचे कृत्रिम नाकासही ह्या चष्म्यानें शोभा आली होती ! खऱ्यापेक्षांही कित्येक वेळा कृत्रिमता शोभून दिसत असते खरी !"

" भुजंगरावांनी खणखणीत आवाजांत मानपत्र वाचून दाखविलें. त्यांच्या त्या छापील मानपत्रांत 'राणोजीराव शिर्के' ह्या मराठा सैनिकाची खूप स्तुति होती ! त्या वेळीं सरदारसाहेब भुजंगरावांकडे स्मितपूर्वक पाहात होते ! त्यांच्या दृष्टीतील मिस्किलपणा त्यांच्या काळ्या चष्म्यामुळें कोणास दिसून येण्यासारखा नव्हता !"

" मानपत्र वाचल्यानंतर अनेकांचीं भाषणें झालीं ! सरदार-साहेबांवर हारांचा तर वर्षाव झाला."

" शेवटीं सरदारसाहेब उत्तर देण्याकरितां उभे राहिले. त्यांनीं प्रथम सभोंवतीं नजर टाकली. त्यांची भव्य देहयष्टि नजरेस पड-ल्याबरोबर सारी सभा चित्रासारखी तटस्थ झाली."

" ते रुद्ध कंठानें हळुहळू बोलूं लागले,"

" आज चार शब्द बोलावें, अशी माझी मनःस्थिति नाहीं. महाराष्ट्र बांधवांच्या माझ्यावरील अलोट प्रेमामुळें माझें हृदय भरून आलें आहे. तथापि प्रसंगास अनुसरून मला दोन शब्द बोललेच पाहिजेत."

" मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, परिस्थितीच्या घोटाळ्यानें म्हणा, अगर गुतागुंतीनें म्हणा, आपल्यांत वास्तव्य करीत असलेल्या श्रेष्ठ गुणांचा परिपोष होऊं शकत नाहीं !"

" महायुद्धांत रा. ब. भुजंगराव यांच्या सारख्यांच्या प्रयत्नानें जे तरुण सैन्यांत दाखल होतात, त्यांतील बहुतेक वैयक्तिक लाभाच्या आशेनेंच येतात. आपल्या राष्ट्राकरितां ह्या यौद्धिक परिस्थितीचा जास्तींत जास्त फायदा घेण्याच्या उद्देशानें प्रेरित झालेले तरुण सैन्यांत दाखल व्हावयास पाहिजेत."

" अशाच सैनिकांना सध्यांच्या जगाचें सत्यस्वरूप अधिकाधिक

कळेल. त्यायोगें राष्ट्रोद्धाराचा मार्ग चोखाळण्यास त्यांना अधिक मदत होईल--"

"ह्यापेक्षां मला जास्त कांही बोलवत नाहीं. तुम्ही केलेल्या सत्काराबद्दल मी स्वतःबद्दल आणि राणोजीरावांबद्दलही तुमचे अंतःकरणपूर्वक आभार मानतों --"

"सर्वत्र टाळ्यांचा प्रचंड कडकडाट झाला."

इतक्यांत त्या वेळीं मुंबई सरकारकडून एक आलेली तार सरदारांच्या हाती देण्यांत आली. तीमुळे सरदारसाहेब एकदम आनंदित होऊन उठून उभे राहिले आणि गंभीरपणे बोलू लागले--

"राणोजीराव शिर्के यांचें नांव आतां सर्वांना परिचित झालें आहे. पण त्यांची ओळख ते स्वतः येथें नसल्यामुळे आपणांस झाली नाहीं, ती मी करून देत आहें."

सारे लोक तटस्थतेनें सरदारांचे पुढील भाषण ऐकू लागले.

"ते मूळचे आपल्या भागांतीलच होत. दोन तीन वर्षांपूर्वी ते राणोजी शिर्के ह्या नांवानें सैन्यांत दाखल झाले !"

"मग त्यांचं खरं नांव सांगा की--"

भुजंगराव मोठ्यानें म्हणाले,

"सांगतोंच कीं !" सरदार बोलूं लागले.

"त्यांच्यावर अनेक गुन्हे केल्याचे आरोप होते. पण मी ते सारे माफ करून घेतले आहेत ! ही गोष्ट ह्या प्रसंगी जाहीर व्हावी, अशी माझी इच्छाही होती! आतांच माझ्या हाती सरकारची तार आली आहे, म्हणून मी राणोजी शिर्के यांचें खरें नांव जाहीर करितों--"

"तें नांव तुमच्या माहितीचेंच आहे! भुजंगरावांच्या तर चांगलेंच माहितीचें आहे ! त्यांचें नांव 'सावळाराम हैबतराव मोरे; राहाणार आंबेगांव' असें आहे --"

"जो तो आश्चर्यानें थक्क होऊन गेला !

इतक्यांत सावळाराम की जय ! सरदार की जय ! अशा जयजयकारांच्या आरोळ्या सर्वत्र होऊं लागल्या !

घाईघाईने सरदारसाहेब आपल्या मुक्कामाच्या सरकारी बंगल्यात निघून गेले.

सरदाराच्या ह्या जाहीर घोषणेनें भुजंगरावांच्या मेंदूस एकदम धक्का बसला ! ते बेशुद्ध होऊन पडले !

त्यांना ताबडतोब दवाखान्यांत पाठविण्याची अधिकाऱ्यांनीं तजवीज केली."

## पाठीराखा परमेश्वर

## २१

शणोजी मुंबईहून पुण्यापर्यंत आला, त्या वेळीं त्याच्या मनांत एक विलक्षण कल्पना आली. आपल्या आंबेगांवच्या गत आयुष्यक्रमाची त्याला एकदम आठवण झाली. त्या वेळच्या त्याच्या पेहरावाची पद्धत त्याच्या डोळ्यापुढें आली. आणि त्याच पोशाखांत आपल्या घरीं जावें, असें त्याला वाटलें !

वास्तविक त्याच्या लष्करी पोशाकांत तो जर आंबेगांवी जाता, तर सगळ्याच लोकांना एकदम आश्चर्य वाटलें असतें ! पण रंगीजवळ नव्या वेषांत जाणें, त्याला मुळीच पसंत पडेना ! त्याला आपली मूळची रंगी पाहावयाची होती ! म्हणून तो मळच्या पोषाखांत तिला भेटूं इच्छित होता !

शिवाय आंबेगांवी सरदार येईपर्यंत विशेष प्रकट होण्याची त्याची इच्छाही पण नव्हती ! रंगीजवळ जाऊन एकांतात पहिले दोन तीन दिवस अगदीं मोकळेपणानें सुखदुःखाच्या गोष्टी सांगण्यांत घालवावे, असें त्याला वाटत होतें !

म्हणून त्यानें आपलें जाडजूड सामान पुण्याच्या एका मित्राकडे ठेविलें आणि तो साध्या वेषानें आंबेगांवीं जाण्यास निघाला !

त्यानें अंगांत भलीभक्कम पैरण घातली होती. बारीक किनारीचें धुवट धोतर तो नेसला होता. पायांत जाडजूड वाहाणा घातल्या होत्या. आणि डोकीस गुलाबी मलमलीचा फेटा बांधला होता.

आगगाडीमध्यें आपल्या खिशांतील आरशींत किती तरी वेळां त्यानें

आपलें तोंड न्याहाळून पाहिलें असेल ! वाळवंटांतील उष्ण हवेमुळे त्याच्या मूळच्या गौरवर्णावर जणूं काळसर रंगाचा एक सफाईदार हात फिरल्याचा भास होत होता !

ते दिवस भाद्रपद मासाचे होते. आंबेगांवच्या भागांत त्या वर्षी चांगला पाऊस पडला होता; आणि पडत पण होता. हस्ताच्या पावसानें इतका कहर उडवून दिला होता कीं, मोठमोठ्या ताली फुटून गाळाची सुपीक माती ओढ्या ओघळींतून दूर वाहात चालली होती !

राणोजी सकाळच्या दहा वाजण्याच्या सुमारास आंबेगांवी येऊन पोहोंचला. त्याचें मन त्याला सांगत होतें की, असा पाऊस असला तरी रंगी ह्या वेळीं मळ्यांतच असली पाहिजे ! म्हणून तो तडक तिकडे निघाला !

वाटेंत त्याला आंबेझरी आडवी आली. ती पावसाच्या पाण्यानें तुडुंब फुगली होती. जमिनीतील गाळ तिच्याबरोबर वाहून जात असल्यामुळें तिचा वर्ण लालसर दिसत होता. जणू रक्ताचा पूरच तो !

मांड्याइतक्या पाण्यांतून तो आंबेझरी ओलांडून आंबराईत आला.

आंबराईत सर्वत्र गवत माजलें होतें.

त्या गवतावरून पाण्याचे बिंदू डोळ्यांतून अश्रु गळल्यासारखे टपटप खालीं गळत होते. तो त्यांतून मार्ग काढीत काढीत साखरगोटीपाशीं येऊन पोहोंचला, तिची ती दुर्दशा पाहून सावळ्याचें अंतःकरण भरून आलें !

त्याची आवडती साखरगोटी जाग्यावर उभी तरी कोठें होती ? ती गेल्या उन्हाळ्यांतील भयंकर वादळानें मुळासकट उमळून पडली होती ! तिच्या अंगावर हिरव्या गार पानांचें वस्त्र तर मुळीच नव्हतें. ती अगदीं अस्ताव्यस्त आणि उघडी नागडी पडली होती ! तिच्या शरीरांतील हाडांचा सांपळा तेवढा दिसत होता ! तीं हाडें देखील अगदी वाळून गेलीं होती !

अशी तिची ती दुर्दशा पाहून सावळ्याचें अंतःकरण भरून आलें ! त्याच्या अंतःकरणांत कालवाकालव सुरू झाली !

साखरगोटीजवळ आल्याबरोबर त्याची पूर्वीची संवय मात्र जागी झाली आणि त्यानें एक शीळ घातली !

त्या शिळेला उत्तर मिळालें नाहीं.

सावळ्या भ्रमिष्टासारखा आंबराईतच फिरूं लागला. त्याला वाटलें—

रंगी मळ्यांत नाही. ती घरांत तरी असली पाहिजे किंवा न जाणों, त्या भुजंग्याच्या कैदेंत पानगांवीं असली पाहिजे!

पण दुसरी कल्पना त्याला कांही केल्या पटेना! त्याचें मन त्याला सांगत होतें कीं, रंगी आंबेगांवींच भेटणार! आणि ती मळ्यांतच भेटणार!

सावळ्या चिखल तुडवीत तुडवीतच मळ्यांतून हिंडू लागला. त्याच्या मळ्याची स्थिति त्याच्या नजरेस पडू लागली—

त्याच्या छोट्या बागेंतील जाईजुईच्या वेलींनीं मांडवाखाली अंग टाकून त्या टिपे गाळीत पडल्या होत्या! मिरचीची पानें रोगानें खुरटून गेलीं होतीं! केळीच्या बागेंतील केळींनीं जमिनीवर सपशेल लोटांगण घातलें होतें! दूर अंतरावर दिसणारी आपली झोंपडी कोणी तरी मोडून टाकलेली असून तिचा उरलेला थोडासा सांगाडा मात्र त्याच्या नजरेस पडला!

आपल्या मळ्याची अशी झालेली दुर्दशा पाहून खरोखरीच सावळ्याच्या डोळ्यांतून खळकन टिपें गळली! शत्रुसैन्यानें उध्वस्त केलेला प्रदेशच आपल्या दृष्टीपुढें आहे की काय, असें त्याला वाटूं लागलें!

सकाळपासून आकाश ढगांनी व्याप्त होतें. सर्व दिशा पण धुंद झाल्या होत्या. सूर्यानें आपलें तोंडही लपविलें होते. सावळ्याच्या मळ्याची झालेली दुर्दशा त्याला आज तरी पाहावयाची नव्हती, कीं काय कोण जाणे!

सावळ्यानें एक सुस्कारा टाकला. त्याचा उत्साह बराच ओसरला. त्या वेळीं पावसाची मोठी सर येण्याचा संभव दिसू लागला.

आपली झोंपडीच जर जाग्यावर नाहीं, तर मग तेथें असल्या पावसाळ्यांत माणूस तरी कोण असणार, असें त्याला वाटलें. आणि तो गांवांत जाण्याचा विचार करूं लागला. ज्या आशेनें तो प्रथम मळ्यांत आला होता, ती त्याची आशा विफल झाल्यामुळें त्याच्या मनांत उदासीनता पसरली!

आतां शेतांतील चिखल टाळून तो बांधाबांधानें पुढें जाऊं लागला. अशा रीतीनें तो सदोबांच्या शेताजवळ आला. तेथील पिकें मात्र त्याला कांहींशीं टवटवीत दिसू लागलीं. आपल्या मळ्यांतील मृतप्राय शेतीनें त्याच्या मनांत उत्पन्न झालेली उदासीनता हळुहळू कमी होऊं लागली!

इतक्यांत त्याच्या कानावर एकतारीचे सूर पडले. त्यानें दुरून न्याहाळून पाहिलें. सदोबांच्या शेतांत एक मोठी नवी भली भक्कम झोंपडी त्याला

दिसली. त्याच झोंपडींतून हे एकतारीचे सूर निघत आहेत, हें त्यानें ताडलें. त्याने आपले पाय त्या झोंपडीकडे वळविले.

पावसाची सर पण त्या बाजूला नुसती चाटूनच गेली होती! जोराचा पाऊस फार दूर अंतरावर पडत असलेला दिसत होता!

सावळ्या त्या नव्या झोंपडीजवळ आला. त्याच्या कानावर पुढील अभंगाचे सूर पडले——

*सुख पाहातां जवापाडें। दुःख पर्वता एवढें॥*

हा अभंग सदोबा अगदी भक्तिभावानें म्हणत होते.

असें एकतानतेनें भजन करणारे सदोबा आपल्याला उपदेश करण्याकरितांच हा अभंग म्हणतात कीं काय, असा विचार त्याच्या मनाला स्पर्शून गेल्याशिवाय राहिला नाहीं!

त्याला कसली तरी अंतःस्फूर्ति झाली. आणि त्यानें दुरूनच एक शीळ घातली!

त्या शिळेलाही उत्तर आलें नाही, तरी पण सावळ्यानें आपले पाय त्या झोंपडीकडे वळविले!

त्या दिवशीं पाऊस अतिशय पडल्यानें शेतकाम करण्याची सोय नव्हती. म्हणून सदोबा ईश्वराचें भजन करीत झोंपडींत बसले होते.

आदल्या रात्रीं रंगीची तगमग विशेष वाढली होती. म्हणून रखमा सकाळीं लवकर कामधंदा आटोपून मगनशेठच्या दुकानी औषध आणण्याकरितां गेली होती. मगनशेठच्या घरी एक चांगला वैद्य आलेला आहे, त्याचें औषध मिळालें, म्हणजे रंगीला बरें वाटेल, ह्या समजुतीनें ती तेथें लवकर जाऊन बसली. पण त्या वैद्याकडे इतकी गर्दी झाली होती की, हिची दाद लागण्यास बराच वेळ लागला.

अलीकडे रंगीला देखील औषधाचा कंटाळा आला होता. पण आदले दिवशी पाहाटेसच तिला एक मधुर स्वप्न पडलें होतें. "सावळ्या घरीं आला आहे, आपण त्याच्या मांडीवर डोकें ठेवलें आहे, आणि आपल्यास तशा स्थितींत छान झोंप पण लागली आहे!" असें तें गोड स्वप्न होतें.

त्यामुळेंच तर तिनें आज रखमाच्या मागें वैद्याचें औषध घेऊन येण्याचा

तगादा लावला ! तिला सावळ्याची भेट होण्याकरितां तरी जगावें, असें वाटूं लागलें !

सदोबाही तिला सकाळीं म्हणाले होते--

" रंगे, तुझी विठोबावर श्रद्धा आहे, तुला सावळ्या लवकरच भेटेल ! मी देखील तुझ्याकरितां त्याचें भजन करीत असतों. ती विठाबाई माऊली तुला पावल्याखेरीज राहाणार नाही ! --"

सावळ्या आतां अगदी सदोबांच्या नव्या झोंपडीजवळ आला होता. तिच्या पलीकडेच सदोबांनी जनावरांकरितां छप्पर बांधलें होतें. त्यांतील बैल त्या ओलीतच रवंथ करीत बसले होते. कान टवकारून गाय इकडे तिकडे पाहात होती. तिचा नवा खोंड तिला उगीचच्या उगीचच ढोशीत होता ! छप्पराच्या एका बाजूची म्हैस शेणसड्यांत यथेच्छ लोळत पडली होती !

सावळ्यानें जाणलें सदोबांनीं आपला शेतीचा सारा पसारा आपल्याच शेतांत आणून ठेवला आहे; आणि येथेंच सारे जण राहात असावेत.

माणसांच्या दुष्ट कृतीचा तिटकारा येऊनच की काय, सदोबांनी निरागस निसर्गाची संगत कायमची धरली असावी, असेंही त्याला वाटलें.

इतक्यांत सदोबांनीं पुढील अभंग म्हणण्यास सुरुवात केली.

*प्रेम नये सांगतां बोलतां दावितां ।*
*अनुभव चित्ता चित्त जाणे !*

सदोबांनीं आपणांसच हा संदेश दिला आहे, असें एकदम वाटून सावळ्या अधिकच कावराबावरा झाला ! त्याच्या तोंडांतून अगदीं हळूच नेहमींची शीळ निघून गेली !

ती शीळ मात्र त्या झोंपडींतील रंगीच्या कानांवर गेली. तिचें अंतःकरण फुलून गेलें. तिला अभूतपूर्व असा आनंद वाटला !

ती मनांत म्हणाली,

" माझ्या सावळ्याचीच शीळ ही ! माझ्या कृष्णाचीच शीळ ही ! "

झटकन उठून जावें, उडून बाहेर पडावें, असें किती तरी तिला वाटलें. पण तिचें शरीर तिला तसें करूं देतें थोडेंच !

सदोबा एकतानतेनें डोळे मिटून अभंग म्हणतच होते.

आतां सावळ्या अगदी झोंपडीच्या दाराजवळ आला. त्यानें हळूच आंत डोकावलें. त्याला कोणीच दिसलें नाहीं. मग त्याला पाहिजे असलेले माणूस त्याला तेथें दिसलें नाहीं, हें उघड आहे.

त्या झोंपडीतील एका बाजूच्या कोपऱ्यांतील खाटेवर रंगी पडली होती. ती डोळे मिटून पांडुरंगाचें ध्यान करीत होती. तिचा पांडुरंग सावळ्याच होता. तो अगदीं झोपडीच्या दाराशी उभा होता, पण त्याची तिला जाणीव नव्हती !

ढगांनीं आकाश गच्च भरून गेलें होतें. त्यामुळे सर्व बाजूंनीं बंद असलेल्या झोंपडीतील सारे कांहीं एकदम दिसलें नाही. तसें दिसणें शक्यही पण नव्हतें. म्हणून त्यानें आणखीही एक लहानशी शीळ घातली !

ती शीळ रंगीला पूर्णपणें ऐकू आली. तिचें सर्वांग थरारून गेलें !

तिनें आपले डोळे आणि सर्व शक्ति एकवटून ती सदोबांना उद्देशून म्हणाली —

" काका ! काका ! विठोबा पावला ! —"

सावळ्यानें ते शब्द ऐकले. त्याला अवर्णनीय आनंद झाला !

तो एकदम झोंपडीत शिरला. हळूहळू त्याला सर्व कांहीं दिसूं लागलें.

" रंगे –"

तिच्याकडे एकसारखे पाहात तो म्हणाला.

तिच्या टपोऱ्या निळसर डोळ्यांत अगदी निस्तेजता आली होती ! तिचे गाल पूर्णपणें दबून गेले होते ! तिच्या दांतांची सुंदर कवळी पुढें आल्यासारखी दिसत होती! तिचें सरळ नाक बरेंच पुढें उचलून दिसत होतें ! तिच्या शरिराचा अक्षरशः अस्थिपंजर पाहून सावळ्याच्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले !

सावळ्याला पाहून रंगीच्या मनाची झालेली स्थिति वर्णन करून सांगतां येण्यासारखी नाहीं.

तिला अत्यंत आनंद झाला, पण तो आवेग सहन करण्याची शक्ति देखील तिच्या अंगीं नव्हती. तिनें फक्त आपलें डोकें उशीवर ठेवलें.

सावळ्या तिच्या उशाशीं बसला. त्यानें तिचें डोकें आपल्या मांडीवर

घेतलें. तिच्या केंसांवरून तो हळूवार हात फिरवूं लागला. त्याच्या डोळयांतून तिच्या मस्तकावर अभिषेक चालला होता !

रंगी डोळे मिटून स्वस्थ पडली होती !

जवळ जवळ अर्धा तास अशा प्रकारें मूकपणें ते उभयतां एकमेकांशीं बोलत होते. उभयतांच्या डोळयांतून निघणाऱ्या अश्रूंखेरीज दुसरें बाह्य चिन्ह त्या वेळीं कांही दिसत नव्हतें !

*येई गा तूं येई गा तूं । पंढरीच्या राया ।*

हा अभंग सदोबा एकतारीवर त्या वेळी म्हणत होते. ते परमेश्वर चिंतनात खरोखरच तद्रूप होऊन गेले होते !

इतक्यांत त्या झोंपडींत रखमानें प्रवेश केला. ती झोंपडीत पाय टाकीत असतांच म्हणाली,—

" मिळाल्या ग रंगे, चांगल्या गोळया ! वैद्य म्हणतोय आतां मरणाच्या दाढेंतून निघेल ती ! —"

रखमा घाइघाईने हे शब्द बोलली.

तिनें खाटेकडे अद्यापि पाहिले नव्हतें. तिला सदोबा म्हणाले,

" अग, ए, विठोबा पावला आपल्याला ! —"

रखमानें सदोबाकडे दृष्टि टाकून म्हटले—

" नेहमीचेंच तुमचं चाललंय हे ! कुठं मेला विठोबा दडलाय कुणाला ठाऊक ! —"

इतक्यांत सावळया खाटेवरून उठला. त्यानें सदोबांना नमस्कार केला आणि रखमापुढें येऊन तो उभा राहिला.

रखमा अत्यंत आश्चर्यचकित झाली ! ती सावळयाकडे पाहूं लागली ! तिला आपण काय पाहात आहों, याचें भानच नव्हतें. इतकी ती बावरून गेली होती ! अत्यंत गोंधळून पण गेली होती !

" रखमा मामी —"

सावळयानें तिला हाक मारली आणि खालीं वाकून तिला नमस्कार केला.

रखमानें घाईघाईनें भाकरीचा तुकडा हातीं घेतला नि सावळयाला

झोंपडीबाहेर नेऊन त्याला चूळ भरण्यास पाणी दिलें. त्याच्यावरून तो तुकडा ओवाळून दूर फेंकून दिला.

"सगळी इडापिडा टळो--" असें ती पुटपुटली. आपल्या कानशिलावर आपल्या दोन्ही हाताचीं बोटें पण तिनें मोडलीं!

चूळ भरून लगेच ती रंगीजवळ गेली. तिनें तिच्याकडे पाहिलें. तिच्या तोंडावरून हात फिरवीत म्हटलें--

"तुझा सावळ्या आला ना ग? तुझं स्वप्न खरं ठरलं पोरी! आतां तू बरी होणार, वैद्यही म्हणतोय तसं--"

"मामी!--"

रंगीला बोलवेना. तिनें आवंढा गिळला. आणि तोंडांतल्या तोंडांत ती पुटपुटू लागली--

"मामी! आतां सुखानं मरेन मी! काय धिंडवडे झाले माझ्या जन्माचे! साखरगोटीचं भांडण ह्या थराला गेलं मामी! तीही बिचारी जमिनीवर मरून पडली म्हणतेस ना तू? आतां मीही तशीच देवाघरीं जाईन मामी! माझा सावळ्या! माझा देव! माझा गोपाळकृष्ण अखेरीस भेटला मामी मला!--"

रंगीला जास्त बोलवेना. ती फक्त करुणपूर्ण नजरेनें रखमाकडे पाहात होती. तिला आणखी पुष्कळ बोलावेसें वाटत होतें. पण आतां तोंडांतून शब्द निघत नव्हता! फक्त नेत्रांवाटें अश्रुरूपानें तिच्या अंतःकरणांतील तुडुंब भरलेलें दुःख वाहात होतें!

रखमाचीही तशीच स्थिति झाली होती.

रंगीचे शब्द सावळ्याच्या कानीं पडले होते. त्यांच्या अंतःकरणांत जोराची कालवाकालव चालली होती!

इतक्यांत सदोबांनी आपली एकतारी थांबविली आणि म्हटलें,

"जें व्हायचं तें टळत नसतं मुळीं!--"

सदोबांचेंही अंतःकरण भरून आलें होतें.

सदोबा हे परमेश्वराचे एकनिष्ठ भक्त होते. ते त्या वेळीं मनांत म्हणूं लागले,

"सावळ्या येणारच असें आपल्याला वाटत होतें, तें खरें झालें आहे.

त्याचा पाठीराखा पांडुरंग आहे. त्यानेंच सावळ्यावरील सारी संकटें दूर केलीं आहेत, ह्यांत संशय नाहीं. देवावर निष्ठा ठेवणाराची काळजी वाहाणारा देवच असतो --"

" सावळ्या जसा सरळ वृत्तीचा आहे, तशी रंगीही पण अत्यंत सोज्वल वृत्तीची मुलगी आहे. तिचा मागील जन्मीचा भोग भोगावयाचा राहिला होता. तो भोग भोगल्याशिवाय संपत नसतो. म्हणून तिच्यावर दुर्दैवाचा कहर कोसळला ! त्याला कोणाचाही उपाय चालण्यासारखा नव्हता ! --"

परमेश्वराचें नामस्मरण करीत ह्या लोकीचें आपलें कर्तव्यकर्म माणूस करील, तर पृथ्वीचाच स्वर्ग होईल, अशी सदोबांची भाविक श्रद्धा होती. म्हणूनच एका अभंगांतील खालील दोन चरण सहजगत्या त्यांच्या मुखांतून बाहेर पडले !

*विठ्ठल विठ्ठल म्हणा वेळोवेळां ।*
*हा सुखसोहळा स्वर्गीं नाहीं ॥*

## हिंमतरावांचें भूत

## २२

एवढी मोठी सत्काराची सभा आपला गुणगौरव करीत आहे व आपल्यावर मानसन्मानाचा वर्षाव होत आहे, ह्याचा आनंद सरदारांना वाटून त्यांचें अंतःकरण उल्हसित व्हावयास पाहिजे होतें. पण वास्तविक तशी स्थिति नव्हती. निदान त्या दिवशीं तरी नव्हती !

त्यांचें सारें लक्ष राणोजीकडे लागलें होतें. ते त्याची मार्गप्रतीक्षा करीत होते. आपण त्याला सुचविल्याप्रमाणें तो रंगीला देखील घेऊन येईल, अशी त्याची अपेक्षा होती. म्हणून सभेच्या वेळेपर्यंत ते त्याची वाट पाहात होते. पण तो आला नाही. त्यामुळें त्यांची फार निराशा झाली. त्यांच्या मनांत उदासीनताही पसरली. त्यामुळे सभेचें काम संपतांच ते तडक आपल्या मुक्का-माच्या सरकारी बंगल्यांत निघून गेले. आणि आपल्या खोलीचे दार ओढून घेऊन ते पलंगावर अस्वस्थ चित्तानें पडले.

सरदार बंगल्यांत येऊन थोडा वेळ होत आहे, तोंच त्यांना भेटण्याकरितां एक गृहस्थ आले. त्या वेळीं घड्याळांत नुकतेच नवाचे ठोके पडत होते. त्या प्रत्येक ठोक्याबरोबर चुटकी वाजवीत ते गृहस्थ " विठ्ठल विठ्ठल " म्हणत होते !

सावळारामाच्या जयजयकाराच्या वेळींच हे गृहस्थ सभेंत येऊन पोहोंचले होते. सभेचा तो गंभीर देखावा पाहून त्यांना आनंद वाटला. त्यांना खुद्द सर-दारांना भेटून एक निरोप कळवावयाचा होता.

हे गृहस्थ पण तऱ्हेगांवच्या पोलिसांच्या चांगल्या माहितीचे होते. त्यांचें तें जुनें पागोटें, तोंडावरील पांढऱ्या मुद्रा, बंदांचा आंगरखा पाहून पोलिसांना

त्यांची चेष्टा करण्याची लहर आली. ते सरदारजीपर्यंत त्याला जाऊं देखील देईनात !

शेवटी सरदारांचा उतरण्याचा पत्ता शोधून ते सरकारी बंगल्यांत त्यांना भेटण्यास आले होते; पण सरदारजी एकांतात असल्यामुळें त्यांची वर्दी बंगल्यांतील शिपाई सरदारांपर्यंत लवकर पोंचवीना.

कांही वेळानें ते तेथेंच अभंग म्हणत बसले. तो अभंग ते गोड स्वरांत म्हणत होते. रखवालदारही भक्तिभावानें त्यांचा अभंग ऐकत होता! तो अभंग असा होता :—

*निवडे जेवण शेवटींच्या घासें ।*
*होय त्याच्या ऐसे सकळही ॥१॥*

*न पाहिजे झाला बुद्धीचा पालट ।*
*केली खटपट जाय वाया ॥२॥*

*संपादिलें व्हावें धरिलें तें सोंग*
*विटंबना व्यंग पडलिया ॥३॥*

*तुका म्हणे वर्म नेणतां जो रांधी ।*
*पाववी ते बुद्धि अवकळा ॥४॥*

ह्या अभंगाचे निनाद सरदारांच्या कानीं गेले. त्यांनी तो अभंग पूर्णपणें ऐकला. त्यामुळें त्यांच्या मनाचें समाधान झाल्यासारखें दिसलें.

नंतर ते एकदम बाहेर आले आणि बोवांच्या पायांवर डोकें ठेवून त्यांना हाताशीं धरून त्यांनीं त्यांस आपल्या खोलीत नेलें !

सरदारांच्या ह्या वागणुकीनें रखवालदार तर चकित झालाच पण आमचे हे वारकरी सदोबा आश्चर्यमूढ होऊनच त्यांच्याबरोबर आंत गेले. ते अत्यंत नाखुषीनें खुर्चीवर बसले आणि टकमक सरदारजीकडे पाहात राहिले !

आपण त्यांच्याकडे कशाकरितां आलों, ह्याचें त्यांना कांही वेळ भानच नव्हतें !

रंगीच्या आजारीपणाची खरीखुरी स्थिति कळविण्याकरितां सावळ्यानें मुद्दाम सदोबांना सरदारजींकडे पाठविलें होतें. सरदारजींच्या भेटीबरोबर

सदोबा जरी भांबावून गेले असले, तरी थोडया वेळानें त्यांनी हळुहळू साव-ळयाचा सगळा निरोप सरदारजींना सांगितला.

रंगी इतकी आजारी असेल, ही कल्पना ह्यापूर्वी सरदारजींना नव्हती.

सदोबांचा त्या दिवशीचा मुक्काम सरदारजींकडेच पडला! रात्री दिवे मालवून आंथरुणावर पडल्यापडल्या सरदारजींनी आंबेगांवाकडील सर्व खुलासेवार हकीकत सदोबांकडून काढून घेतली!

त्या योगानें त्यांना सावळया आणि रंगी ह्या प्रेमळ जोडप्याच्या करुण स्थितीची चांगली कल्पना येऊन त्यांचेही डोळे ओले झाले.

सरदारांच्या गतायुष्याचें चित्र रात्रभर त्यांच्या डोळयांपुढें येत होतें! त्यामुळें त्यांना शक्य तितक्या लवकर सावळयाकडे जावें, असे वाटू लागलें. पण दोन तीन दिवसांचे तेथील कार्यक्रम ठरवून टाकलेले असल्यामुळें त्यांना ताबडतोब तेथून हलतां येईना.

त्यांना तेथें आणखी जीं कांहीं सरकारी कामें उरकावयाचीं होतीं तीं भराभर चाललींच होतीं! सावळयाचा जमीनजुमला, घरदार वगैरे-वरची जप्ती ताबडतोब उठली! इतरही पुष्कळ कामे त्यांच्या मनाप्रमाणें होत होतीं!

पण त्यांच्या चित्तास स्वस्थता मात्र नव्हतीच!

त्यांनीं पुण्याच्या प्रख्यात डॉक्टरांना रंगीची प्रकृति पाहाण्याकरितां बोलावलें. ते डॉक्टर आंबेगांवी येण्याच्या सुमारास तेथें जाण्याचा बेत सरदारांनी अगदी नक्की केला!

तोंपर्यंत बिचाऱ्या सदोबांस त्यांनी तेथेंच ठेवून घेतलें. दिवसां सरदार कामांत असत. रात्रीं मात्र ते सदोबांचें भक्तियुक्त अंतःकरणानें चाललेलें भजन पुष्कळ वेळ ऐकत बसत!

सदोबांनाही सरदार शोख असले, तरी अगदीं आपलेच आहेत असें वाटूं लागलें! ते दोघे तेथें निरनिराळया खोल्यांत दिवसभर असत. त्यांची भेट रात्रीं भजनाच्या वेळीं होई. सरदारांच्या विचित्र काळया चष्म्यानें सदोबांना देखील त्यांचा चेहरा भीतिदायकच वाटे!

तऱ्हेगांवचीं कामें आटोपून तीन चार दिवसांनीं सरदार सदोबांना

बरोबर घेऊन मोटारीनें आंबेगांवी जाण्याम निघाले. दुसरे दिवशीं पुण्याहून तेथें डॉक्टर यावयाचे होते.

राणोजी शिर्के म्हणजे सावळ्या होय, ही सरदारांनीं केलेली तऱ्हेगांवच्या सभेतील जाहीर घोषणा आबेगांवी जाऊन थडकली होतीच !

सावळ्याच्या घरादारावरील जप्तीही उठली. तो राजरोसपणें गांवांत हिंडू फिरूं लागला, हें पाहून लोकांच्या आश्चर्यास पारावार राहिला नाही !

गौराबाईनाही आनंद वाटला, पण आबांनी आथरूण धरलें ! भुजंगराव आपल्या पानगांवच्या गढींतच दडून राहिले ! गुडभट घरांतून तोंड बाहेर काढीना ! तो रात्रीं बेरात्री येऊन शेठजींचे पाय धरी आणि सावळ्याची भीति दूर करण्याची खटपट करण्याबद्दल त्यास विनवी !

सावळ्यानें आंबेगांवीं आल्याबरोबर क्षणाचीही उसंत न घेतां आपलें व सदोबांचें घर साफसूफ केले. रंगीला घरी आणलें. सरदारजींची राहाण्या जेवण्याची व्यवस्था अगदीं त्यानें मनाप्रमाणे करून ठेवली !

सावळ्याला कोणाचाच द्वेष करावयाचा नव्हता. त्याला आतां रंगीची सेवा करावयाची होती. तो ती मनःपूर्वक करीत होता. उभयताच्या प्रेमाचा तो एक दिव्य नमुना होता.

सरदार कर्तारसिंग मोटारीनें आंबेगांवीं आले. त्या वेळचा त्यांचा तो लष्करी थाटमाट पाहून लोकांना नवल वाटलें !

सरदार कर्तारसिंग थेट सावळ्याच्या घरीं जाऊन उतरले. घरांत पाय टाकतांच त्यांनीं प्रथम रंगीच्या प्रकृतीची विचारपूस केली. तिला त्यांनीं डोळे भरून पाहिलें. पण फार वेळ त्यांना तिच्याजवळ उभे राहावेना !

ते झटकन आपल्या खोलीत गेले आणि दार लावून आपल्या खाटेवर स्वस्थ पडून राहिले. त्या दिवशी सावळ्याशी देखील ते फारसे बोलले नाहींत. स्वस्थ विश्रांतिच घेत होते, म्हणाना !

सावळ्यावरील लोभामुळे ते आंबेगांवीं आले. नाही तर, हे शीख गृहस्थ आंबेगांवासारख्या मराठ्यांच्या खेड्यात येतात कशाला, असें जो तो म्हणू लागला.

सरदार कर्तारसिंग यांची व्यवस्था सावळ्यानें आपल्या घरीं स्वतंत्रपणें

केली होती. त्यांना दिलेली खोली शक्य तितकी चांगली साफसूफ करून तिला थोडीशी रंगरंगोटीही त्यानें केली होती. त्या मोकळ्या हवेच्या खोलींत त्यांनी एक सबंध दिवस अगदी कसल्या तरी चिंतनांत घालविला !

सरदारसाहेबांचें पूर्वचरित्र सावळ्यास देखील माहीत नव्हतें. त्या-बाबतीत ते फार मुग्धता ठेवीत असत, पण बालपणापासूनच ते तीव्र बुद्धीचे असले पाहिजेत, असें कोणाच्याही लक्षांत येण्यास वेळ लागत नसे. त्यांनीं तरुणपणी शरीर उत्तम कमावलें असलें पाहिजे, हें त्यांना पाहातांच कोणा-लाही त्वरित कळे.

सरदारांना बऱ्याच भाषा अवगत होत्या. त्यांतल्या त्यांत हिंदी आणि मराठी ह्या भाषांवर त्यांचें दांडगें प्रभुत्व असून, इंग्लिश आणि फ्रेंच ह्याही भाषा त्यांना चांगल्या समजत होत्या. इंग्रजी भाषेतील त्यांचें लेखन, वाचन, सध्यां बऱ्यापैकीं होतें.

अगदीं प्रथम साधे सैनिक म्हणूनच त्यांचा प्रवेश सैन्यांत झाला होता. लष्करी शिक्षणांत प्रावीण्य मिळवीत मिळवीत त्यांना वरच्या जागा मिळत गेल्या !

फावल्या वेळांत त्यांनीं देशी आणि परदेशी भाषांचा अभ्यास केला आणि त्या भाषांतील चांगले चांगले ग्रंथ अभ्यासपूर्वक वाचले.

त्यामुळे जगांतील नव्या नव्या विचारप्रवाहांची त्यांना माहिती झाली; निरनिराळ्या राष्ट्रांच्या महत्त्वाकांक्षा कळल्या; आपल्या राष्ट्राचें जगांतील विशिष्ट स्थान त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें; आणि त्यांना हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याची तळमळ वाटूं लागली.

त्यांना असें वाटें की, "हिंदुस्थानच्या तरुणांच्या कर्तबगारीस जर भरपूर वाव मिळेल; त्यांच्यांतील शिस्त, संघटना याची वाढ होईल; आपल्या पायापुरतेंच पाहाण्याच्या संकुचित विचारक्षेत्रांतून त्यांची दृष्टि निघून ती जागतिक विचारप्रवाह आत्मसात् करून घेण्याकडे वळेल; तर हे हिंदुस्थानां-तील तरुण आपल्या राष्ट्राचें स्वातंत्र्य जवळ आणतील; तें मिळवितील आणि टिकवितील. शिवाय ते जगाला मार्गदर्शकही होतील —"

ह्या विचाराच्या अनुरोधानें ते साऱ्या गोष्टीकडे पाहूं लागले होते.

लहान लहान हितसंबंधांतून उत्पन्न होणाऱ्या द्वेषबुद्धीचा त्यांना अत्यंत तिटकारा वाटत असे. त्यांची बुद्धि उदार विचारांची होती.

सरदारसाहेबांचा आंबेगांवांतील कार्यक्रम अगदी ठरून गेल्यासारखा होता. दिवसभर ते आपल्या खोलींतच कांहींना कांहीं वाचीत बसत असत. सायंकाळच्या वेळीं ते आपल्या लष्करी रुबाबांत बाहेर पडत. त्यांचे बरोबर बहुधा सदोबा असत.

सदोबांच्या सद्भावी स्वभावावर आणि भक्तियुक्त भजनावर सरदारांची श्रद्धा बसली होती, ते म्हणत असत—

" शीख धर्मावर साधुवर्य नामदेवांच्या वारकरी सांप्रदायाच्या विचारांची छाप पडलेली आहे. म्हणूनच सदोबांसारखे शुद्ध विचाराचे श्रद्धाळू लोक मला फार फार आवडतात. . ."

  

सरदारसाहेब दररोज आपली दैनंदिनी लिहीत असत. त्यांच्या दैनंदिनीतील कांहीं उतारे पुढें दिले आहेत. सावळ्याच्या आंबेगांवाकडे ते कसे पाहात होते, ह्याची त्यावरून कांहींशी कल्पना येईल.

रविवार ता. १० माहे ऑक्टोबर १९४३

"आज पुण्याहून डॉक्टर आले. त्यांनीं रंगूताईची प्रकृति तपासली. ह्यापूर्वी योग्य उपचार झाले असते, तर आशा होती असें डॉक्टरांचें मत दिसलें. बिचाऱ्या पोरीवर दुःखाचा गहजब गुदरला! इतके दिवस ती जगली कशी, हेंच आश्चर्याचें आहे! सावळ्यावरील दृढ श्रद्धेमुळें तिचा प्राण तिच्या कुडींत राहिला! आपल्याला तरी ह्या पुण्यशील रंगूताईचें दर्शन झालें, हें आपलें भाग्यच! —— आतां येथें राहूं नये, असें वाटतें, पण पाय निघूं शकत नाहींत!——मनाला यातना होतात! पण त्या सहन केल्या पाहिजेत!——"

बुधवार ता. १३ माहे ऑक्टोबर १९४३

"आज सावळ्याचा आणि मोरे घराण्याचा सारा जमीनजुमला नजरेखालीं घातला! सारी दुर्दशा झालेली दिसली! हिंमतराव

मोरे यांची केवढी सुपीक जमीन! पण आबा मोरे याचें दुर्लक्ष झाल्यामुळें ती सारी नापीक झाली! मातृभूमीची म्हणजे आपल्याला अन्न देणाऱ्या जमिनीची देखील सेवा आपल्याला मनाजोगी करितां येऊं नये, हें आपलें दुर्दैव होय! ***नसलेलें मिळविण्याकडे खुशाल दृष्टि द्या. पण असलेलें अगोदर सांभाळा तरी!......***"

ह्या दिवशीच्या डायरींत आणखी पुष्कळ मजकूर होता. ठिकठिकाणीं तो खोडलाही आहे. ह्यावरून सरदारसाहेबांची चित्तवृत्ति त्या दिवशी फार अस्थिर झालेली असावी, असें वाटत होतें.

सोमवार ता. १८ ऑक्टोबर १९४३

"—रखमा म्हणजे और स्त्री आहे. प्रथम प्रथम ती माझ्या डोळ्यास डोळा लावण्यास भीत होती. पण आतां मात्र अगदी मोकळेपणानें वागत आहे. आपल्या मनांतल्या किती तरी गोष्टी मला सांगून ती माझी करमणूक करते.

—आज हिमतराव मोरे यांचा सारा वाडा रात्रीच्या आठ वाजण्याच्या सुमारास हिंडून पाहिला! बरोबर सदोबा होते. एवढा मोठा वाडा पण तेथें माणसांचा गजगजाट कोठें आहे? हिमतरावांच्या वेळी तो वाडा अगदी भरलेला असे, असें सदोबा सांगत होते. पूर्वी हिमतरावांच्या बरोबरचे खेळगडी, गडीमाणसें वगैरेंची नेहमी गर्दी त्या वाड्यांत असे!

पण आज स्वयंपाक घरांत गौराबाई आणि बाहेरच्या खोलीत खोकत असलेले आबा मोरे एवढी दोन माणसें त्या वाड्यांत दिसली! गडी माणसें त्या वेळी नव्हती!"

"मात्र खिडकीतून आबा मोरे माझ्याकडे पाहात होते. त्यांचे मांजरासारखे घारे चोरटे डोळे चमकले खरे —"

ताजा कलम—

"आतांच रात्रीं दहा वाजतां मला एकदम लहर आल्यामुळें चष्मा काढून अगदीं जुन्या साध्या वेषांत आबा मोरे यांच्या वाड्यांत

जाऊन सर्व वाडाभर पुन्हा हिंडून आलो. मला काय वाटलें कोणास ठाऊक ? आबा मोरे यांच्या खोलीत मीं डोकावून पण पाहिलें ! --"

❀ ❀ ❀

सरदार साहेबांनीं ह्या दिवसाची डायरी पुरी करून लेखणी खालीं ठेवली. इतक्यांत सावळयाच्या वाडयांत गौराबाई धांवत आल्या. त्या सदोबांना बोलावीत होत्या. त्या अत्यंत घाबरल्या होत्या !

सदोबा बाहेर आले. त्यांना गौराबाई घाबरेपणाने म्हणाल्या --

"भावजी, घरी चला तुम्ही ! त्यांना भुताची भीति वाटते ! सारखे थरथर कांपत आहेत ! तुम्ही त्यांची समजूत घाला ! --"

गौराबाईशी रखमाचें कांहीं वाकडें नव्हतें. त्या बाईविषयी तिच्या मनांत सहानुभूतिच होती. पण तिला आबांचें तोंड बघावयाचें नव्हतें. म्हणून ती आबांच्या वाडयांत अलीकडे पाय टाकीत नव्हती.

पण सदोबांचें तसें कांहीं नव्हतें. संकटाच्या वेळी कोणासही मदत करावयास ते तयार असत. ते कोणाचाच हेवा दावा करीत नसत ! त्यामुळें सदोबा झटकन आबांकडे गेले !

त्यांना आबा कांपत कांपत म्हणाले--

"हिमतरावांचें भूत दिसलें मला ! माझ्या मानगुटीवर बसणार तें ! सदोबा तूंच मला वाचीव ! चुकलों मी ! मी तुझ्या पायां पडतों ! --"

आणि खरोखरीच सदोबांच्या पायावर त्यांनी डोकें ठेवलें.

आबांना दोन्ही हातांनीं धरून उठवीत सदोबा म्हणाले --

"आबा, हिंमतरावाचं भूत येतं कशाला इथं ? तो फार मोठा माणूस ! त्याला असला हेवादावा माहीत नव्हता ! मोठा शूर आणि उदार मराठा ! तुमच्याच मनात वाईट विचाराचं भूत दिसतें ! काढून टाका तें --"

❀ ❀ ❀

इकडे सरदारांना आबांच्या भुताच्या भीतीचा चमत्कार वाटला ! ते खदखदा हंसू लागले ! थोडासा आसुरी आनंदाचा झटका होता तो ! सदोबा आबांकडे गेल्यामुळें त्यांना त्यांचें प्रेमळ भजन त्या वेळीं ऐकावयास मिळालें नाही.

मात्र त्याच वेळीं सावळ्या त्यांच्याकडे आला आणि तो हळुहळू त्यांना कांहीं सांगूं लागला !

सरदारांनी त्याच्याकडे आश्चर्यानें पाहिलें !

थोडा विचार करून ते म्हणाले --

" कांही हरकत नाही. उद्यां रात्रीं बारा वाजल्यानंतर आपण त्यांना भेटूं ! पण सावळ्या, माझ्यावर कोणी तुटून तर पडणार नाहीं ना ?--"

सावळ्या सरदारांकडे पाहून फक्त हंसला !

## चमत्कारिक घटना

## २३

सावळचा राजरोसपणें आंबेगांवांत वावरत आहे, ह्याचा सर्वांत अधिक आनंद कोणास झाला असेल तर तो मन्यासच होय.

दोन तीन वर्षांपूर्वी सावळचा हा गर्मालिंग ठिकाणीं मन्याबरोबर भांडून त्याला सोडून गेला होता. मन्यानें त्याचा तपास लावण्याकरितां भारी खटपट केली होती. त्यानें सबंध महाराष्ट्र पालथा घातला होता. डोंगर, दऱ्या धुंडल्या होत्या, गोसाव्यांचे अड्डे शोधले होते! तथापि त्याचा त्याला यत्किंचितही सुगावा लागला नव्हता!

कदाचित् त्यानें आत्महत्या केली असावी, किंवा तो एकाद्या गोळीबारांत सांपडला असावा कीं काय, असाही त्यास संशय येई, पण तसेंही घडून आल्याचे इतक्या दिवसांत त्याच्या कानावर आलें नाहीं --

खाशा आणि बजा यांनाही तसें कळलें नाहीं!

अशी वस्तुस्थिति असल्यामुळें इतक्या दिवसांनीं सावळ्या आंबेगांवीं आला आहे, ही बातमी मन्याला कळल्याबरोबर तो आनंदानें नुसता नाचूं लागला!

त्याचें आणखी एक कारणही तसेंच अत्यंत महत्त्वाचें होतें. "मन्या, दारूच तुझा घात करील!" असें सावळ्या मन्याला वरचेवर बजावीत होता. आणि त्याच व्यसनाच्या पायीं तो पकडला जात होता. थोडक्यांत निभावलें, नाहीं तर, त्याच्या पाठीमागें जन्माचा खडतर कारागृह-वास लागला असता! असा खडा अनुभव आल्यामुळें अत्यंत निग्रहानें त्यानें मद्याला अजिबात फाटा दिला होता! ही गोष्ट सावळ्याच्या उपदेशानें

घडली आणि सावळ्या तर त्यानतर त्याला भेटला नव्हता ! आतां तो भेटला, ह्यामुळें मन्याला खरा मोज्वल आनंद झाला होता !

रामलिंगांत पोलिसांच्या तावडीतून मन्या निसटला, तेव्हांच त्याचा दारू सोडण्याचा निश्चय झाला होता ! लागलीच दुसरेंही एक त्यानें धाडसाचें कृत्य केले होतें. तें हें की, पोलिसांवर छापा घालून त्याने खाशालाही सोडवून आणिलें होतें !

मन्या, खाशा आणि बजा यांची टोळी अद्यापि कोणासही सांपडली नव्हती ! त्यांनी कोणावर मुद्दाम जुलूम जबरदस्ती केली नव्हती. अन्यायाचा प्रतिकार करण्याचें निधडया छातीचे त्यांचें व्रत चालू होतें !

मात्र त्यांनीं निर्माण केलेले अनुयायी म्हणा किंवा भुतें म्हणा, ह्यांच्यावर नियंत्रण मन्यालाही ठेवितां आलें नाही ! त्यामुळे स्वार्थाकरितां ह्या लोकांनी अनेक अत्याचार केले ! त्याचें प्रायश्चित्तही पण त्यांना भोगावें लागलें !

सखीचें देखील मन्याशी आतां सख्य झालें होतें. त्यानें दारू सोडली, म्हणून मन्याला तिच्या प्रेमाचा आस्वाद मधून मधून घेतां येऊं लागला !

रंगीची चौकशीही वरचेवर करण्यास मन्या चुकत नसे. त्याला तिची दुस्थिति पाहून फार वाईट वाटे.

सावळ्या आंबेगांवी आल्यावर त्याच्या आणि मन्याच्या गुप्तपणें गांठीभेटी होऊन एकमेकांनीं मनमुराद गप्पा झोडल्या होत्या ! सरदारांच्या पराक्रमाचें, त्यांच्या थोरपणाचें आणि प्रेमळपणाचें वर्णन सावळ्यानें मन्याजवळ भरपूर केलें होतें.

त्याचप्रमाणें मन्या आणि त्याचे मित्र यांचीही सर्व माहिती सावळ्यानें सरदारसाहेबांच्या कानांवर घातली होती.

ह्यामुळें सरदारांसारख्या थोर गृहस्थांजवळ आपलें मन उघडें करावें, त्यांचा सल्ला घ्यावा, असें मन्याला फार फार वाटूं लागलें.

ज्या अर्थी सरदारांचें सावळ्यावर इतकें प्रेम आहे, त्या अर्थी सावळ्याच्या मित्रांशी ते सहानुभूतीनें चार शब्द बोलतील, अशी मन्याला आशा वाटत होती. म्हणूनच सावळ्यामार्फत सरदारांची भेट घ्यावयाचें त्यानें नक्की ठरविलें !

सावळयानें सरदारांना ज्या दिवशी रात्री विचारले, त्याच वेळी आबांच्या डोक्यांत भुताटकी शिरली होती ! म्हणूनच सदोबा तिकडे गेले होते. अर्थात् सावळयाला ती एकांताची वेळ मिळाली, आणि त्याने सरदारांकडून मन्या वगैरेंची भेट घेण्याची कबुली घेतली !

  

सावळयाच्या घराच्या मागच्या बाजूस एक प्रशस्त मोठी खोली होती. तेथे रात्री बारानंतर सावळयाचे तिघे मित्र आले. त्यांचा त्या वेळचा वेषही लष्करी पद्धतीचा होता !

दिवे मालवून अंधारातच ही मुलाखत होण्याचें ठरलें होतें. मन्या वगैरेंना आबासारख्या पाताळयंत्री दुष्ट लोकांची धास्ती वाटत असे, म्हणून मुख्यत: ते फार सावधगिरीनें वागत.

सरदार साहेबांनाही तसेंच पाहिजे होतें. ह्या धूर्त लोकांनीं आपल्यालाही अगदीं उघड उघड पाहूं नये, असें त्यांना वाटत होतें. म्हणून मुख्यत: त्यांच्याच सूचनेवरून ही मुलाखत अंधारात व्हावयाचें ठरलें होतें.

मुलाखत ज्या खोलीत होणार होती, तिच्या बाहेरील बाजूस सखी आणि रखमा ह्या बसल्या होत्या.

सदोबा अगदी वाडयाच्या पुढील बाजूच्या खोलीत झोपले होते. त्यांना त्या गुप्त मुलाखतीची माहिती नव्हती. त्यांना असला गुप्त प्रकार आवडतही नव्हता !

अगदीं मोकळेपणानें मंडळीत चर्चा सुरू झाली. ह्या चर्चेस आरंभ प्रथम सरदारसाहेबानींच केला, ते गंभीरपणे म्हणाले––

" मित्रांनो, सावळयानें मला तुमची माहिती पुष्कळ सांगितली आहे. पण तुम्हांला अगदीं स्पष्टच विचारतों, तुम्ही गोरगरिबांच्या कल्याणाकरितां झटतां, असें म्हणतां. पण वेळप्रसंगीं तुम्ही वाटेल तें करतां–तुमच्या हातून गुन्हे घडतात. तुमच्या अशा वागण्यानें खरोखर गरिबांचें कल्याण होतें का, हें मला अगोदर सांगा. . ."

" सरदारसाहेब, " मन्या हलक्या आवाजांत उत्तर देऊं लागला, " होय ! गोरगरीबांचा थोडाबहुत फायदाच होतो आमच्या वागण्यानं ! असं पाहा कीं, श्रीमंतांनीं पुष्कळ धान्यधुन्य छपवून ठेवलं होतं. त्यामुळें

"सरदारसाहेब, ऐका मी सांगते तें ! रंगी माझीच ! ती अगदीं माझ्या मुलीसारखी बरं का ? तिच्या लग्नाच्या खटल्याचा निकाल आमच्या उलट लागला ! तेव्हां मन्यानंच त्या दुष्ट आबांचा आणि भुजंग्याचा सूड घेण्याचं ठरविलं !"

रखमा थोडी थांबली. तेव्हां सावळ्या तिला म्हणाला,

"मामी, अशी गप्प का बसलीस ? सांग की पुढे काय झालं तें !"

"सांगतें हं !" रखमा पुढें बोलू लागली. "मन्यानं आबांच्या घरावर छापा घातला ! मेले तिघंजण दारू पीत बसले होते आनंदांत ! दुष्टच ते ! त्यांच्या नाकांवर कसलसं फडकं टाकून त्यांची शुद्ध नाहींशी केली होती, असं बजानं सांगितलं मला !——"

"मामी, तुम्ही लांबडच लावलीत पुष्कळ ! पण ते तिघे कोण हें सांगितलं नाहीं कीं तुम्ही ?"

सरदारसाहेबांनीं मध्येंच विचारलें.

"जळ्ळं मेलं ! रंगीच्या दुखण्यापासून असंच झालंय माझं ! सांगायचं राहूनच जातं अन बोलतें कांही तरीच !"

रखमा पश्चात्तापपूर्वक म्हणाली.

"मामी, सांग सगळं आतां एकदम !"

सावळ्या घाईनें बोलला.

"तो दारुड्या गुंडभट, भुजंग्या, अन आबा ह्या तिघांना मन्या, खाशा बजा ह्यांनीं नेलं पळवून माळावर ! आम्ही दोघी होतोंच त्यांच्या मागोमाग ! तिथं त्या तिघांना त्यांनी मार मार मारलं ! मी बाई घाबरलें ! खूनच होत होता त्यांचा !——"

"रखमा घाबरती कुठली !" सखी मध्येंच बोलूं लागली, "हिनेंच मग त्या तिघांचीं नाकं कापली ! अन नंतर त्यांना घरीं सोडून द्या म्हणाली ! नाक गेल्यावर सारीच अब्रू जाते ! मग आणखी मारून काय करायचं, असं पण ती म्हणाली ! मीही पण मन्याचा हात धरून त्यांचा मार थांबविला !——"

"हो खरंच सरदारसाहेब !" मन्या म्हणाला, "ह्या दोघींनीं आमच्या

हातून खून होऊं दिला नाहीं, नाही तर आम्ही त्यांना ठार मारून त्याचा सूड घेणार होतों ! --"

रखमाच्या धाडसाची ही हकीकत ऐकून सरदार कर्तारसिग आश्चर्य-चकित झाले !

त्यानतर थोडा वेळ सर्वत्र स्तब्धता पसरली.

रखमानें साऱ्यांचा सूड घेतला, त्यांतलें त्यांत आबांवर तिचा राग विशेष होता. त्याचें खरें कारण अद्यापि कोणास पुरतें माहीत नव्हतें. सावळयाच्याही कानांवर ती हकीकत उडत उडतच पडलेली होती. खरीखुरी स्थिति कळावी, असें त्याला वाटलें व तो म्हणाला,

आबांवरच तुझा जास्त राग ना मामी ? मग ती हकीकत सांग की आम्हांला ! आमच्या लहानपणची ती गोष्ट कुणालाच चांगली ठाऊक नाही."

" आतां माझं वय झालं. तरण्यापणची गोष्ट आहे ती ! सांगूच म्हणतां ? कसं बाई मी सांगूं ?..."

रखमा असे आढेवेढे घेऊं लागली ! ती जरा लाजल्यासारखी झाली !

तेथील सारें वातावरण अगदी घरच्यासारखें होतें. रखमाही कांही इतकी बुजट बाई नव्हती. तिलाही पण कृतकर्माचा पश्चात्ताप वाटत होता. तिच्या मनाला एकसारखें तें जुनें अविचारी कृत्य टोंचत होतें. एकदां तें कोठें तरी ओकून टाकलें, म्हणजे मनाला जरा का होईना, शांतता वाटेल, अशीही तिची समजूत होती.

पण त्या हकीकतीत पुष्कळसा नाजूक भाग होता. त्यामुळे अगदी झटकन ती सांगणें तिच्या जिवावर आलें होते. त्यामुळें ती गोंधळल्यासारखी झाली होती. तिची त्या वेळची अस्थिर मनःस्थिति जाणून अगदी प्रेमळ मृदु स्वरांत सरदार म्हणाले--

" सांगा ना तुम्ही ती जुनी गोष्ट ! तुमच्या भावाला किंवा मुलांना सांगण्यांत इतका कांही संकोच धरावयास नको ! आम्ही पण कुठंकुठं बोल-णार नाहीं, मुळी ! सांगाच तुम्ही आम्हांला !

सरदारांसारखा एवढा मोठा माणूस आपल्याला बहीण समजतो. तेव्हां खरें खरें सांगून टाकलें, तरी कांहीं बिघडणार नाहीं, असें वाटून रखमा म्हणाली--

"मी ती फार वाईट गोष्ट केली पण! माझ्या मनाला सारखी खाते आहे ती! —"

रखमानें आवंढा गिळला. ती बोलण्याचें थांबली. पदराचें टोंक बोटानें गुडाळीत खालीं पाहात ती बसली!

  

हें कांहीं अगदीं एकसारखे नाटकातल्याप्रमाणें संभाषण चाललें होतें, असें नव्हे. मधून मधून अनेक प्रकारच्या धाडसाच्या गोष्टी मन्या आणि त्याचे मित्र सरदारांना सांगत होते. सरदारही त्यावर कांहीं कांहीं वेळां आपलें मत प्रदर्शित करीत होते. सरदारांना देखील रखमाची हकीकत आश्चर्य-कारक असली पाहिजे, असें पण वाटत होतें. म्हणून त्यांना ती गोष्ट ऐकण्याची उत्सुकता फार लागली होती!

त्या वेळीं चांगली भली पाहाट झाली होती. कोंबडा आरवू लागला होता. गार वाराही सुटला होता.

चंद्राचें लख्ख चांदणें सदोबांच्या खोलींत खिडकींतून प्रवेश करून आलें होतें. त्या वेळीं नेहमींप्रमाणें सदोबा जागे झाले. चूळ भरून, त्यांनीं हातीं आपली एकतारी घेतली. त्यांनी पुढील अभंग म्हणण्यास सुरुवात केली!

*दुर्बुद्धि ते मना। कदा नुपजो नारायणा॥*

हे शब्द कानी पडल्याबरोबर एकदम रखमा म्हणाली,

"मला वाईट बुद्धि दिली देवानं त्या वेळी! —"

"लवकर सांग मामी! आमची जायची वेळ झाली! उगीच आढेवेढे घेऊं नकोस! आतां हिंमतराव ऐकायला इथं नाही! कुठं गेलाय कुणास ठाऊक! —"

मन्यालाही उडत उडत कांहीं जुन्या गोष्टी माहीत झालेल्या होत्या. त्यांची खात्री व्हावी, अशी त्याची इच्छा होती. म्हणून त्यानेंही त्या सांगण्याचा आग्रह रखमाला चालविला होता.

"मीच हिंमतरावावर किटाळ आणलं म्हणाना!" रखमा बोलूं लागली, "सावळ्याचा बाप हैबतराव ह्यांचा खरा खून केला आबानं! हैबतराव साखरगोटीखालीं राखणीसाठीं निजला होता. आबानं हिंमतरावांच्या फरशीनंच त्याच्या गळ्यावर घाव घातला

होता ! ती फरशी मीच आबांच्या पुतण्या हिंमतराव याच्या खोलींतून चोरून आणून दिली होती आबाला ! हिंमतरावाचा सदराही मीच चोरून आणला होता बरोबर ! त्या सदऱ्यांत गुंडाळून ती रक्तानं माखलेली फरशी आबानं मजजवळ दिली ! मीच ती हिंमतरावाच्या खोलीत चोरून नेऊन तेथें दडवून ठेविली ! पोलिसांच्या तपासांत तोच महत्त्वाचा मुद्देमाल सांपडला ! त्यावरूनच हिंमतरावाला खुनाच्या आरोपावरून पोलिसांनीं धरून नेलें ! मीच हें खोटं कर्म केलं ! जळो माझा हात हा !—"

ह्या वेळीं तिनें आपला हात जोरानें झाडला. तो दाराच्या चौकटीवर चांगला आपटला गेला ! त्यामुळें रखमाचा हात चांगलाच झणझणला !

" मामी, तुम्ही चांगल्या गुणाच्या आहांत, मग असं पाप कां बरं केलंत ?"

बजा पूज्य बुद्धीनें बोलला.

" काय सांगूं तुम्हांला !" रखमा दुःखी स्वरांत सांगूं लागली " माझं लग्न आबाशी ठरलं होतं. म्हणून माझ्या वडिलांच्या सांगण्यावरून असं करायला लागलं मला ! पण तें पाप माझ्या आंगलट आलं ! माझा बाप पटकीनं मेला !"

त्या वेळीं रखमाच्या डोळ्याला पाणी आलें.

" मग हिंमतराव फाशीं गेला असेल, नाही ?—"

सरदार हंसत हंसत बोलले.

" कसला फाशी जातो तो ! " मन्या उत्साहानें बोलूं लागला, " तो वीर होता. तुरुंगांतील भरभक्कम लोखंडी सळया वाकवून तेथून तो निसटला ! तो कांहीं त्यानंतर सांपडला नाहीं ! कोणी म्हणतात तो मेला पोलिसांच्या गोळीबारांत ! पण मला वाटतं, तो कोठें तरी आमच्यासारखा गुप्तपणें वावरत असावा !—"

" खुळे लोक तुम्ही !" सरदार हंसले व म्हणाले, " इतक्या दिवसांत त्याचा कांहीं पत्ता लागला नसता का ? तुम्ही चोरून वेष बदलून गांवीं फेरी मारतां ! तशी त्यानें मारली नसती का ?"

" पण मला नाहीं तसं वाटत ! अजून देखील ते येणार नाहींत कशावरून ?"

मन्या अगदीं निश्चयपूर्वक म्हणाला.

"पण रखमा मामी सरदार म्हणाले, "मग आबाशीं तुमचं लग्न कसं झालें नाहीं ? त्यांनीं तुम्हांला फसवून तुमचाच उलट सूड घेतला वाटतें ?"

सरदारांच्या ह्या बोलण्यानें सर्वजण हसूं लागले.

"मी फसतें बरी त्याला !" रखमा जोरानें बोलूं लागली, "पण मला चांगलं कळत होतं कुठं. त्या वेळीं ! खरं म्हटलं, तर माझा बाप प्रथम हिंमतरावाला देणार होता मला ! पण त्याला तालमीचा नाद फार होता, म्हणून त्यानं मला त्या वेळीं नाकारली ! मग माझा बाप आबांच्या मागें लागला ! आतां खोटें कशाला सांगूं ! लहानपणीं मला त्याची ओढ पण होती खरी !—"

"मग मामी, तुमचं लग्न कां झालं नाहीं त्यांच्याशीं ?"

सखी मध्येंच डोळे मिचकावीत बोलली.

रखमानें सखीला खोट्या रागानें धक्का देऊन बोलण्यास सुरुवात केली. ती म्हणाली,

"माझे वडील वारल्यावर थोड्या दिवसांनीं आईही पण गेली ! असं वाईट झालं खरं, पण माझी मी स्वतंत्र झाले ! मला आई ना बाप ! माझी शेतीही बरीच ! म्हणून आबाच लग्नाकरितां माझ्या मागें लागला ! मला त्याचा दुष्ट कावा तेव्हांच कळला ! हिंमतरावाचा घात ह्यानं लबाडीनं माझ्याकडून करविला ! अशा दुष्टाशीं लग्न करण्याचं मीच नाकारलं ! मग मीच माझं लग्न ठरविलं—"

"आम्हांला ठाऊक आहे, मामी !" मन्या म्हणाला, "मुठींत राहा-णारा नवरा पाहिजे, तुम्हां बायकांना ! म्हणून तुम्ही तरी सदोबांसारख्या देवभोळयाबरोबर लग्न केलंत ! सखीला देखील तसलाच नवरा मिळालाय."

"होय ! होय !" सखी फणकाऱ्यानें बोलली "नवरे बायकोचं म्हणणं ऐकतात थोडंच !—"

इतक्यांत रंगी हाक मारूं लागली, म्हणून रखमा झटकन उठून तिच्याकडे गेली.

सदोबांचें भजन आतां चांगलें रंगांत आलें होतें.

ह्या गुप्त बैठकींतील गुप्त रहस्यांनीं सगळयांना थक्क करून सोडलें.

मन्या वगैरे मंडळी सरदारांचा निरोप घेऊन बाहेर पडली. पुन्हा चर्चा करण्याचा दिवसही त्यांनी नक्की करून घेतला !

त्या मंडळीना निरोप देण्याकरितां सरदार बाहेर आले. त्या वेळी पूर्व दिशा नुकतीच रंगीबेरंगी वस्त्र परिधान करूं लागली होती ! चंद्राभोंवती खळें पडून, तो त्यांत अडकून पडल्यासारखा दिसत होता !

ताऱ्यांपैकीं कांहीं तारे ढगाआड लपत होते ! कांही तारे त्या ढगांच्या जाळ्यांतून बाहेर पडून जगाकडे डोकावून पाहात होते !

सरदार आकाशाकडे दृष्टि देऊन किती तरी वेळ उभे होते ! त्यांना वाटलें, आकाशांतील निसर्गचमत्कारांना खरोखरच आपल्याच घरांतील विविध चमत्कारिक घटना लाजविणार तर नाहींत ना ?

## रंगीचा सावळ्या

## २४

त्या रात्रीच्या बैठकीत कळलेल्या रहस्यांनी सरदारांच्या मस्तकांत आतां विविध विचारांचें चक्र सुरू झालें. ते आंथरुणावर येऊन पडले खरे, पण त्यांना झोंप लागण्याचें चिन्ह दिसेना. वस्तुतः इतका वेळ जागरण झाल्यानंतर पाहाटेच्या वेळीं त्यांना गोड साखरझोंप लागावयास हवी होती. पण अंतस्थ मनाला स्वस्थता प्राप्त झाल्याशिवाय बाह्य शरिराला स्वास्थ्य कसें लाभणार ?

सरदारांना कौटुंबिक पाश नव्हताच, म्हटला तरी चालेल. त्यामुळें तसल्या विचारांच्या गोंधळास त्यांच्या मनांत फारसा थारा नव्हता. त्यांची दृष्टि असल्या क्षुल्लक स्वार्थाच्या पलीकडची होती. लोकांतील वैयक्तिक स्वार्थ कोणत्या थराला जाऊं शकतो, ह्याचें मूर्तिमंत चित्र साखरगोटीच्या भांडणामुळें त्यांच्या डोळ्यापुढें आलें होतें. असल्या प्रकारच्या आकुंचित स्वार्थाच्या दृष्टींतून सर्वांत मोठी सामाजिक स्वार्थी दृष्टि किंवा जिला राष्ट्रीय दृष्टि म्हणतात, ती समाजांत कशी उत्पन्न होईल, तिचा विकास कसा होईल, ह्याचेंच चिंतन अलीकडे त्यांचें नेहमी चाले.

आजच्या गुप्त बैठकींत त्या त्यांच्या विचारांना आणखी चालना मिळाली. मन्यासारख्या तरुणांनीं आपल्या डोळ्यापुढें कोणतें कार्यक्षेत्र ठेविलें आहे, त्यांच्या विचाराच्या संकुचितपणामुळें त्यांतील हेत्वाभास त्यांच्या लक्षांत कसा येत नाहीं, तसें होण्याचीही कारणें कोणतीं, ह्याचाच खल त्यांच्या डोक्यांत आतां जोरानें चालला होता !

त्यांचा विचारांचा हा खल अगदीं नव्या दृष्टीनें चालला होता. ती दृष्टि त्यांना ह्या सध्यांच्या महायुद्धाच्या सुरुवातीपासून येऊं लागली होती.

चालू युद्धाच्या आरंभापासून सरदार ह्या नाहीं त्या आघाडीवर एकसारखे लढत होते. त्यामुळें जगांतील अनेक राष्ट्रांतील सैनिकांशीं त्यांचा चांगला घनिष्ट संबंध आला होता. अशा सैनिकांपैकीं कांहीं लोक नव्या सैन्य भरतींतील होते; तर कांहीं जुन्या महायुद्धांतील नांवाजलेले योद्धे होते. त्या जुन्या अनुभविक लोकांपैकींच कांहीं वरिष्ठ अधिकाराच्या जाग्यावर होते. आणि कांहीं तर ह्या युद्धाचीं सूत्रें हलविणारेही होते. ह्या सर्वांच्या मतांची थोडीबहुत ओळख सरदारसाहेबांनीं करून घेतली होती.

ह्या साऱ्या विचारमंथनांतून त्यांनीं असा निर्णय काढला होता कीं, "वैयक्तिक फायद्याकरितां जे हेवेदावे किंवा अनाचार आपल्या देशांत ज्या प्रमाणांत चाललेले दिसून येतात, त्या प्रमाणांत दुसऱ्या सुधारलेल्या राष्ट्रात दिसून येत नाहींत."

ह्याचें कारणही त्यांच्या मतें असें होतें कीं "त्या स्वतंत्र आणि सुधारलेल्या राष्ट्रांतील लोकांना कर्तबगारी दाखविण्यास इतरत्र जशी मुबलक संधि मिळते, तशी संधि आपल्या लोकांना मिळत नाहीं. त्यामुळें आपल्या लोकांचे कार्यक्षेत्रच संकुचित राहातें. म्हणून त्यांतच त्यांच्या धडपडी चाललेल्या असतात. आणि क्षुल्लक स्वार्थसिद्धीकरितां ते भलेबुरे मार्ग योजीत असतात."

"ह्याकरितां असल्या संकुचित क्षेत्रांतून बाहेर पडण्याची मिळेल ती संधि आपल्या देशांतील तरुणांनीं साधून घेतली पाहिजे. तसें करीत असतांना मात्र त्यांनीं आपली राष्ट्रहितबुद्धि सतत जागृत ठेवली पाहिजे."

असे त्यांचें मत पूर्ण विचारांनीं बनलेले होतें. आणि त्याकरितांच आपलें उरलेलें आयुष्य घालविण्याचा त्यांचा निर्धार झालेला होता !

आपल्या देशांतील मन्या, सावळ्या, ह्यासारख्या तडफदार तरुणांना आपलीं मतें पटवून द्यावीं आणि त्यांना कांहीं तरी वरच्या दर्जाचें कार्यक्षेत्र निर्माण करून द्यावें, असा त्यांच्या मनाचा निश्चय होऊनच अखेर त्यांना उजाडण्याच्या सुमारास त्या रात्रीं झोंप लागली होती !

  

सरदार सकाळीं जरा उशीरा उठले. त्या वेळीं नुकतेच मगनशेठही सावळ्याच्या घरीं मुद्दाम आले होते.

मगनशेठच्या आग्रहामुळें रंगीच्या लग्नाच्या दाव्याचें अपील साताऱ्या

कोर्टापुढें दाखल झालें होतें. त्या अपीलाचा निकाल लागल्याची बातमी घेऊन मगनशेठ आले होते !

सरदारांचा तऱ्हेगांवीं सत्कार समारंभ झाल्यानंतर एकदोन दिवसांनीच ह्या अपिलाच्या सुनावणीची तारीख होती.

राणोजी शिर्के म्हणजे सावळाराम मोरे ही गोष्ट जाहीर झाल्यानंतर भुजंगरावांची कंबरच खचून गेली ! तथापि त्यांची सूड घेण्याची बुद्धि अजिबात नष्ट झाली नव्हती ! रंगीचें कायदेशीर ठरलेलें लग्न हे एक आपल्या हातीं अमोघ अस्त्र आहे, असें त्यांना वाटत होतें !

त्याकरितां त्यांनीं बराचसा हात सैलही सोडला ! अनेक अधि-काऱ्यांशीं कानगोष्टीही केल्या ! पण आतां काय झालें कोणास ठाऊक फासे उलटे पडूं लागून सर्वच डाव त्यांच्या अंगलट येऊं लागला ! म्हणूनच त्यांनीं अपील चालवावयाचें नाहीं, असें ठरवून आपल्या फसवे वकिलांना तसें कळविलें !

पण मगनशेठमार्फत चाललेली रखमाची खटपट ढिली पडली नव्हती.

आतां प्रत्यक्ष सावळ्याची बाजू वरचढ दिसल्याबरोबर मगनशेठनीं रखमाला मनःपूर्वक साहाय्य करण्याचें ठरविलें होतें. त्यांनीं साताऱ्यास अपील चालविण्याकरितां निष्णात वकील दिला होता.

प्रतिवादीतर्फे अपिलांत कोणीच भाग घेतला नसल्यामुळे आणि न्याय-मूर्तिही उदार दृष्टीचे असल्यामुळे त्यांनी तऱ्हेगांव कोर्टाचा निकाल फिरविला !

अर्थात् भुजंगरावांचें रंगीशीं झालेलें जबरदस्तीचें लग्न बेकायदा ठरलें !

मात्र खालील कोर्टानें लग्न झाल्याची नोंद सरकारदप्तरीं झाली पाहिजे, असा जो विचारपूर्वक शेरा दिला होता त्यास जिल्हा कोर्टाच्या विद्वान् न्याया-धीशांनीं जोरदार पाठिंबा त्या निकालांत दिलेला होता !

रखमाला ही हकीकत मगनशेठकडून समजल्याबरोबर ती आनंदानें बेहोष झाली ! रंगीचा चेहराही खुलला ! घरांत जिकडे तिकडे आनंदी वातावरण पसरलें ! सदोबा रंगीजवळ जाऊन म्हणाले—

"सत्याचा विजय होतच असतो ! तो ह्या जन्मीं नाही, तर पुढच्या जन्मीं ! कर्मभोग ज्याचा त्याला भोगावा लागतो —"

मगनशेठ अपिलाकरितां मुद्दाम कांहीं दिवस साताऱ्यासच राहिल्यामुळें

सरदारांची व त्यांची अद्यापि माहिती झाली नव्हती, म्हणून सावळयानें त्याना सरदारांकडे नेऊन त्यांची ओळख करून दिली.

त्या वेळीं सरदार आपल्या शीख पोषाखांत होते. त्यांनी आपला काळा चष्मा वापरला होता, ते मगनशेठशी हिंदीतच चार शब्द बोलले ! मगनशेठना ह्या मोठ्या गृहस्थांची ओळख झाल्याबद्दल आनंद वाटला. त्यांच्या खोलींतून बाहेर निघतांना सरदारांनीं स्मितपूर्वक त्यांना निरोप दिला.

तें स्मित पाहून मगनशेठना कसली तरी एकदम आठवण झाली ! ते सरदारांकडे रोखून पाहूं लागले ! पण सरदारांनीं आपली मान फिरविली !

मगनशेठ मनाशी कसला तरी विचार करीत आबांच्या वाड्यांत आले.

आबांना बेताबातानें अपिलाच्या निकालाची बातमी सांगावी, अशी त्यांची मनांतली आसुरी इच्छा होती ! कारण, आबांनीं नाण्याच्या प्रकरणांत शेठला चांगलाच चट्टा बसविला होता !

पण आबांच्या घरांत त्यांना कांही विचित्रच प्रकार दिसला !

आबा आपल्या खोलींत अस्ताव्यस्त पडले होते ! ते आपले घारे डोळे गरगर फिरवीत होते ! तोंडानें कांहीं तरी पुटपुटत होते ! गौराबाई त्यांच्याजवळ सचित बसल्या होत्या !

मगनशेठ जरी आबांकडे पाहात होते, तरी आबांनीं त्यांना ओळखल्या-सारखें दिसत नव्हतें ! म्हणून मगनशेठ म्हणाले—

" आबासाहेब, मला ओळखलत का ? मी मगनशेठ आलोंय तुमच्या समाचाराला !—"

आबांनीं मगनशेठकडे वरवर नजर टाकली. आणि ते एकदम किंचाळले,

" भूत ! भूत ! हिंमतरावांचं भूत ! माझ्या उरावर बसतंय भूत !—"

गौराबाईनी त्यांना दाबून धरलें. आबा त्यांनाही आवरेनात ! ते जास्त धडपड करूं लागले !

केविलवाण्या नजरेनें गौराबाईनीं मगनशेठकडे पाहिलें.

मगनशेठना त्या दोघांची दया आली आणि अरेरे ! अरेरे ! असें तोंडानें म्हणत, तेही आबांना दाबून धरूं लागले. आबांनी त्या धडपडींतून तोंड काढून मगनशेठकडे चांगलें पाहिलें.

त्याबरोबर आबा आणखी जोराने किंचाळले,

"हैबतरावाचं भूत ! आणखी हें दुसरें भूत ! माझ्या मानगुटीवर हेंही बसतंय भूत ! --"

हिंमतरावाचें आणि हैबतरावाचें भूत भूत म्हणून आबा ओरडत आहेत. अशा प्रकारें त्याच्या जुन्या पापाला वाचा फुटत आहे. आपण हैबतरावाच्या खुनाच्या खटल्यांत आबांच्या बाजूनें साक्ष दिली होती, ह्याची त्यांना त्या वेळी आठवण झाली !

वास्तविक सावळ्याचे वडील हैबतराव आणि मगनशेठ हे दोघे स्नेही होते. दोघांच्याही चेहऱ्यांत बरेंच साम्य दिसत असे. दोघांचीही गंध लावण्याची पद्धत एक होती !

मगनशेठ मनांत म्हणू लागले --

"आबांचें डोकें बिघडू लागलें आहे खरें ! ह्या स्थितीत आपण त्यांच्या नजरेस पडल्यामुळें हैबतरावांचीही त्यांना आणखी कल्पना आली असावी व ते त्याचें भूत भूत म्हणून ओरडत असावे ! पण हिंमतरावांचें भूत ह्यांच्या डोक्यांत प्रथम कसें शिरलें, ह्याचा मात्र उलगडा होत नाही ! सरदारसाहेबांना हंसतांना पाहिल्याबरोबर आपल्या मनांत आलेला संशय कदाचित् खरा असेल, तर हिंमतरावाच्या भुतानें आबांच्या डोक्यांत केलेल्या संचाराचें वर्म बरोबर सांगतां यईल ! —"

आबा जरा स्वस्थ पडल्याबरोबर मगनशेठनी तेथून हळूच पाय काढला.

गुडभटाच्या नादानें आणि गांवांत कोणा तरी मोठ्याचा पाठिंबा असावा, म्हणून आपण त्या वेळी खोटी साक्ष दिली, ह्या पूर्वीच्या पापकर्माची शेठजींना आतां फार खंत वाटू लागली !

  

रंगीला आतां मानसिक स्वास्थ्य बरेंच लाभलेलें असल्यामुळें तिच्या मुखावर जराशी टवटवी दिसू लागली !

सावळ्या मनोभावें रंगीची सेवा करीत होता. आपल्याला पतीची सेवा करतां येत नाही, उलट आपल्या पतीला आपली सेवाचाकरी करावी लागते, ह्याबद्दल तिला फार वाईट वाटे. ती कारुण्यपूर्ण नजरेनें

त्याच्याकडे पाहात राही. ह्याच निच्या नजरेंत सारें प्रेमसर्वस्व सांठविलें आहे, असें सावळ्याला वाटे.

एके दिवशी सकाळीं मुसंबें सोलीत सावळ्या रंगीजवळ बसला होता. ती आठ नऊ वाजण्याची वेळ होती. त्या दिवशींची हवाही पण सुंदर होती. चारपांच दिवसांवर दिपवाळी आली असल्यामुळें रखमा वाण-सामान आणण्याकरितां शेठजींच्या दुकानी गेली होती. त्यामुळें रंगी आणि सावळ्या ह्या उभयतांना पूर्ण एकांत लाभला होता.

त्या वेळीं मधून मधून रंगी त्या मुसंब्याकडे आणि सावळ्याकडे टक लावून पाहात होती !

सावळ्यानें मुसंब्याच्या फोडी सोलून त्या सगळ्या एका बशीत घातल्या. ती बशी त्यानें एका स्टुलावर ठेवली. आणि रंगीचें डोकें आपल्या मांडीवर घेऊन तो त्यांतील एक फोड तिच्या तोंडांत घालू लागला.

रंगी आज ती फोड आपल्या तोंडांत घेईना !

तिनें सावळ्याकडे पाहिलें. तिच्या टपोऱ्या डोळ्यांत सारा प्राण सांठून आलेला दिसत होता ! ती एकसारखी त्याच्याकडे पाहूं लागली. किती पाहिलें, तरी तिला समाधान वाटेना !

सावळ्याच्या मनाचीही तीच स्थिति झाली होती. तिच्याकडे पाहात असतां त्याचे डोळे भरून आले. एक अश्रुबिंदु तिच्या तोंडावर पडला. तो प्रेमाच्या निर्झरांतील बिंदु रंगीच्या अंतःकरणांत गेला आणि तेथें त्याला भव्यता प्राप्त होऊन तिच्या डोळ्यांतून अश्रुप्रवाहाच्या रूपानें तो बाहेर पडूं लागला ! अंतर्बाह्य प्रेममय जीवनाचा तो एक उत्कृष्ट नमुना होता. त्या वेळीं सावळ्या गहिंवरून म्हणाला,

"रंगे, मी काय करूं ! मी काय बोलूं ! कांहींही म्हण ईश्वरी योगायोग असा होता हूँ ! कोणतं पाप आपण केलं होतं ? साखरगोटीचा तंटा तो कसला आणि तो कोणत्या थराला गेला ! आपण मनांत काय काय योजलं होतं अन झालं काय !

सावळ्याला पुढें बोलवेना. त्याच्या तोंडांतून शब्दच निघेना.

रंगीची स्थिति त्यापेक्षां अधिक करुणास्पद झाली होती. तिच्या तरी तोंडांतून शब्द निघत नव्हताच. अश्रूंचा प्रवाह थांबवावा, म्हणून तिनें

आपले डोळे गच्च मिटून घेतले ! पण त्याच दाबानें आंतून येणाऱ्या अश्रूंचा जोर वाढला ! तिला तो आवरेना ! ती एकसारखे हुंदके देऊं लागली ! काय करते बिचारी ! ह्यापेक्षां तिला काय करतां येणार होतें ! —

अशा रीतीनें कांहीं वेळ गेल्यावर रंगीनें डोळे उघडले आणि हळूच सावळ्याकडे पाहिलें. सावळ्याही डोळे मिटून अश्रू ढाळीत होता. हें पाहून तिच्या पोटांत कालवाकालव झाली आणि ती करुणस्वरांत म्हणाली—

"सावळ्या, मी तरी काय करूं ? पानगांवच्या गढींतच माझा प्राण जायचा ! पण सावळ्या, तुझ्या दर्शनाकरितां जीव जगला ! माझ्या मानसिक संतापाचा परिणाम माझ्या देहावर झाला ! दुःखामागून दुःखें आलीं ! आणि शरिराची बाधा वाढली !"

तिला आतां बोलवेना. तिचें थोडें तरी सांत्वन व्हावें, म्हणून सावळ्या म्हणाला,

"आपण ठरवितों एक आणि होतं दुसरंच ! दैवाचे खेळ आहेत हे रंगे ! पण मला किती वाईट वाटतं; किती दुःख होतं; माझा जीवही मला नकोसा कसा होतो, हें कसं सांगावं तुला ! —"

"सावळ्या" रंगी गंभीरपणें बोलू लागली, "असले विचार मनांत येऊं देऊं नकोस तू ! तूं सुखी असलेला स्वर्गांतून पाहीन मी ! रंगी गेली, तर ती तिच्या कर्मानं गेली असं समज आणि सुखानं संसार कर ! ह्यापेक्षां मी काय बोलू अन कसं बोलू सावळ्या ! —"

"रंगे," सावळ्याही शांतपणें बोलूं लागला— "संसार म्हणजेच जन्माचं सारं सार, असं मला वाटत नाही, रंगे ! एक वेळ माझी तशी इच्छा होती. मला तसं वाटत होतं ! तुझ्या प्रेमांतच दंग होऊन जाणार होतों मी रंगे ! आंबेझरी कांठीं तू मजजवळ बसलीस त्या वेळीं माझं शरीर शहारलं ! मला तसंच सुख जन्मभर व्हावं, असं वाटत होतं ! नाहीं कसं म्हणूं ? पण माझ्या ह्या तरुण वयांत आतां देखील तुझ्या देहाची अशी स्थिति झाली असतांही मला तुझ्याशिवाय दुसरं कांहीं दिसत नाही, रंगे ! माझ्याकरितां तू प्राण ठेवलास ! माझ्यावर आपल्या प्राणापेक्षां प्रेम ठेवलंस ! तें मी कसं विसरूं रंगे ! तूंच सांग मला —"

सावळ्याच्या ह्या उच्च विचारांनीं रंगी अत्यंत गोंधळली. आपण

जरी गेलों, तरी सावळ्यानें मुखानें संसार करावा, असें तिला सांगावयाचें होतें, रखमामामी सावळ्याला योग्य अशी मुलगी शोधून काढील, ह्याची तिला तिळप्राय शंका नव्हती.

जरा वेळानें रंगी म्हणाली——

"माझी इच्छा अपुरी राहील ना सावळ्या! तू दुःखी असलेला मला स्वर्गांतून बघवेल का? तुझ्या घराण्याचा वेल मांडवावर चढला पाहिजे, असं मला वाटत नसेल का? सांग मला माझ्यावर तुझं प्रेम आहे; तर कर माझी समजूत!——"

"रंगे, तुझी समजूत मी काय करणार! तुला माझं मन का कळत नाही?" सावळ्या अगदीं शांतपणें बोलूं लागला, "अग, देशांतील उपाशी मरणारीं पोरंबाळं माझींच आहेत कीं! रंगे, युद्धांतले देखावे काय सागूं तुला! घरीं बायका मुलांना टाकून आलेले वीर रणांगणांत प्राण सोडतांना कितीग तळमळतात! त्या अनाथ मुलांबाळांवर आम्हांला माया करावयास शिकलें पाहिजे, असं सरदार म्हणतात, तें मला पटतं, रंगे!——"

ह्या सावळ्याच्या बोलण्यावर रंगीला उत्तर सुचेना. थोड्या वेळानें सावळ्याच पुढें बोलूं लागला——

"रंगे, सरदारजीचं मन केवढं मोठं आहे, हें दुसऱ्या कोणाला समजणार नाही. ते शीख असले, तरी त्यांचं अंतःकरण मराठ्यासारखं फार उदार आणि मोकळं आहे! अशा थोर माणसांचा सहवास मला लाभला, म्हणून तर तुझी माझी भेट झाली, रंगे!——"

सरदारजींचें नांव निघाल्याबरोबर रंगीचा चेहरा अधिकच खुलला आणि ती सावळ्याकडे नजर टाकीत म्हणाली——

"सावळ्या, मला देखील सरदारजी आपलेच आहेत असं वाटतं. माझ्याजवळ ते बोलत बसले, की मी पुष्कळ दिवस जगेन, असं मला खरंखरं वाटत! त्यांनी माझ्या पाठीवरून एकदां हात फिरविला, तेव्हां काय सांगूं सावळ्या? सांगूच का? मला वाटलं, माझा दादाच माझ्या पाठीवरून हात फिरवीत आहे; आणि खरंच जर का माझा दादा तुझ्यासारखाच मला भेटला, माझ्याजवळ बसला, सरदारजींसारखा त्याचा प्रेमाचा हात माझ्या मस्तकावरून फिरला, तर मी खात्रीनं जगेन. मरणार नाही. असं वाटतं!

सावळ्या माझं शरीर मूळचं रोगी नाही. मनावरील अनंत आघातांचा परिणाम माझ्या शरिरावर झाला! मला माझा पुनर्जन्म होईल, असंही वाटत असतं. सरदार माझ्याजवळ बसून एकदां मला म्हणाले, "इच्छाशक्तीचा परिणाम शरिरावर होतोच होतो." सावळ्या तसं होईल का रे! मी जगेन का रे! ––"

रंगीच्या आरंभीच्या निराशेच्या उद्‌गारात तिच्या डोळ्यांपुढे स्वर्ग येत होता. तेव्हां सावळ्याचेंही मन उदास झालें होतें. आतांच्या तिच्या उद्‌गारांवरून त्याला देखील रंगीविषयी कांहींशी आशा वाटू लागली.

त्याचें लक्ष मुसंब्याच्या फोडीकडे गेलें. त्यातील एक फोड तिच्या तोंडांत तो पुन्हा घालू लागला. मान हलवीत ती पुन्हा अं! हं! म्हणून सावळ्याच्या तोंडाकडे पाहूं लागली. तेव्हां सावळ्या म्हणाला––

"तुला जगायचं आहे ना? मग माझ्या हातचं हें अमृत घे कीं! –"

"मी घेतेंच की तें! पण माझ्या हातीं एक चांगली फोड द्या बरं! ––"

सावळ्यानें त्याप्रमाणे केलें. ती दुसरी फोड तिनें हातांत घेतली. आणि ती हंसत हंसत म्हणाली––

"ही माझ्या हातची फोड आपण पण तोंडांत घ्यायची! ––"

सावळ्यानें तोंड खाली केलें, तिनें ती फोड त्याच्या तोंडांत घातली. तिनेंही त्याच्या हातची फोड आपल्या तोंडांत घेतली. दोघांना अननुद्‌भूत असा आनंद झाला!

लगेच सावळ्या खालीं वाकला आणि त्यानें आपले ओंठ तिच्या गालावर ठेविले!

दोघांच्या अंगावर एकदम शहारे आले!

तो विषयानंद नव्हता! तशा स्थितींत तो असणेंही शक्य नव्हतें! तो स्वर्गीय दिव्य प्रेमानंद होता!

इतक्यांत तेथें रखमा आली. तिच्या डोक्यावर भली मोठी पाटी होती. तिच्या अंगांत कोपरापर्यंत चोळी होती. तिनें डोकीवरून पदर घेतलेला होता. तिच्या रुंद सितळ कपाळावर ठसठसीत कुंकू शोभत होतें.

ती रंगीच्या खोलीच्या दारांत पाटी ठेवून म्हणाली––

" रंगे, किती ग उशीर झाला मला ! दिवाळीचं वाणसामान आणलंय मी ! --"

त्या वेळीं सावळ्या रंगीच्या खाटेवरून उठला होता. रखमा रंगीजवळ गेली. तिनें तिच्या तोंडावरून हात फिरविला, आणि ती म्हणाली—

" रंगे, आज तुझं तोंड चांगलं निवळलेलं दिसतंय मला ! माझी गुणाची पोर ! जगणार बरं का, तूं आतां ! --"

रंगी कांहींच बोलली नाहीं. ती मनांत हंसत होती. रखमाच पुन्हा म्हणाली--

" रंगे, तुझ्या पथ्यपाण्याचं विसरलें कीं मी ग ! सावळ्यानं तुला कांहीं दिलं का ग ! -- अन रंगे, सरदार भाऊजी दाराबाहेर उभे होते. त्यांना ग का तुम्ही खोलींत हांक मारली नाहीं ? गुज गुज गोष्टी करीत बसला होता वाटतं ?--"

सावळ्या मनांतल्या मनात हंसूं लागला.

सरदार दाराबाहेर उभे होते, तेव्हां त्यांच्या कानी आपलें बोलणें पडलें कीं काय, अशी शंका सावळ्याला आली.

तो झटकन खोलींतून बाहेर निघाला. त्या वेळी सरदारजी आपल्या खोलींत शिरत असलेले त्याला दिसलें. त्यांनीं आपला हातरुमाल डोळ्यास लावला होता कीं काय, अशी त्याला शंका आली !

त्याच वेळीं सदोबा मळ्यांतून घरी आले होते. त्यांनी गाईचें दूध काढून आणलें होतें. ते रंगीच्या खोलींत आले आणि म्हणाले--

" रंगे, उद्यां वसूबारस आहे, आपली गाय पूजेकरितां मी घरीच घेऊन येणार आहें. तूं तिची पूजा केली पाहिजेस. तिचे ताजं दूध मृत्युलोकीचं अमृत आहे. तें तूं दररोज घे तरी ! खात्रीनं जगशील तू ! विठोबाची इच्छा दिसते तशी ! आज तुझं तोंड टवटवीत दिसतयं मला !"

रखमा तेथून उठली आणि सदोबांना एका बाजूस नेऊन त्यांच्या कानांत कांहींसें कुजबुजली. तेव्हां सदोबा म्हणाले--

" उगाच कांहीं बोलूं नको ! विठोबाच्या मनांत असेल तसं होत असतं ! लवकर भाकरी टाक. मला मळ्यांत जायचं आहे. मी सरदारजींना दूध नेऊन देतों. त्यांच्याकडे आज कोणीच पाहिलं नाहींसं दिसतं --"

## आशीर्वाद

## २५

सरदारांच्या दररोजच्या न्याहारीची व्यवस्था सावळ्या बिनचूक करीत असे. पण आज रंगीशीं बोलत असता किती वेळ गेला, ह्याचें त्याला भानच राहिलें नाहीं. म्हणून त्या वेळीं सरदारच आपल्या खोलीतून रंगीच्या खोलीच्या बाजूस सावळ्याचा तपास करण्याकरितां आले होते.

रंगीच्या खोलींत फक्त सावळ्या आणि रंगी ही जोडी आहे. त्यांच्यांत मनमोकळें बोलणें चाललें आहे. हें खोलीच्या दाराशीं येतांच सरदारांच्या लक्षांत आलें आणि ते तेथें थबकले.

त्यांच्या बोलण्यांतील श्रेष्ठ प्रतीची विचारसरणी कानांवर पडल्यामुळें त्यांना त्या जोडीचें विशेष कौतुक वाटलें. आणि त्या दोघांचा तो मनःपूर्वक चाललेला संवाद ऐकण्याचा मोह सरदारजींना अनावर झाला !

रखमा घरीं आल्यामुळें सरदारांना आपल्या खोलींत निघून जावें लागलें खरें, पण त्यांच्या कानांत सावळ्या आणि रंगी यांचा ऐकलेला संवाद एक-सारखा घुमत होता ! त्यामुळें मधून मधून त्यांना कांहींसें वाईटही वाटे. त्यांचे डोळे ओले होत ! पण कांहीं वेळानें त्या ऐकलेल्या संवादाचा त्यांना अतिशय आनंद वाटला. आणि ते मनांत म्हणूं लागले—

"रंगीच्या शिक्षणाची मला जी माहिती झाली आहे, त्यावरून तें जुजबी लिहिण्यावाचण्यापुरतेंच आहे. मात्र तिनें हरिविजय, भक्तिविजय असें जुनें वाङ्मयच बरेंच वाचलें आहे. पण ह्या एवढ्या शिक्षणानें तिचे विचार इतके उच्च कसे झाले, ह्याचें कोणालाही आश्चर्य वाटेल. पण मला असें वाटतें कीं, पिढ्यान् पिढ्या अंगीं मुरलेल्या श्रेष्ठ आर्य संस्कृतीचा तो परिपाक आहे."

"तीच गोष्ट सावळ्याची ! त्याचें शिक्षण रंगीपेक्षां अधिक आहे, हें खरें, पण त्यामुळेंच त्याचे उच्च विचार बनले आहेत, असें मला वाटत नाहीं. ती त्याची अभिजात मनोवृत्ति होय ! "

रंगीच्या आयुष्याची दोरी तुटत आली असावी, असें जरी वाटत असलें, तरी काय नेम सांगावा, तिला जर मानसिक पूर्ण स्वास्थ्य लाभलें तर, ती जगेलही —"

"आणि ती जगावीच असं मला वाटतं. कां वाटतं, हें उघड करून मला अद्यापि सांगतां येत नाही ! माझ्याविषयी ज्याचें त्याचें मन मात्र साशंक असावं, असं दिसतं ! म्हणून चार पांच दिवस थोडा बाहेरगांवी फेरफटका करून यावें. एकादा उत्कृष्ट वैद्य मिळाल्यास त्यालाही आणावें."

ताबडतोब सरदार प्रवासाच्या तयारीस लागले.

सरदार कर्तारसिंग ह्यांनी प्रवासाची तयारी चालविलेली पाहून जो तो काळजींत पडला ! आपल्या हातून त्यांचा कांही अपमान झाला की काय, त्यांच्या शीख पद्धतीप्रमाणें त्यांच्या जेवण्याखाण्याची व्यवस्था झाली नाहीं कीं काय, त्यांच्या मनाविरुद्ध कोणाची वागणूक झाली कीं काय, असें ज्याला त्याला वाटू लागलें.

सावळ्या आणि रंगी यांची तर स्थिति अतिशय चमत्कारिक झाली. सरदारांचा करारी स्वभाव माहीत असल्यामुळें सावळ्याला कांही बोलतां येईना. पण ते दुसऱ्या दिवशीं पाहाटेस निरोप घेण्याकरितां रंगीजवळ आले, तेव्हां ती धिटाईनें पण करुण स्वरांत म्हणाली—

" सरदार दादा, गरिबाच्या घरांतली भाजीभाकरी गोड करून घेतलीत. मला कित्ती कित्ती बरं वाटलं ! पण आत्तांच आपण निघालांत. भाऊबीज झाल्यावर आपल्याला जातां आलं नसतं का ?—"

त्या वेळीं रंगीच्या डोळ्याला पाणी आलें. सरदारांचे डोळे पण ओले झाले. काळ्या चष्म्यामुळें त्यांची ती स्थिति रंगीच्या लक्षांत आली नाहीं. थोड्या वेळानें आपल्या लहान बहिणीशीं बोलावें, त्याप्रमाणें तिच्या पाठीवर हलकेच हात ठेवून सरदार बोलूं लागले,

" ताई, तुझ्याकरितांच मी दोन तीन आठवडे इथं राहिलों. सावळ्या-मुळंच तुझी ओळख झाली. तुझ्या गोड गुणामुळं मी तुला आपली धाकटी

वहीण समजलों. आतां तुला बरं वाटूं लागलं आहे. मलाही माझे कोणी आप्त इष्ट नाहीत का?. चार दिवस त्यांच्याकडे जाऊन यायला नको का?——"

सरदारांच्या ह्या बोलण्यापुढें रंगीला काय बोलतां येणार होतें? आपल्याला सरदार ताई म्हणाले, आपल्याला त्यांनीं धाकटी बहीण म्हटलें, त्यांनीं आपला केवढा गौरव केला, असें वाटून ती नुसती आनंदानें फुलून गेली! पारिजातकाच्या आदले दिवशीं सायंकाळी आणून ठेवलेल्या कळ्या दुसऱ्या दिवशी प्रभातकाळीं फुलून जसा त्यांचा घमघमाट सर्वत्र पसरतो, तशी तिच्या मनाची स्थिति झाली. तिचें मन पूर्ण सुगंधमय आणि आनंदमयही झालें!

तशा स्थितींत थोडा वेळ गेल्यावर रंगी भानावर येऊन आपला हात सरदारांच्या हातावर ठेवीत म्हणाली——

"पण भाऊबिजेला याल ना परत? दादा, आपल्या धाकट्या बहिणीचा एवढा हट्ट पुरवाच तुम्ही! सावळ्या आणि तुम्ही मला जीवदान देतां आहांत! आतां मी जगणार, असंच मला कालपासून वाटतंय!——"

—आणि काय सांगावें, एवढा मोठा युद्धांत पराक्रम गाजविलेला शीख सरदार रंगीच्या ह्या बोलण्यानें विरघळला. प्रेमाच्या ह्या लहानशा धाग्यानें त्या धीरगंभीर सरदारांना बद्ध करून टाकलें. मनमोकळे-पणानें परत येण्याची कबुली देऊन त्यांनीं साऱ्यांचा निरोप घेतला!

रंगीला त्रास होणार नाही, सावळ्याला पसंत पडेल आणि सदोबाला पण आवडेल, अशी दिवाळीची त्यांतल्या त्यांत भाऊबीजेची तयारी करण्यास रखमानें कंबर बांधली.

  

ठरल्याप्रमाणें सरदार दिवाळीच्या पाडव्याच्या आदल्या दिवशीं सायंकाळीं तांतडीनें परत आले. ते पुण्याहून आले होते. त्यांनीं आपल्याबरोबर पुष्कळसें सामान आणिलें होतें. फळांच्या टोपल्यांची तर रेलचेल त्यांच्या सामानांत होती!

हा सर्व प्रकार पाहून रखमा भांबावूनच गेली!

विशेष आश्चर्याची गोष्ट ही कीं, त्यांनीं आपल्याबरोबर मानसोपचार-पद्धतीचे तज्ज्ञ आणि आयुर्वेदांत निष्णात असे एक वैद्य आणले होते.

त्या वैद्यांनीं दुसऱ्या दिवशीं रंगीची प्रकृति काळजीपूर्वक तपासली. पूर्ण विचारांतीं त्यांनीं तिच्या रोगाचें निदान पण ठरविलें.

" मानसोपचारपद्धतींचा आणि आयुर्वेदीय औषधांचा परिणाम रंगीच्या प्रकृतीवर चांगला होईल आणि तिची प्रकृति क्रमाक्रमानें सुधारेल " हें त्या प्राणाचार्यांनीं सांगितलेलें निदान होतें !

मात्र जातां जातां ते एवढें म्हणाले कीं, " जितकें आनंदी वातावरण ह्या मुलीला अधिकाधिक लाभेल, तितकी हिची प्रकृति झपाट्यानें सुधारेल ! — "

पाडव्याच्या दिवशीं सकाळीं रंगीची प्रकृति पाहिल्यावर तिला बहुमोल औषधें देऊन नऊ वाजण्याच्या सुमारास ताबडतोब वैद्य निघून गेले !

त्याच दिवशी पाडवा पण होता आणि भाऊबीजही होती !

आतां सरदारांच्या मनाचा एक ठाम निश्चय झाला. त्यांनी त्याच दिवशीं एक गोष्ट निश्चितपणें करण्याचें ठरविलें. ह्यापूर्वीं तसें करावें, असा त्यांच्या मनाचा पक्का निश्चय होत नव्हता. अशाच स्थितींत आणखी काल काढावा आणि ह्यापेक्षां उत्तम संधि मिळाल्यास ती साधावी, असें त्यांना वाटत होतें !

पण प्राणाचार्यांनीं जातां जातां रंगीच्या प्रकृतीविषयीं आशाजनक उद्‌गार काढल्यामुळें आणि तिला अधिकाधिक आनंदी वातावरण लाभावें, असें म्हटल्यामुळें सरदारांनीं आजच काय करावयाचें तें ठरवून टाकलें !

त्यांनीं जुन्या वयस्क अशा एका न्हाव्याला बोलावून आणण्यास साव-ळ्यास सांगितलें.

सरदारांच्या ह्या वागणुकीचा सावळ्यास कांहीं बोधच होईना !

शीख पथाप्रमाणें कांहीं विशिष्ट मुदतीनंतर डोकीवरील केशसंभार उतरावयाचा असतो. आज पंधरा वर्षें पूर्ण होत आहेत. तेव्हां तो विधि करणें जरूर आहे, असें कांहीं तरी सरदारसाहेबांनीं सावळ्यास सांगितलें !

सावळ्या आंबेगांवांतील वयोवृद्ध अप्पा न्हाव्यास बोलवावयास गेला.

त्यानें त्याला सरदारांकडे पाठवून दिलें आणि आपण मळ्यांत सदोबांना मदत करण्यास गेला.

आज दुपारींच पुरणपोळीचें जेवण करण्याचें रखमानें ठरविलें होतें. मळ्यांतील कामें संपवून सदोबांना दुपारीं जेवणाकरितां घरीं आणावयाचें काम सावळ्याला करावयाचें होतें.

अप्पा न्हाव्यानें गावच्या जुन्या गप्पा छप्पा सांगत सरदारांचा केशसंभार उतरण्याचें काम चालू केलें. सध्यां आबा मोऱ्यांच्या मानगुटीवर भुतें बसलीं आहेत. हिंमतराव आणि हैबतराव यांची दोन्ही भुतें त्यांचा बळी घेणार, असें तो सांगत होता !

सरदार 'हूं' म्हणून साऱ्या गोष्टी ऐकत होते. बोलत बोलत अप्पानें त्यांचे सारे केस काढले.

त्या वेळी सरदारांनीं आपला काळा चष्मा काढून ठेवला होता !

आपलें काम पुरें झाल्यावर अप्पानें सरदारांकडे पाहिलें. त्या वेळीं तो एकदम मनांत चरकला ! त्याला काय बोलावें, हें समजेना !

सरदारांनीं त्याची झालेली मनःस्थिति जाणली. त्याच्या हातांत एक रुपया टाकला, आणि लगेच रामराम करून त्याला वाटेला लावलें !

खेडेगांवच्या असल्या कांहीं कारागिरांच्या तोंडीं कोणतीच गुप्तता राहात नाहीं. नसत्या गप्पा काय, किंवा कंड्या काय, त्यांच्यापासून निघतात. गांवभर पसरतात. त्यांनीं भांडणतंटे लागतात. किंवा कधींकधीं चाललेले तंटेबखेडे वाढतात.

अप्पा ज्याच्या त्याच्याकडे जाऊन सांगूं लागला, " सावळ्याच्या घरीं आलेले सरदार शीख नव्हेत ! ते हिंमतराव मोरे आहेत ! आतांच मीं त्यांचे केस काढले ! त्यांना मी ओळखलें ! त्यांनीं मला रुपया पण दिला ! मोठे उदार गृहस्थ आहेत ते ! लहानपणापासून त्यांची मला माहिती आहे ! आपलं गांव ते सुधारतील ! मोठा पराक्रम गाजविला आहे त्यांनीं !—"

किती तरी लोकांना ही बातमी त्यानें सांगितली.

दुपारची वेळ होती ती ! बारा वाजून गेले होते त्या वेळीं ! सूर्य जगाकडे चांगले उघडे डोळे करून पाहात होता !

हिंमतरावांच्या बातमीचा आंबेगावांत ज्याला त्याला अचंबा वाटला! मगनशेठ, गुंडभट ह्यांना त्या बातमींत प्रखरपणा दिसून येऊं लागला!

अप्पानें सांगितलेली बातमी खरीच असावी, असें जरी मगनशेठना वाटत असलें, तरी तिचा खरा पडताळा पाहावा, असें त्यांनीं मनाशीं ठरविलें. कारण, अप्पा हा केव्हां केव्हां अशाच कंड्या पिकवितो; थापा मारतो; भांडणें लावतो; असा त्याचा जुना लौकिक होता!

मगनशेठनीं थोडा विचार केला. त्यांच्या डोळ्यापुढें एक मूर्ति आली. त्यांनीं गुंडभटांना दुकानांत बोलावलें. आणि त्यांना सावळ्याच्या घरीं जाऊन खरी गोष्ट पाहून येण्यास सांगितलें.

त्या वेळीं गुंडभट म्हणाले—

"नको रे बाबा, सावळ्याचं घर! सावळ्या बरा माणूस आहे. पण रखमा फार द्वाड आहे! ती माझा अपमान देखील करील!—"

"पण तो भोळा वारकरी सदोबा आहे ना? त्याची तुम्हां ब्राह्मणांवर श्रद्धा आहे. आणि खराच त्या घरीं हिंमतराव आला असेल, तर तो आपला सूड घेईल कीं! मग आपल्याला सदोबांचे पाय धरले पाहिजेत गुरुजी! जा तुम्ही! त्वरा करा! ही घ्या तुमची पाडव्याच्या दक्षिणेची पावली! तपास करून या तर लवकर!"

मगनशेठनीं गुंडभटास अशा प्रकारें बोलून चढविलें!

त्यामुळें खांद्यावर उपरणें टाकून तंबाखू चघळीत चघळीत गुंडभट सावळ्याच्या घराकडे निघाले. त्यांच्या हातीं कोरी करकरीत पावली पडल्यामुळें त्यांना आनंदही झाला होता!

भुजंगराव आणि आबा यांनीं पुष्कळ खर्च केल्यामुळें त्यांचीं कृत्रिम नाकें चांगलीं दिसत होतीं. गुंडभटाचें नाक तसें कांहीं फारसें गेलें नव्हतें. अगोदर त्याच्या नाकास शेंडाच बेताचा होता. तोही कापला गेल्यानें फार मोठा फरक झाला, असें गुंडभटास वाटत नव्हतें. जास्त पैसे खर्चून गेलेलें नाक सुधारण्याइतका खुळेपणा आपल्यास करावयाचा नाहीं, असें त्यानें साफ सांगितलें होतें! वाटेनें जातां जातां त्याच नाकांत त्यांनीं तपकीरही कोंबली!

सावळ्याच्या घरीं पाय टाकतांच गुंडभटानें विचारलें—

"सावळ्या घरीं आहे का?—"

गुंडभटाचे हे शब्द स्वयंपाक करीत असलेल्या रखमाच्या कानांवर गेले. पण गुंडभटावर तिचा कमालीचा राग असल्यामुळें तिनें उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें गुंडभटांनीं सदोबांस हाक मारण्यास सुरुवात केली. तरीही रखमानें उत्तर दिलें नाही. सावळचा आणि सदोबा घरीं नव्हतेच, तर ते तरी कसे उत्तर देणार ?

कोणीच उत्तर देत नाहींत, असें पाहून गुंडभट रागावले आणि जरा तोऱ्यांतच म्हणाले—

"किती माजलीत माणसं हीं ! कोणीच उत्तर देत नाहीं ! —"

हे गुंडभटाचे शब्द ऐकतांच रखमा भडकली ! ती पोळ्या करीत होती. तिच्या हातीं लाटणें होतें. तेंच हातीं घेऊन ती झटकन पुढें आली आणि तें हातांतील लाटणें भटजीवर उगारून ओरडत बोलली—

कुणाला र माजलीत म्हणतोस भटा ! घरांत पुन्हा पाय ठेवशील, तर तंगडीच मोडीन तुझी ! लबाड ! दुष्ट ! चालत्या गाड्याला खीळ घालणारा ! कुठंर हीं पापं फेडशील, भटा ! —"

गुंडभट अगदीं सर्दच झाला ! तो मदतीकरितां इकडे तिकडे पाहूं लागला. केशसंभार उतरलेल्या सरदारांनीं त्याच्याकडे खोलीच्या दारांत येऊन पाहिलें. त्यानेंही सरदारांना पुरें ओळखलें. तो दिङ्मूढ होऊन गेला !

ह्याच वेळीं सदोबा आणि सावळचा मळ्यांतून घरीं आले. रखमा भटजींवर लाटणें उभारून उभी आहे, कदाचित् ती तें त्यांच्या अंगावर फेकील देखील, हें जाणून सदोबा म्हणाले—

"अग, ए ! तुला कळतंय का कांहीं ! ब्राह्मण देवासारखे आहेत आपल्याला ! —"

"असतील चांगले ब्राह्मण ! नाही कुठं म्हणते मी ?" रखमा आपल्या वागण्याचें समर्थन करूं लागली, "पण मला ठाऊक आहे, हा भट तसला नाही. मेला राक्षस आहे हा ! —"

रखमा इतकें बोलली आणि झपाट्यानें स्वयंपाकघरांत निघून गेली.

गुंडभटही चरफडतच दाराबाहेर पडले !

सावळ्याला गुंडभटाशीं तंडण्याची जरुरी वाटली नाही. तो घरीं आल्याबरोबर रंगीच्या खोलींत गेला होता.

सरदारांचे केस निघाले होते ! त्यांनीं आपला काळा चष्मा काढून टाकला होता ! त्यांनीं मराठ्यांचा नेहमीचा पेहरावच धारण केला होता ! तशा स्थितींत त्यांना पाहिल्याबरोबर सदोबा एकदम म्हणाले—

"हिंमतराव किती परीक्षा पाहिलीत हो आमची तुम्हीं ! मी पण तुम्हांला तऱ्हेगांवींच ओळखलं होतं ! पण बोललों नाहीं कुणाशीं ! पंढरीनाथ तशी बुद्धि देत नव्हता मला ! आज देवानं तुमची भेट करून दिली ! भाग्याचा दिवस त्यानंच दाखविला आम्हाला ! विठ्ठल रखुमाई ! विठ्ठल रखुमाई ! अगाध करणी तुझी ही ! —"

हिंमतराव मोठ्यानें मनापासून हंसत हंसत म्हणाले,

"सदोबा, बरोबर आहे तुमचं म्हणणं ! विठोबाची कृपा म्हणूनच तुमचं दर्शन झालं —"

त्यांनीं खालीं वाकून सदोबांच्या पायांवर आपलें मस्तक पण ठेवलें. त्या वेळीं सदोबांनीं "विठ्ठल ! विठ्ठल ! विठ्ठल ! " असें म्हणत आपले हात जोडले होते !

सदोबांनीं हिंमतरावांना उठविलें आणि ते मोठ्यानें म्हणाले—

"अग ए, इकडे कोण आलंय बघ तरी ! अग हे हिंमतरावच ! तूं मजजवळ कुजबुजत होतीस, तेंच खरं ! मगनशेठनेंही ओळखलं होतं यांना !"

रखमा पुढें आली. हिमतरावास तिनें नखशिखांत अवलोकन केलें !

ती लाजली. तिनें डोकीवरचा पदर सरळ केला. आणि धांवतच रंगीच्या खोलींत जाऊन ती हळूच आपली मान हलवीत म्हणाली—

"रंगे, अग रंगे ! खरंच तुझा दादा आलाय ग ! खरंच आलाय ग !"

सावळ्या जवळच होता. त्यानें रखमाचे हे शब्द ऐकले. तो अत्यंत आश्चर्यचकित झाला !

इतक्यांत सरदारसाहेबांना हाताशीं धरून सदोबाच तेथें आले.

"सरदारसाहेब म्हणजेच रंगीचे दादा ! हिंमतराव हे ! काय पाहातों आहें मी हें !"

सावळ्याच्या तोंडून हे उद्गार निघाले आणि तो हिंमतरावाकडे पाहातच उभा राहिला.

नंतर सावळ्या पुढें जाऊन हिंमतरावांना कडकडून भेटला !

साऱ्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रु वाहूं लागले !

रंगीला वाटलें, "आतां आपण स्वर्गसुखांतच आहोंत. ह्यापेक्षां स्वर्गसुख तें काय अधिक असणार !"

तिनें हिंमतरावांच्या पायांवर डोकें ठेवलें.

"शतायुर्भव" असा मनापासून हिंमतरावांनी तिला आशीर्वाद दिला.

## 'अवघाचि संसार सुखाचा करीन' २६

हिंमतराव प्रकट झाल्याची वार्ता आंबेगांवांत लागलीच पसरली हिंमतरावाची खरी हकीकत त्याच्या लहानपणच्या स्नेह्यांसोबत्यांना माहीत होती. हिंमतरावांनीं हैबतरावांचा खून केलेला नव्हता. त्यांच्यावर फक्त तो आरोप होता. खून निराळ्याच माणसानें केला होता. ो खून कदाचित् आबांनींच केला असावा, असें लोक बोलत असत. पुढें पुढें तर त्यांनींच हें राक्षसी कृत्य केलें, अशी लोकांची खात्री झाली.

पण त्या खटल्याच्या चौकशींत आबांच्या पाताळयंत्रीपणामुळें आलेला पुरावा वेगळाच होता. त्याच पुराव्याच्या जोरावर हिंमतरावांना पकडून नेलें होतें !

हिंमतराव तुरुंगांतून निसटून गेल्यानें ती खुनाची केस अर्धवटच राहिली होती ! त्यानंतर गुप्त पोलिसांनीं केलेल्या तपासांत हिंमतराव दोषी ठरणें कठीण झालें होतें !

अशा प्रकारें त्या खटल्याची वाताहत झाल्यासारखी झाली. पुढें कांहीं वर्षांनीं तर हिंमतराव स्वर्गवासी झाल्याची खात्रीची माहिती आबांना कळली ! त्यांनीं त्यांचें क्रियाकर्मांतरही उरकून घेतलें !

हिंमतरावांनीं करून ठेवलेलें मृत्युपत्र आपल्याजवळ आहे, असें सांगून आबांनीं एक बनावट मृत्युपत्र पुढें केलें. आणि हिंमतरावांचा सगळा जमीनजुमला, घरदार आणि जें कांहीं होतें नव्हतें तें, युक्तिप्रयुक्तीनें, अनेक वशिले लावून, पाण्यासारखा पैसा खर्च करून, आपल्या नांवानें करून घेतलें !

असल्या वेड्यावाकड्या कामास मदतनीस लागतातच. ह्या कामीं

आबांना गुंडभटाची पुष्कळच मदत झाली होती ! मगनशेठनींही रागरंग पाहून आबांच्या ह्या कृत्याला थोडाबहुत हातभार लावला होता !

हिंमतरावांचें जीवित व वित्त अशा प्रकारें ह्या जगांतून पार नाहींसें झालें होतें !

आणि तेच हिंमतराव आंबेगांवीं येऊन राहातात. राजरोसपणें वावरतात. ह्यामुळें तर आंबेगांवचे लोक अत्यंत चकित होऊन गेले असल्यास त्यांत नवल नाहीं !

हिंमतरावांना भेटण्याकरितां दुपारपासून सावळ्याच्या घरीं लोकांची रीघ लागून गेली ! त्यांच्याबरोबरीच्या मंडळीच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले. त्यांच्यापेक्षां वयाने वडील असलेल्या मंडळींनी त्यांचें शुभचिंतन केलें. नवीन तरुण मंडळींना तर सरदार कर्तारसिंग ह्या नांवानें त्यांनीं केलेल्या पराक्रमामुळें त्यांच्याविषयीं अत्यंत आदर वाटून त्यांनीं त्यांना अभिवादन केलें.

सबंध आंबेगांव ह्या पाडव्याच्या दिवशीं हिंमतरावांच्या जुन्या आठवणी आठवून आणि त्यांना समक्ष पाहून आनंदित होऊन गेला !

मात्र एकच व्यक्ति अशी होती की, तिला हिंमतरावांच्या प्रकट होण्यानें अत्यंत दुःख झालें असतें ! काळजीही पण वाटली असती ! आतां कोणती संकटपरंपरा आपल्यावर कोसळते, ह्या विवंचनेनें तिची स्थिति भ्रमिष्टासारखी झाली असती ! ती व्यक्ति दुसरी कोणती नसून आबांचीच होय !

पण ह्यापूर्वींच हिंमतराव आणि हैबतराव ह्यांच्या भुतांच्या कल्पनांनीं त्यांचें माथेंच फिरलें असल्यामुळें आणखी ह्यापेक्षां आबांची दुःस्थिति ती कोणती होणार होती !

हिंमतराव प्रकट झाल्याची वार्ता ऐकून सायंकाळच्या वेळीं गौराबाईही सावळ्याच्या घरीं आल्या. आबांच्या भ्रमिष्ट स्थितीमुळें त्या अगदीं रडकुंडीस येऊन गेल्या होत्या. त्या आपल्याच नशिबाला दोष देत होत्या.

त्यांना हिंमतरावांची जुनी हकीकत फारशी माहीत नव्हती. हिंमतराव नापत्ता झाल्यानंतर कांहीं वर्षांनीं गौराबाईंचा विवाह झाला होता. आबांचा तो बऱ्याच उशीरा झालेला विवाह होता. आबा आणि हिंमतराव ह्या चुलत्या पुतण्यांत वयाचें फारसें अंतर नव्हतें. त्यामुळें हिंमतराव पुतणे

वाटण्यापेक्षां गौराबाईंना ते आपल्या वडील भावासारखे दिसले. त्यांच्या प्रकट होण्यानें आपल्या जिवाभावाचा एक आधारच लाभला, असें त्यांना वाटलें.

रंगीवर गौराबाईचें प्रेम होतें. तिच्यावर दुर्दैवानें ओढवलेला भुजंगरावांशीं लग्न लागल्याचा कलंक पण धुऊन निघालेला होता. सावळ्या तेथें आलेला होता; आणि आतां तिचा वडील भाऊ पण तिला भेटला होता. ह्यामुळें आपलें दुःख एका बाजूस सारून गौराबाई रंगीजवळ येऊन तिला ममतेनें म्हणाल्या——

" रंगू, तुझं नशीबच थोर ! मला वाटतच होतं तसं ! पण मध्यें बाई, तुला पण दैवानं छळलं ! फार हाल झाले तुझे ! आतां देवानं तुला चांगले दिवस दाखविले ! मला पण किती किती बरं वाटलं ! सारे नशीबाचे खेळ आहेत हे ! कधीं उन्हाळा कधीं पावसाळा !——"

गौराबाईंना पुतण्या प्रकट झाल्याचें समाधान वाटत होतें. त्याचप्रमाणें रंगीची प्रकृति सुधारून तीही आनंदी होईल, अशी त्यांची अपेक्षा होती. त्यामुळें रंगीसंबंधानें त्या अशा कौतुकानें बोलत होत्या. पण त्यांच्या मनांत स्वतःच्या विचित्र गृहस्थितीचें चित्र उभे राहात असल्यामुळें सहाजिकच त्यांचें मन बोलतांना द्विधा झालेलें दिसत होतें. तें रंगीच्या लक्षांत आलें आणि ती म्हणाली——

" काकू, तुमच्या आशीर्वादानंच सगळं कांही माझं चांगलं होत आहे. पण मला एक काळजी वाटते, ती आबांच्या प्रकृतीची ! त्यांची प्रकृति थोडी थोडी सुधारत आहे ना ?—— "

रंगीचे सहानुभूतीचे उद्गार ऐकून गौराबाई गहिंवरल्या. त्यांच्या पतिराजामुळेंच रंगीला मनस्वी त्रास झाला होता ! त्यांनीं तिचे हाल व्हावे अशा पुष्कळ खटपटीही कळत न कळत केल्या होत्या ! असें असूनही रंगी त्यांच्या संबंधानें आपलेपणानें बोलत असल्याचें पाहून त्यांना तिच्या मनाचा मोठेपणा कळला. त्या थोड्या ओशाळल्याही ! आणि दुःखी स्वरांत रंगीला म्हणाल्या——

" काय बाई सांगू तुला त्यांची हकीकत ! शुद्धीवर असतात तेव्हां ते बरें बोलतात ! नाहींतर, " भूत भूत " म्हणूनच ओरडत असतात ! ते

मळ्यांत गेले, तर साखरगोटीकडे जातात ! तिची लाकडेही फोडतात ! पण मध्येंच भूत भूत म्हणून नाचत सुटतात ! पण आज बाई काय सांगू ? त्या मेल्या अप्पानं घरांत येऊन काय सांगितलं, कुणाला ठाऊक ! तेव्हांपासून ते "भूत भूत" म्हणून एकसारखे नाचतात ! ओरडतात ! रडतात देखील ! आज तोंडांत अन्नाचा घास पडला नाहीं त्यांच्या ! तुझे दादा आले, असं मला कळलं ! मला बरं वाटलं ! म्हणून मी इकडे आलें !. पण रंगे मारा जीव त्यांच्याकडे लागलाय ! काय होईल तें कळत नाहीं ! सारे दैवाचे खेळ ! तें नाचवील तसं नाचलं पाहिजे, बाई !—"

गौराबाई निराशेनें बोलत होत्या. त्यांच्या मनांत पुतण्याच्या प्रकट होण्यानें थोडा आशातंतु उत्पन्न झाला होता. आपल्या पतीला त्यांचा खरा पुतण्या भेटला, तर त्याच्या विषयीची तरी आपली पतीची भुताची कल्पना नाहींशी होईल, असें त्यांना वाटत होतें. म्हणून त्या हळूच आणखी रंगीला म्हणाल्या,

"रंगू, तुझे दादा, चांगले आहेत म्हणतात ग ! त्यांनीं एकदां समक्षच भेटून त्यांची समजूत काढली, तर नाहीं का बरं होणार ?—"

"काकू, खरंच सांगू तुला !" रंगी विश्वासपूर्वक म्हणाली. "माझा दादा देव आहे देव ! तो कोणाचा द्वेष करीत नाही. करणार पण नाही ! तो आबांना भेटेल देखील ! पण काकू, ताप आलेल्या माणसाला गोड घास देखील कडू लागतो ग ! तसं न व्हावं म्हणजे झालं !—"

गौराबाईनीं आणि रंगीनेंदेखील एक दुःखाचा सुस्कारा सोडला.

इतक्यांत आबांच्या घरचा गडी गौराबाईना बोलवायला आला. त्यानें सांगितलें—

"आबासाहेब, स्वयंपाकघरांत जाऊन पाटावर बसले आहेत. जेवणाची वाट पाहात आहेत ते !—"

अद्यापि गौराबाईनीं स्वयंपाक केला नव्हता ! दिवसभर त्या उपाशीच होत्या ! आबा तर जेवण्याची गोष्टच काढीत नव्हते !

रंगीला ही गोष्ट कळल्याबरोबर तिनें रखमाला हांक मारली. तिला सारी हकीकत सांगितली. रंगीच्या आग्रहावरून तिनेंही पण कांहींशा

खुषीनें आणि काहींशा नाखुषीनें दोघांच्या जेवणाचें भरगच्च वाढण गड्याजवळ दिलें !

गौराबाईचें हृदय भरून आलें.

गौराबाई गेल्यावर रंगीनें समाधानाचा सुस्कारा टाकला !

कोणत्याही कारणानें का होईना, लहानपणी आबांनी रंगीला चांगलें सांभाळलें होतें. तिचे लहान सहान हट्ट पुरविले होते. स्वार्थसिद्धीकरिता नंतर तिच्या आयुष्याचें मातेरें करण्यांत त्यांनीं मोठा भाग घेतला होता, हें खरें. पण तेवढयामुळें आबांनीं केलेले प्रेम रंगी विसरली नव्हती. दुष्टाच. दुष्टपणा विसरून त्याच्या चांगलेपणाकडे पाहाणें ही गोष्ट कठिण असते. पण रंगीचें अंतःकरणच मोठें होतें. म्हणून तिला तसें पाहातां येत होतें !

तिच्या मोठेपणाचा आणखी प्रत्यय त्याच रात्री आला.

हिंमतरावांना भेटण्याकरितां त्या दिवशीं पुष्कळ लोक आले होते त्यामुळें रात्रीच्या जेवणास त्यांना उशीर झाला होता. पंधरा वर्षांनीं भावाला ओवाळण्याची सुसंधि तिला प्राप्त झाली होती. त्यामुळें आपल्या दादांना आपण केव्हां ओवाळतों, असें तिला होऊन गेलें होतें.

मंडळीचा निरोप घेऊन हिंमतराव जेवणाच्या जागी जाण्यापूर्वीं रंगीच्या खोलींत आले, त्यांनीं सुंदर नकशीदार डबींत ठेवलेल्या दोन मोत्यांच्या माळा तिला दाखविल्या. ते मोठ्या किंमतीचे मोतीं पाहून ती म्हणाली—

"दादा, तुम्ही हें सुंदर मोतीं आणलेत खरे, पण मला माझ्या संनिध असलेल्या दोन रत्नाखेरीज दुसऱ्या कसल्याही दागिन्यांचा मोह होतच नाहीं मुळीं !"

जवळच उभे असलेले सदोबा रंगीचा मतलब ओळखून हसत हसत म्हणाले —

"रंगू ! आणखी कोणती रत्नं तुझ्याजवळ आहेत ? मला तर माहीतच नाहीं कीं !—"

सदोबांच्याकडे लाडिकवाणा दृष्टिक्षेप टाकीत रंगी म्हणाली,

"वेड घेऊन पेडगांवला जायचं मला कुठं जमतंय ! माझ्या घरांत असलेलीं रत्नं जगाच्याही माहितीचीं आहेत कीं !—"

"अग पण सांगेनास का ग, हे काय विचारतात ते !—"

रखमाही हंसत हंसत बोलली.

"मामी!" रंगी मान हलवीत म्हणाली, "तूही पण चेष्टा करतेस होय माझी! तर मग सांगतेंच मी! अग, एक माझं रत्न सावळ्या! आणि दुसरं आजच मिळालेलं रत्न माझा दादा!—"

सर्वजण हंसूं लागले.

त्या वेळीं सावळ्या जरा, मिस्किलपणें बोलला,

"आम्हांला रत्न म्हणून आमची चेष्टा करतेस काय!—"

रगीनें फक्त एक वाकडा नेत्रकटाक्ष त्याच्याकडे फेकला!

सारेजण जेवणाकरितां स्वयंपाकघरांत चालले, तेव्हां रंगी आपल्या भावाला हळूच म्हणाली,

"ती मोठ्या मोत्यांची माळ माझ्याकरितां आणलीत तुम्ही दादा, पण ती रखमामामीची बरं का?—"

रंगीच्या मनाचा मोठेपणा हिंमतरावांच्या लक्षांत आला. पण त्यांचा देखील मनांतला तोच विचार होता.

रात्रीं पुन्हा ताजा स्वयंपाक, फराळाचे बहुविध जिन्नस रखमानें काळजीपूर्वक तयार केले होते. रांगोळ्या, उदबत्त्या वगैरेंचा थाटमाट सदोबांनी उत्कृष्ट केला होता.

रंगीच्या एका हातास सावळ्यानें आणि दुसऱ्या हातास हिंमतरावांनी धरून तिला देवाजवळ आणली.

तिनें हिंमतरावांना ओवाळलें. त्यांनीं तिला मोत्यांच्या माळेची ओवाळणी घातली.

रंगीच्या नेत्रांतूनही त्या माळेशीं स्पर्धा करण्याकरितांच कीं काय, तेजस्वी मोतीं गळत होते!

सर्वजण गहिंवरून गेले.

रखमालाही ओवाळणी म्हणून हिंमतरावांनीं घातलेली मोठ्या टपोऱ्या मण्याची माळ आपल्या गळ्यांत घालीत असतां ती म्हणाली—

"ही कसली ग माळ रंगे, माझी आपली पुतळ्यांची माळच घवघवीत खरी! ह्या सुगीला मगनशेठकडून ती सोडवून आणणार आहेत ते!—"

"हो! हो! सोडवून आणणारच मी! त्याच माळेच्या पैशानं

अपिलांत यश दिलं विठोबानं ! विठोबाच सगळा कर्ता करविणारा आहे !"

सदोबा सहज बोलले.

मंडळी घास तोंडांत घेत आहेत, तों दारांत सखी आली. तिनें रखमाला हाक मारली.

रखमा आणि सावळ्या लगेच सखीकडे गेले.

बाहेरच्या बाजूस पोलिसांच्या पूर्ण वेषांत मन्या, खाशा आणि बजा आले असल्याचें सखीनें त्यांना सांगितलें.

हिंमतरावांना भेटण्याकरितां ते मुद्दाम त्या वेळीं आले होते. शिवाय आणखीही त्यांची महत्त्वाचीं कामें होतीच !

सावळ्या आणि रखमा यांना त्यांच्या आगमनानें आनंद वाटला.

आपले सारे मित्र अगदी योग्य वेळी आले असें सावळ्याला वाटलें.

सर्वांना ही बातमी कळली, त्यामुळें सगळेजण फराळ करण्याचे थांबले.

दरवाजाला सावधगिरीनें सदोबांनीं कडी कुलूप लावलें !

साऱ्यांची फराळाचीं पानें रखमानें चलाखीनें तयार केलीं. सदोबाही आपल्या कुटुंबाला मदत करीत होते.

सारेच पूर्णपणें आनंदून गेले होते.

त्यावेळी त्यांचें तें गोड जेवण चाललें असतां, सदोबांनींही पुढील सुंदर अभंग एकतानतेनें अत्यंत गोड स्वरांत म्हटला.

*अवघाची संसार सुखाचा करीन ।*
*आनंदें भरीन तिन्ही लोक ॥*

## गालावरची खळी

## २७

हिंमतरावांनीं त्या रात्रीं मन्या वगैरे मंडळींशीं मनमोकळी खूप चर्चा केली. पण त्यांची समजूत अशी त्यांना करून देतां येईना ! आपण करीत आहोंत, तीं कृत्यें शौर्याची आहेत; धाडसाची आहेत; तीं करण्यांत अत्यंत कौशल्य लागतें; शिवाजी महाराजांचे मावळे देखील असलेच प्रयत्न करीत होते; अशा प्रकारें आपली बाजू खाशा, बजा हे हिंमतरावांपुढें मांडीत होते. मन्या तर असें म्हणत होता की, दूर देशीं युद्धांत येणाऱ्या मरणाला तुम्ही भीत नाहीं. त्याचप्रमाणें आम्हीही मृत्यूला भीत नाहीं. मग तुम्हां योध्यांत आणि आमच्यांत फरक तो कोणता राहिला ?

पण जेव्हां हिंमतराव त्यांना जगभर चाललेल्या युद्धाची खुलासेवार कारणें सांगूं लागले, तेव्हां तीं त्यांना प्रथम कळेनात ! निरनिराळ्या राष्ट्रांची माहिती त्यांना चांगलीशी समजेना ! जगाची पुढें कोणती स्थिति होऊं पाहात आहे, ह्याची कल्पना त्यांच्या डोक्यांत भरेना ! ही गोष्ट हिंमतरावांच्या लक्षांत आल्यानंतर त्यांनीं त्यांच्याशीं चालविलेल्या विचार-विनिमयाचा पवित्राच बदलला. आणि त्या मंडळींनीं आतांपर्यंत काय काय केलें, हीच त्यांची हकीकत स्वस्थपणें प्रथम ऐकून घेतली. त्यामुळें त्या मंडळीं-नाही समाधान वाटलें !

त्यानंतर हिंमतरावांनींही आपल्यास गेल्या पंधरा वर्षांत आलेले अनेक आश्चर्यकारक अनुभव सांगितले. युद्धांतील बारीक सारीक बाबी त्यांना समजावून दिल्या. त्यामुळें हिंमतरावांच्या कर्तबगारीची त्यांना पुष्कळशी कल्पना आली.

अशा प्रकारें आपलेपणानें माहिती सांगणारें त्यांना अद्यापि कोणीं भेटलें नव्हतें.

सभोंवतालच्या संकुचित क्षेत्राबाहेर नवी दृष्टि प्राप्त करून देणारें शिक्षण आपल्या राष्ट्रांतील तरुणांना मिळत नाहीं. त्यामुळें जागतिक क्षेत्रांत राष्ट्रहितबुद्धीनें पुढें पाऊल टाकण्याचें धारिष्ट त्यांच्यांत उत्पन्न होत नाही. ही हिंमतरावांची समजूत ह्या मंडळींशीं बोलण्यानें अधिकच दृढ झाली.

पण मन्या, खाशा, बजा ह्यांच्या आयुष्याला लागलेली दिशा बदलण्याचें काम कांहीं सोपें नव्हतें ! त्यांना उजळ माथ्यानें वागतां येण्याचा मार्गही हिंमतरावांना तितकासा सुलभ वाटत नव्हता ! अशा लोकांना सार्वत्रिक माफी मिळण्याचा संभवही हिंमतरावांच्या दृष्टिपथांत सध्यां तरी येत नव्हता !

ही मंडळी पुन्हां अनेकवार हिंमतराव, सावळ्या ह्यांना भेटून त्यांच्याशीं चर्चा करीतच होती ! त्या चर्चेमधून आंतर्राष्ट्रीय कायद्यांचीही त्यांना थोडीबहुत माहिती झाली !

त्यानंतर एक दिवस मन्या म्हणाला—

" हिंमतराव काका, तुम्ही काळजी करूं नका आमची ! आम्ही आतां ठरविलंय काय करायचं तें ! "

" काय ठरविलेंत तें सांगा ना आम्हांला ? "

हिंमतरावांनीं उत्सुकतेनें विचारलें.

" सांगायचं काय ! दुसरा देश गाठायचा ! जग पाहून यायचें ! आम्ही आतां कुठं तरी बोटींत नोकरी धरणार ! नोकरीला हो काय आतां तोटा ! मुंबईत नाहीं तर गोव्याला, नाही तर, कुठंही पोटाची सोय ह्या युद्धाच्या दिवसांत होईलच कीं ! "

हिंमतराव आणि सावळ्या ह्यांना मन्याच्या ह्या निश्चयाचें कौतुक वाटलें. ह्या त्यांच्या करण्यांत अनेक अडचणी असल्या, तरी त्यांतून कांहीं तरी मार्ग निघेल, असेंही त्यांना वाटलें. 'इच्छा असली कीं मार्ग सुचतो.' ह्या म्हणीची सत्यता ह्या त्यांच्या निश्चयावरून त्यांना दिसून आली.

जगांतील निरनिराळ्या देशांची माहिती सांगितल्याचा हा परिणाम मन्या वगैरे तरुणांवर इतक्या लवकर होईल, ही कल्पना हिंमतरावांना नव्हती !

असे कोठें तरी पोट भरण्याकरितां जाणारे लोक पुष्कळ आढळतात. गुजराथी किंवा मारवाडी समाज जगभर व्यापाराकरितां जातो. पोटापाण्याकरितां परदेशीं जाणारे मजूरही आपल्यांत पुष्कळ आहेत. पण बहुतेक लोक आपलें राष्ट्रीयत्व विसरतात. तें तसें त्यांनीं विसरूं नये. जेथें जातील तेथें त्यांनीं राष्ट्रीय केंद्रें स्थापावीं. वसाहती कराव्या. युद्धाच्या परिस्थितीचा फायदा घेऊन जेथें जेथें थोडेबहुत हातपाय पसरतां येतील तेथें ते पसरावे. असें हिंमतरावांना वाटत होतें.

ही कल्पनाही त्या मंडळींना पटविण्याचा हिंमतरावांनीं प्रयत्न केला. पण त्यांच्या डोक्यांत ह्या गोष्टी भरेनात !

  

कांहीं दिवसांनीं हिंमतराव सावळ्याला घेऊन आपला शेतीचा पसारा नजरेखालीं घालूं लागले. त्याची बारीक सारीक माहिती ते पाहूं लागले. गांवांतील गांवकामगारही हिंमतरावांना आनंदानें मदत करूं लागले. त्यांना पाहिजे ती माहिती ते देऊं लागले.

हें पाहून मगनशेठचे धाबें दणाणलें !

सदोबांचा कांहीं जमीनजुमला त्यांच्याकडे गहाण होता. हिंमतरावांचें वजन सरकार दरबारी असल्यामुळें दिढी दुपटीनें करून घेतलेले कागदी व्यवहार आपल्यास पचणार नाहीत, अशी मगनशेठची खात्री झाली. म्हणून त्यांनीं बेताबातानें रखमाच्या मार्फत थोडीबहुत घस सोसूनही सदोबांनीं केलेले व्यवहार पुरे केले ! फणसास एकदां फळें धरूं लागलीं, म्हणजे तीं बुंध्यापासून शेंड्यापर्यंत लागतात. तशीच स्थिति संसारांतील व्यवहारांची पुष्कळदां होत असते. हातीं घेतलेल्या कामांत यश येण्यास एकदां आरंभ झाला, म्हणजे कित्येक वेळां अथपासून इतिपर्यंत साऱ्याच कामांत यशसिद्धि प्राप्त होऊं लागते !

असाच अनुभव आंबेगांवांत खऱ्या नांवानें प्रकट झाल्यापासून हिंमतरावांना पण येऊं लागला.

पहिली महत्त्वाची गोष्ट म्हणजे पुण्याच्या प्राणाचार्यांनीं रंगीच्या आजाराचें केलेलें निदान बरोबर ठरलें. त्यांनीं दिलेलीं भारी किंमतीचीं

अत्यंत गुणकारी औषधें तिला लागूं पडूं लागलीं. त्यामुळें तिच्या प्रकृतींत झपाट्यानें सुधारणा होऊं लागली !

बाजरीच्या पिकाची अशी गोष्ट आहे कीं, योग्य वेळीं पावसाचा ओलावा त्या पिकास मिळाला नाहीं, तर तें पीक करपूं लागतें. पण तितक्यांतच पर्जन्याचें भरपूर पाणी जर का त्या करपलेल्या बाजरीला मिळालें, तर तें पीक दुप्पट जोमानें वाढतें !

तशीच स्थिति अक्षरशः रंगीच्या प्रकृतीची झाली. तिच्या प्रकृतींत अपेक्षेबाहेर भराभर सुधारणा होऊं लागली !

दुसरीही एक महत्त्वाची गोष्ट ह्याच वेळीं घडून आली. हिंमतरावांच्या डोक्यांत पुष्कळ दिवस एक विशेष कल्पना मूळ धरून होती. तिला यश येण्यास त्याच वेळीं सुरुवात झाली !

आंबेगांवच्या डोंगराळ भागांत सरकारी मालकीची पुष्कळ पडजमीन होती. ती चांगल्या प्रकारें लागवडीस आणतां येईल, असें हिंमतरावांना पूर्वींपासून वाटत होतें. त्या जमिनीची मागणी आतां कांहीं विशिष्ट कारणांकरितां हिंमतरावांनीं सरकारकडे केली होती. ती त्यांची मागणी कार्तिक महिना संपण्याच्या सुमारास सरकारनें मान्य केल्याचें पत्र हिंमतरावांच्या हातीं पडलें !

रंगीची प्रकृति सुधारण्याच्या आनंदांत ह्या नव्या आनंदाची अधिकच भर पडली.

ही मिळालेली जमीन दाखविण्याकरितां सावळ्यास बरोबर घेऊन हिंमतराव एके दिवशीं हिंडत होते. त्या वेळीं सावळ्या म्हणाला---

" दादासाहेब, मिळालेली जमीन तर अफाट आहे. पण ह्या जमिनीचा उपयोग आपण कशाकरितां करणार आणि तो कसा करणार, हें मला कांहीं चांगलें लक्षांत येत नाहीं ! —"

" बरोबर आहे तुझें म्हणणं " हिंमतराव म्हणाले. " तीच गोष्ट आतां मी तुला सांगणार आहे —"

त्या वेळीं ते दोघे एका लहानशा टेकडीच्या वरील बाजूच्या पठारावर बसले होते. ती वेळ सकाळची होती. टेकडीच्या सभोंवतालच्या भागांतील झाडीवर सूर्याच्या किरणांनीं तकाकी आणिली होती. टेकडीच्या पायथ्याकडे

जाणारे लहान लहान ओढे झुळूझुळू वाहात असून, त्यांतील पाण्यावर पडलेल्या रविकिरणांनी त्या पाण्याला चांदीच्या रसाचें स्वरूप आणलें होतें. ह्या देखाव्याकडे बोट करून हिंमतराव म्हणाले—

"ह्या साऱ्या प्रदेशास असेंच तेजस्वी स्वरूप प्राप्त व्हावें, आणि त्याचा उपयोग राष्ट्रांतील तेजस्वी तरुणांना व्हावा, अशी माझी इच्छा आहे, सावळ्या ! —"

हिंमतरावांच्या ह्या म्हणण्याचा बोध सावळ्याला चांगलासा झाला नाहीं, म्हणून तो म्हणाला—

"दादासाहेब, तुमच्या मनांत काय आहे, तें एवढ्या बोलण्यानं अजूनही माझ्या लक्षांत येत नाहीं !"

हिंमतराव सावळ्याकडे पाहात पाहात त्याला सांगूं लागले—

"ईश्वरानें मला आयुष्य दिलें तर, शेतीच्या उत्पन्नांवर स्वावलंबी होईल, असें एक लष्करी विद्यालय काढण्याची योजना माझ्या मनांत आहे. ह्या विद्यालयांत तयार झालेले तरुण हिंदुस्थानचें स्वातंत्र्य पूर्णपणें पदरांत पाडून घेतील. शिवाय ते जगांतील सुधारलेल्या राष्ट्रांच्या बरोबरीचें स्थान आणि मान हिंदुस्थानास प्राप्त करून देतील. असा मला भरंवसा वाटतो; आत्मविश्वासही वाटतो."

"माझ्या मनांत अशा प्रकारच्या योजनेची सविस्तर आंखणी तयार आहे. पण ह्या कार्यास खरा आरंभ झाल्याशिवाय उगीच कागदी बोभाटा करण्याची माझी इच्छा नाहीं. आज शेंकडों एकर पडिक जमीन मिळाली आहे, हा ह्या योजनेचा शुभ आरंभ होय ! —"

हिंमतरावांना आणखी पुष्कळ बोलावयाचें होतें. पण सावळ्याची घरीं जाण्याची ओढ पाहून त्यांनी त्या दिवशींचें तें बोलणें आटोपतें घेतलें आणि ते घरीं आले.

घरीं आल्याबरोबर त्यांनीं आलेलें सरकारी टपाल फोडलें. शक्य तितक्या लवकर कामावर हजर राहाण्याची ती सूचना होती. दोघांची रजा आणखी एक महिना होती. तथापि युद्धविषयक महत्त्वाच्या घडामोडींमुळें त्यांना लवकर हजर होण्याची ती सूचना होती. कदाचित् इतालीच्या रणांगणावरही जावें लागेल, असें हिंमतरावांना वाटत होतें !

हिंमतरावांना आतां आंबेगांवांकडील व्याप शक्य तितक्या लवकर आवरण्याची जरूरी होती. आबांनीं बनावट केलेल्या मृत्युपत्रांमुळें आणखी बऱ्याच भानगडी निर्माण झाल्या होत्या. आबांची स्थिति तर अत्यंत अनुकंपनीय झाली होती, त्यामुळें काय करावें, हें हिंमतरावांना ठरवितां येत नव्हतें.

हिंमतराव जेव्हां आंबराईंत जात, तेव्हां रंगीची काच्या मारलेली बालमूर्ति साखरगोटीचे आंबे तोडीत असतां आपल्या शिकारी मोत्या कुत्र्याची औत्सुक्यपूर्ण नजर तिच्याकडे कशी लागून राही, ह्याचेंही त्यांना स्मरण होई ! आणि त्यावेळच्या त्या डौलदार साखरगोटीचें तें जुनें चित्र त्यांच्या डोळ्यापुढें उभें राही !

त्याच साखरगोटीची सध्यांची जीर्ण व किडकी स्थिति पाहून त्यांना आबांची देखील तशीच अवस्था झाली आहे असेंही वाटल्याशिवाय राहात नसे !

एकदां सदोबा आणि हिंमतराव आंबराईतील साखरगोटीच्या नजीक सावळ्याच्या वडिलांच्या समाधीजवळ बोलत बसले होते. त्या वेळीं सदोबा म्हणाले—

"माणूस मूळचा देव आहे, पण काम, क्रोध लोभ वगैरे सहा विकारांमुळें तो राक्षस बनतो, हिंमतराव ! साखरगोटीच्या लोभामुळें हैबतराव मेला ! आबा भूत भूत करून नाचू लागला ! ती साखरगोटीही अशी आडवी पडली आहे ! आतां हिचें लांकूड कोणीही न्यावं, अन जाळावं ! —"

"तुम्ही खरंच बोलतां सदोबा," हिंमतराव उदासवाण्या स्वरांत बोलूं लागले, "मला हें साखरगोटीचं जुनं लाकूड देखील बघवत नाहीं ! हें गावांतील लोकांना फोडून नेऊं द्या ! माझ्या दृष्टीसमोर देखील हें नकोसं वाटतं ! —"

"मी करतों ती तजवीज !" सदोबा म्हणाले. "जें उत्पन्न झालं तें जाणारच ! नाहींसं होणार ! हा देवाघरचा न्याय आहे ! पण हिमतराव त्याची जागा भरूनही निघायचीच ! आजच पाहाना, ह्या आंबेझरीच्या काठीं साखरगोटीच्या कोया पडल्या होत्या. त्याची किती सुंदर रोपटीं तयार झालीं आहेत, पाहा ! —"

आणि जेव्हां हिंमतरावांनीं सभोंवतीं पाहिलें, तेव्हां त्यांना जिकडे तिकडे साखरगोटी आंब्याचीं रोपटींच रोपटीं दिसलीं ! त्यांना वाटलें—

" जुन्या विचारांतूनच नवे विचार निर्माण होतात, त्याचप्रमाणें जुन्या साखरगोटींतून ही नवीं ताजीतवानीं रोपटीं निर्माण झालीं आहेत !"

कांहीं वेळ दोघेही स्वस्थ बसले होते. पण हिंमतरावांना कसलासा एक विचार सुचला. त्यांची मुद्रा आनंदी झाली. आणि ते म्हणाले,

" सदोबा, मला एक कल्पना सुचली आहे. ही साखरगोटीचीं रोपटीं चांगलीं तयार करा. आणि ह्यांची मोठी बागच ह्या माझ्या आंबराईच्या मळयांत लावा. मला ही बाग माझ्या गोड स्वभावाच्या साखरगोटीला म्हणजे रंगीलाच द्यायची आहे !"

हिंमतरावांच्या म्हणण्याप्रमाणें करण्याचें सदोबांनीं मोठ्या आनंदानें कबूल केलें.

त्यानंतर सदोबा हे हैबतरावांच्या समाधीजवळ एक अभंग म्हणत बसले. त्या वेळीं हिंमतराव नेहमींप्रमाणें रंगीकरितां त्या मळयांतील ताजीं ताजीं फुलें तोडण्यास गेले.

आज त्यांना फुलेंही पण खूपच दिसलीं. तीं फुलें हिंमतराव भराभर मोठ्या आनंदानें तोडूं लागले. इकडे सदोबाचा पुढील तुकारामाचा अभंग चालला होता.

*हा रस आनंदाचा । घोष करा हरि नामाचा ।*
*कोण हा दैवाचा । भाग पावे येथलि ।।१।।*

तीं फुलें घेऊन हिंमतराव आणि सदोबा हे दोघे घरीं आले.

ते दिवस मार्गशीर्षमासांतील अखेरचे होते. रंगीच्या प्रकृतीस आतां चांगला आराम पडला होता. ती घरांत थोडी थोडी हिंडूं फिरूंही लागली होती. तिच्या मुखावरील टवटवी दिवसेंदिवस वाढूं लागली होती.

सावळ्या तर नेहमीं तिच्या सन्निध असे. हिंमतरावही मधून मधून तिच्याशीं गोड बोलून तिला आनंदी ठेवीत.

आतां महिना दोन महिन्यांत ती चांगली निकोप होईल, असें हिंमत-

रावांना वाटूं लागलें. त्यांनीं खटपट करून आणखी एक महिना रजाही वाढवून घेतली होती.

सदोबा आणि हिमतराव मळयांतून लवकरच घरीं परतले होते.

रंगीच्या खोलीच्या खिडक्या उघडया होत्या. दिनराजाचे पश्चिमेकडील किरण रंगीच्या खोलीत प्रवेश करीत होते. जणूं काय, रंगीच्या संन्निध त्या वेळीं त्यांना असावें, असें वाटत होतें !

रंगीच्या मनांत कसले तरी गोड विचार घोळत होते ! रखमानें त्या दिवशी सहज म्हटलें होतें, " आज पण लग्नाचा मुहूर्त आहे. "

त्या वेळीं हिंमतरावांकडे पाहात रंगी म्हणाली——

" दादा, माझं ऐकतां का थोडं ! आजचा दिवस पण चांगला आहे. वेळही पण मुहुर्ताची आहे ही ! ——"

" मग काय करूं म्हणतेस रंगूताई ! तूं कांहींही सांग. तुझ्यावरून जीव ओवाळून टाकीन मी ! "

" हो तें खरं दादा ! पण माझं एक मागणं आहेच तुमच्याजवळ ! –"

" तू मागण्याच्या अगोदर मीच आज एक केलेला निश्चय सदूकाका सांगतील तुला ! ——"

हिंमतराव आनंदानें हंसत हंसत बोलले.

" रंगूताई " सदूकाका म्हणाले, " साखरगोटीची बागच हिंमतराव आंबराईच्या मळयांत लावणार आहेत; आणि ती कोणाची होणार आहे, ठाऊक आहे का ? ——"

" कोणाला देणार आहेत ती सरदार साहेब ? सांगा सदूकाका आम्हाला ! ——"

मध्येंच सावळया उत्सुकतेनें बोलला.

" अरे, ती रंगीलाच ते देणार आहेत ! सावळया, रंगीबरोबर तुलाच ती आंदण मिळणार आहे, म्हणेनास ! ——"

" छान छान केलं दादांनीं ——"

रखमा उल्हासानें म्हणाली.

" मी पण तिची फळं गांवाला वाटीन ! पण दादा माझं मागणं आतां थोडसं राहिलंच ! "

" काय म्हणतेस सांग कीं ! --"

हिंमतराव प्रेमळपणानें म्हणाले,

" माझा हात तुम्ही द्या सावळ्याचा हातीं !" रंगी सांगू लागली, " आतांचा मुहूर्त चांगला आहे. कन्यादान व्हायचं राहिलंय ! सदुकाका म्हणतात असं ! --मग आतां कराच तेवढं ! सदूकाका साधु आहेत. त्यांच्या आणि मामींच्या साक्षीनं होऊं द्या हें !"

तिच्या ह्या पवित्र भावनेनें साऱ्यांचीं हृदयें हेलावलीं.

आणि हिंमतरावांनीं त्याप्रमाणें रंगी आणि सावळ्या यांचा हातांत हात देऊन त्यांना तीं टवटवीत ताजी फुलें ओंजळ ओंजळ दिलीं !

त्या वेळी पश्चिम दिशेलाही आनंद झाला होता. तिचे गाल गुलाबी झाले होते !

रंगी आणि सावळ्या यांच्या गालांवरील लालीही मोठी मनोहर दिसूं लागली !

रंगी सहजच त्यावेळीं गालांतल्या गालांत हंसली. तिच्या गालांवर त्यावेळीं पडलेली सुंदर खळी पाहून सावळ्याच्या जुन्या आठवणी जागृत झाल्या !

इतक्यांत तेथें गौराबाईही आल्या. त्या मात्र त्या वेळीं फार सचिंत दिसत होत्या. पण तो देखावा पाहून त्यांनाही नशा त्यांच्या मनःस्थितींतही बरेंच वाटलें !

## नव्या साखरगोटीचा स्वाद

## २८

आबांच्या भ्रमिष्ट स्थितीमुळें गौराबाईना त्यांची फार काळजी लागून राहिली होती. कांहीं केल्या त्यांच्या डोक्यांतील भुताचे वेड जाण्याचें चिन्ह मुळींच दिसत नव्हतें. रंगीची आणि सावळ्याची भेट झाली. पुष्कळ वर्षें ज्यांचा पत्ता लागत नव्हता, ते आबांचे पुतणे हिंमतराव प्रकट झाले. त्यांच्या पराक्रमाची दिगंत कीर्ति झाली. ह्यामुळें गौराबाईना समाधान वाटल्याशिवाय राहिलें नाहीं. पण त्या सर्वांना आपल्या घरीं बोलावून त्यांचा सन्मान करण्यासारखी आपली स्थिति नसावी, ह्याबद्दल त्यांना फार वाईट वाटत होतें. गौराबाई आज रंगीकडे कांहीं विशिष्ट हेतु मनांत धरून मुद्दाम आल्या होत्या.

रंगी आबांची आवडती होती, हें त्यांना माहीत होतें. मध्यंतरींच्या विलक्षण घटनांनीं रंगीचें मन आपल्या पतीविषयीं कितीही विटलें असलें, तरी आज ती पूर्ण सुखांत असल्यानें तें सारें विसरून जाईल; आणि आपण तिला सांगितल्यास निदान ती आपल्या चुलत्याची समजूत घालण्याचा प्रयत्न करील, असें त्यांना वाटत होतें. म्हणून त्या रंगीकडे आल्या होत्या.

त्याच वेळीं रंगीच्या घरीं चाललेला आनंदी आनंद पाहून त्याही आपलें दुःख क्षणभर विसरून गेल्या !

थोड्या वेळानें गौराबाईंनीं घरची हकीकत रंगीला सांगितली, आणि चुलत्याला भेटून त्यांचें खुळें वेड जाण्याकरितां त्यांना समजुतीचे आणि त्याची खात्री पटविणारे दोन शब्द तिनें सांगावे, असें तिला सुचविलें.

रंगीलाही आबांची कींव आल्याशिवाय राहिली नाहीं. किंचित्काल तिनें विचार केला आणि आपल्या काकूंचें म्हणणें कबूल केलें.

दुसऱ्या दिवशी दुपारीं गौराबाईबरोबर रंगी आबांना भेटण्यास हळुहळू गेली. आबा आपल्या खोलींत अस्ताव्यस्त पडले होते ! त्यांना गौराबाईनी रंगी आल्याचें कळवितांच ते झटकन उठून बसले ! रंगीकडे टक लावून ते वेड्यासारखेंच पाहूं लागले ! थोड्या वेळानें आबांना नमस्कार करून रंगीच म्हणाली——

" आबा, मी रंगी आहे. तुम्हांला भेटण्यासाठीं मी मुद्दाम आलें आहे. आतां बरं वाटतंय ना तुम्हांला ?——"

तरीही थोडा वेळ आबा तिच्याकडे पाहातच होते. पण नंतर त्यांना काय वाटलें, कोणास ठाऊक ! त्यांनी आपलें मस्तक दोन तीनदां झाडलें आणि तिच्याकडे पुन्हा पाहिलें.

त्यांच्या डोळ्यांतून एक दोन टिपें पण घळकन गळलीं !

नंतर ते हलक्या आवाजांत बोलले——

" रंगू, तूं बस ना माझ्याजवळ अशी ! केव्हां आलीस बाळ !——"

रंगीनें त्यांना यत्किंचितही त्रास होऊं नये, अशा बेतानें म्हटलें——

" आबा, मी आत्तांच घरीं आलें ! तुम्हांला चांगलं बरं वाटेल आतां !"

आबांनीं तिच्या पाठीवर हात ठेवला आणि कांहींसें आठवल्यासारखें करून ते म्हणाले——

" भुजंगराव बरे आहेत ना ? पुष्कळ दिवसांत ते आले नाहीत माझ्याकडे !——"

मस्तकांत तापलेली सळई खुपसावी, असें तिला वाटलें. पण फार मोठें आत्मसंयमन करून विषय बदलण्याच्या हेतूनें ती म्हणाली——

" आबा, पडा थोडें ! मी डोकें चेपतें तुमचें ! म्हणजे तुम्हांला बरें वाटेल !——"

खरोखरच आबांनीं तसें केलें. ती डोकें चेपूं लागली.

गौराबाईही जवळ होत्या. दोघी एकमेकींकडे पाहात होत्या ! अद्यापि आबांचे डोकें ठिकाणावर नाहीं, हें त्या दोघींनींही जाणलें.

पण डोकें चेपीत असतां आबा स्वस्थ पडले होते. गौराबाईही पाय

नेपूं लागल्या. मात्र त्या वेळीं त्या पतीचे पाय आपल्या अश्रूंनीं न्हाणीतही होत्या !

आबांना ह्या दोन्ही प्रेमळ माध्वींच्या सेवेनें थोडया वेळांत शांत झोप लागली.

गौराबाईंचा निरोप मानेनेंच घेऊन रंगी तेथून हळूंच निसटली !

  

पुढें एक दोन दिवस आबा थोडे शांत होते. पण पुन्हा त्यांचें भुताचें वेड सुरू झालें. एकदां पुतण्याला जिवंतच पाहिलें, तर त्यांच्या डोक्यांतलें भुतांचें वेड निघून जाईल, असें आंबेगांवच्या जुन्या वृद्ध लोकांना वाटलें. त्याप्रमाणें त्यांनीं हिंमतरावांना सुचविलें.

एक दोन जुन्या वडील माणसांबरोबर हिंमतराव आणि सावळ्या ह्यांनीं आबांकडे जावें, असें ठरलें.

चुलते जर शुद्धीवर आले, तर जन्मभर तुम्ही खुशाल जमीनजुमल्याचा उपभोग घ्या. तो कोणाला विकू मात्र नका. असें त्यांना नम्रतेनें सांगण्याचा हिंमतरावांचा निर्धार झाला होता !

आपल्या घरचे आंतले बारीक सारीक व्यवहार माहीत असलेले गृहस्थ बरोबर असलेले बरें, असें वाटून हिमतरावांनीं मगनशेठजीनाही आपल्या बरोबर घ्यावयाचें ठरविलें !

शेठजींना ती गोष्ट पसंत नव्हती. पण ह्यापुढें आंबेगांवांत हिंमत-रावांच्याच शब्दाला अधिक मान आहे, हें त्यांनीं पक्कें जाणलें होतें. म्हणूनच तेही हिंमतरावाबरोबर आबांच्या घरीं जाण्यास तयार झाले !

एके दिवशीं तिसऱ्या प्रहराच्या सुमारास ही मंडळी आबांच्या घरीं गेली.

आबांची खोली मोटी होती. तेथें गौराबाईनीं चांगली बैठक घालून ठेवण्याची व्यवस्था केली होती. त्यांनीं आपल्या पतिराजांना चार सम-जुतीच्या गोष्टी सांगत सांगत लोडाला टेकून बसविलें होतें ! सारी मंडळी खोलींत आल्याबरोबर गौराबाई आपल्या डोकीवरचा पदर सावरीत खोलीच्या दुसऱ्या दारांतून बाहेर पडल्या.

ह्या साऱ्या मंडळींच्या फराळाच्या तजविजीसाठीं गौराबाई स्वयंपाकघरांत गेल्या खऱ्या, पण त्यांचें सारें लक्ष बाहेरच्या खोलीकडे लागलें होतें.

आबा लोडाला टेकून खालीं मान घालून बसले होते. बराच वेळ त्यांनीं आपली मानच वर केली नाहीं ! मात्र सतरंजीवर ते बोटानें कसल्यातरी रेघोट्या ओढीत होते ! तोंडापुढें एकादी माशी आली कीं, ती ते चापटी मारून पकडण्याचा प्रयत्न करीत. पण ती चापटी एकदोनदां त्यांच्याच गालावर बसली !

बराच वेळ कोणी कांहीं बोललें नाहीं. त्या वृद्ध गृहस्थांना प्रथम काय बोलावें आणि कसें बोलावें, हें सुचत नव्हतें. त्यांनीं दोन तीनदां फक्त शेठजींकडे पाहिलें !

शेठजींना संध्याकाळचें दुकानांतील गिऱ्हाईक गांठण्याकरितां लवकर जावयाचें होतें, म्हणून तेच म्हणाले--

"आबासाहेब, जरा वर बघा ! आपला सावळ्या आला आहे, तुमच्या भेटीला !--"

एक दोनदां शेठजींनीं असें म्हटल्यावर आबांनीं सावळ्याकडे पाहिलें.

आणि त्यांनीं विकट हास्य केलें. ते तोंडानें "सावळ्या ! सावळ्या ! हैबतरावांचा सावळ्या !" असें बडबडू लागले !

त्या वेळीं मोरे घराण्यांतील एक वृद्ध गृहस्थ म्हणाले--

"आबासाहेब, तुमचा पुतण्या हिंमतराव जिवंत आहे ! तो मेला नाहीं ! तो भूत झाला नाहीं ! तो भूत होणार नाहीं ! तो तुमच्या भेटीस आला आहे ! त्याला प्रत्यक्ष पाहा ! आणि भुताचें वेड सोडून द्या !--"

आबांनीं वर पाहिलें. त्यांच्या समोरच हिंमतराव बसले होते. त्यांना पाहातांच त्यांनीं आपले डोळे अधिकच गरगर फिरविले. आणि एकदम ओरडूं लागले--

"भूत ! भूत ! हिंमतरावाचेंच भूत हें !"

त्या वेळीं गडी माणसांनीं आबांना धरून ठेविलें. तेथून लवकर निसटण्याच्या हेतूनें शेठजी उठून जरा पुढें गेले. त्यांनीं आबांना गदगदां हलविलें व ते म्हणाले--

"हिंमतरावच आहेत हे ! भूत नाहीं, हें !--"

इतक्यांत हिंमतरावही म्हणाले—

"काका! काका! आबा! आबा! मी भूत नाही. मी हिंमतरावच आहे! तुम्ही हें वेड टाकून द्या!—"

एकदां आबांनीं शेठजीकडे पाहिलें आणि पुन्हा हिंमतरावांकडे पाहून ते फार मोठ्यानें ओरडूं लागले—

"भूत! भूत! हिंमतरावाचें भूत! हैबतरावाचें भूत! सगळींच भुतें!—"

सगळ्यांची निराशा झाली. नंतर एकेक जण त्या खोलींतून बाहेर पाय काढूं लागला!

तेथून बाहेर जातेवेळीं हिंमतरावांचे डोळे ओले झाल्याशिवाय राहिले नाहींत!

  

त्या दिवसापासून दुर्दैवानें आबांचे वेड फारच वाढलें! आपण करायला गेलों काय, आणि झालं काय, असें सर्वांना होऊन गेलें!

गौराबाईंनाही आतां आपल्या पतीची स्थिति काय होईल, आणि काय नाहीं, असें वाटून त्यांच्या मनानें हायच खाल्ली!

मात्र आपल्या पुतण्याच्या उदार हृदयाची त्यांना चांगली कल्पना आली. आणि त्याच्याविषयीं त्यांचा आदर वाढला.

त्यांचा राग हिंमतरावावरच काय, पण कोणावरही नव्हता. फक्त त्या आतां आपल्या नशिबाला दोष देत होत्या!

हा सारा प्रकार ऐकून सदोबा कांहीं बोलले नाहींत. रात्रींच्या भजनांत ते पुढील अभंग मात्र घोळघोळून म्हणत होते!

*पापाचीं संचितें देहासि दंडणा।*
*तुज नारायणा बोल नाहीं ॥१॥*
*पेरी कडू जीरें मागे अमृत फळें।*
*अर्कवृक्षा केळें कैसे येती ॥२॥*
*सुख अथवा दुःख भोग हा देहाचा।*
*नास हा ज्ञानाचा न करावा ॥३॥*

तुका म्हणे आतां देवा कां रुसावें।
मनासी पुसावें काय केलें ॥४॥

❀ ❀ ❀

हिंमतराव आणि सावळ्या यांचा कामावर हजर होण्याचा दिवस जसजसा जवळ येत चालला, तसतशी रंगी आणि रखमा यांच्या मनाची हुरहूर वाढूं लागली. आणखी सहा महिन्यांनीं सावळ्याला रजा मिळूं शकेल. त्यांच्या रजेकरितां मी वाटेल ती खटपट करीन, असें सांगून हिंमतराव त्यांचें समाधान करीत होते. स्त्रीहृदयाचें समाधान अशा शाब्दिक आश्वासनांनीं होत असतें थोडेंच !

पण सदोबा जेव्हां त्यांना समाधानाचा उपदेश करीत. तेव्हां त्यांची समजूत पटल्यासारखी होई. निदान त्या वेळीं तरी त्यांच्या मनांत शंका कुशंका राहात नसत !

सदोबाच्या व्यक्तित्वाचा हा मुख्यतः परिणाम होता.

सदोबा सर्वांकरितांच झटत होते. आबांच्या दुःस्थितीची त्यांना करुणा येई. त्यांच्या हातून होईल ती मदत ते गौराबाईंना करीत असत. पण आबांचें वेडच आतां भलत्या थराला गेलें होतें. त्याला सदोबा तरी काय करणार ?

केव्हां केव्हां आबा हे रानावनांतून भूत भूत करून सैरावैरा हिंडत ! नाचत ! ओरडत ! रडत असत देखील ! गडी माणसें त्यांच्या ह्या वेडानें अगदीं त्रासून गेलीं होतीं ! पण करतात काय बिचारीं ?

आंबराईंतील साखरगोटीचें लांकूड फोडून गोरगरीबांना नेण्यास सदोबांनीं सांगितलें होतें. त्याप्रमाणें ते लोक तें नेत असत !

एके दिवशीं संध्याकाळच्या वेळीं हे लोक साखरगोटीचीं लाकडें फोडीत होते. कांहीं लोक मोळ्या बांधून त्या नेत होते.

इतक्यांत तिकडे ओरडत ओरडत "भूत भूत" करीत आबा आले !

ते लोक पाहून त्यांना अधिकच भीति वाटली ! आणि ते तेथून सैरावैरा धावत पण सुटले !

तो दिवशीं मार्गशीर्षांतील अमावास्येचा होता. त्या अंधाऱ्या रात्रीं रानभर आबा वाट फुटेल तिकडे धावत होते !

असे ते भटकले, तरी ते रात्रीं आतांपर्यंत घरीं आल्याखेरीज राहात नसत !

त्या दिवशीं मध्यरात्र उलटून गेली, तरी देखील आबा घरीं आले नाहींत !

कदाचित् मळ्यांतील झोपडींत ते राहिले असतील, असेंही गौराबाईना वाटलें !

उजाडतांच गौराबाईनीं आंबराईचा मळा गांठला ! पण तेथें त्यांचा पत्ता नव्हता ! तेथें त्यांचा मागमूसही लागला नाहीं !

गडीमाणसें, गांवांतील लोक, सदोबा, सावळ्या हिंमतराव, हे सारे आबांच्या तपासास लागले.

दुपारपर्यंत त्यांचा थांगपत्ता लागला नाहीं ! तो दिवस तसाच गेला ! दुसऱ्या दिवशींही कांहीं तपास लागला नाहीं !

तिसऱ्या दिवशीं गडीमाणसांना त्यांचें प्रेत एका पडक्या विहिरींत तरंगत असलेलें दिसलें !

सर्वांची अंतःकरणें दुःखी झालीं !

हैबतरावांच्या समाधीच्या शेजारींच आबांच्या प्रेताचें दहन करण्यांत आलें.

साखरगोटीच्या उरलेल्या लाकडांनींच त्यांची ती चिता रचलेली होती !

ती धगधगीत पेटलेली चिता पाहून सदोबा म्हणाले—

आबा गेले ! जुनी साखरगोटीही गेली ! सारे रागद्वेष जळून खाक झाले !

  

त्यानंतर सदोबांच्या विचारानें हिंमतरावांनीं गौराबाईंची आणि आपल्या जमीन जुमल्याची जी व्यवस्था करावयाची ती अगदीं योग्य प्रकारें केली.

हिंमतराव आणि सावळ्या यांचा नोकरीवर जाण्याचा दिवस उगवला. निघतांना त्यांनीं भक्तिभावानें सदोबांना नमस्कार केला.

सावळ्या आणि रंगी ह्यांचे डोळे एकमेकांशीं बोलत होते.

त्या उभयतांच्या त्या वेळच्या मनःस्थितीचें वर्णन शब्दांनीं लिहून दाखवितां येण्यासारखें नाही !

सर्व मंडळी रस्त्यांतील मोटारीपर्यंत आली होती. मोटारींत पाय ठेवण्याची ती वेळ होती.

इतक्यांत कांहीं तरी महत्त्वाचा जिन्नस रंगीच्या खोलींत विसरून राहिला आहे, असें सावळ्यानें म्हटलें.

तो झटकन विसरलेला जिन्नस शोधून आणण्याच्या निमित्तानें घरीं परतला !

त्याच्या मागोमाग रंगीही होतीच. खोलीत पाय टाकतांच रंगीच्या खांद्यावर हात ठेवून त्यानें आपलें तोंड पुढें केलें !

थोड्या वेळानें सावळ्या उद्गारला—

" नव्या साखरगोटीचा स्वाद पण वेड लावून टाकणारा आहे, रंगे ! —"

सावळ्याकडे दृष्टिक्षेप टाकीत लाडिकवाण्या स्वरांत रंगीही पण म्हणाली —

"तर ! तर ! एकालाच वेड लागतंय वाटतं ! डोळे भरून पाहून घेतें मी आतां ! सावळ्याच्या, माझ्या कृष्णाच्या, ध्यानानंच खरं खरं वेड लावलं मला !—"

शुभं भवतु.

# रामतनय यांचं वाङ्मय



**प्रकाशित**

१ मोहित्यांची मंजुळा

२ खरा उद्धार
(तिसरी आ.)

३ साखरगोटी





**आगामी**

१ तापीतीरीं

२ कॅप्टन प्रतापराव
भा. १ व २

३ दुहेरी धार

४ गजरा

५ मोहित्यांची इंदिरा

६ बाळ्या

# आगामी प्रकाशनें

### वि. स. खांडेकर

१ अश्रु
२ बुद्ध आणि हिटलर
३ तिसरी भूक
४ वर्षाकाल
५ छायाभाग १-२
६ चार भिंती
७ हिरवा चाफा (दु. आ.)
८ दोन ध्रुव ,,
९ कालचीं स्वप्नें
१० विसावें शतक
११ पहिली लाट
१२ कल्पकता
१३ वालुका
१४ मंजिऱ्या
१५ मराठीचा नाट्यसंसार
१६ वा. म. जोशी (व्यक्ति आणि वाङ्मय)
१७ चल ये राणी
१८ सुवर्ण कण

### ग. त्र्यं. माडखोलकर

१ तीन दिवस
२ ऋणभार
३ माझे आवडते कवि
४ चक्रवर्ती उदयन
५ उर्वशी
६ उमर खय्याम
७ विलपिका

### द. र कवठेकर

१ आपुलकीची झळ
२ ढगाआड
३ आग आणि पाणी
४ आभाळाची सांवली

### ना. ह. आपटे

१ साजणी

### ना. धों. ताम्हनकर

१ निवाडे भा. २ रा
२ गुजाताई
३ शेजारी

### प्र. के. अत्रे

१ शब्दचित्रें
२ 'मी' कसा झालों

### कृष्णाबाई मोटे

१ अनामिकेची पूजा
२ कलाक्षेत्रांत
३ मवाली

### काकासाहेब कालेलकर

१ स्मरण यात्रा

### अनंत काणेकर

१ उघड्या खिडक्या
२ काळे आणि पांढरे

### चिं. वि. जोशी

१ गुंड्याभाऊ
२ दरबार कथा
३ नटवर्य

### दत्तू बांदेकर

१ हिरवी माडी
२ कबुली जबाब